ती. **अण्णा** आणि ती. **आई**

यांना

**प्रेमपूर्वक अर्पण**

# प्रस्तावना

कुंकुमतिलकाशिवाय स्त्रीचें कपाळ फटफटीत दिसतें तसेंच प्रस्तावनेच्या अभावीं कित्येकांना ग्रंथ ओका ओका वाटतो. म्हणूनच ही प्रस्तावना लिहिण्यास घेतली. एरवीं काय मोठीशी आवश्यकता होती ?

'भडकत्या ज्वाला' नामक माझ्या पहिल्या वाङ्मय अपत्याचें स्वागत व कौतुक अपेक्षेहूनहि बरेंच झालें. त्यानंतर धिम्मेपणानें व थोड्याशा आत्मविश्वासानें हें पदार्पण करण्याचें धाडस मी करावें हें मनुष्यस्वभावास अनुसरूनच नाहीं का ?

प्रस्तुत ग्रंथांत " लोकशाही विरुद्ध झोटिंगशाही " या लढयाचा सर्व दृष्टीनें सांगोपांग उहापोह मी केला असून त्या लढयाच्या शेवटीं क्षितिजावर दिसणाऱ्या उद्यांच्या जगाची पुसट रूपरेषा सांगण्याचा मी यत्न केला आहे. अर्थात् या प्रश्नावरील आंग्ल भाषेंतील उपलब्ध असलेल्या ग्रंथांच्या परिशीलनानें जे विचार मला सुचले तेच कांहींसे या पुस्तकांत संकलित केले आहेत.

पुस्तकांतील प्रतिपाद्य विषयाचा क्रम कोणत्या पद्धतीनें मी आंखला आहे तें मी आतां थोडक्यांत सांगतों. लोकशाहीच्या वेगवेगळ्या व्याख्यांच्या गोंधळांतून खऱ्या लोकशाहीची कल्पना काय आहे हें मी प्रथम सांगून लोकशाहींतील मानवी हक्कांचें स्वरूप कोणतें हें दुसऱ्या प्रकरणांत विशद केलें. लोकशाहीच्या पुरस्कारार्थ प्रसवलेल्या प्रतिनिधिक राज्ययंत्राचें कार्य कसें चालतें याचें सविस्तर परीक्षण करून तिचें स्वरूप भांडवलशाहीनें कसें व्यापृत आहे हें स्पष्ट केलें. त्याच भांडवलशाहीवर कालचक्र कां व कसें आलें याचें विवेचन नंतर केलें. लोकशाहीप्रधान राज्य यंत्रांतील अंगभूत गुणदोष कोणते आहेत याची चर्चा करून वरील प्रश्नाच्या उत्तरपक्षाकडे म्हणजे हुकूमशाही राज्यसंस्थेकडे वळलों. युरोपांतील एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील प्रमुख प्रमुख हुकूमशहांचीं वैयक्तिक स्वरूपें दोन प्रकरणांत वर्णिलीं, अर्वाचीन हुकूमशहांचें अधिष्ठान आधुनिक राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेवर

असल्यानें तिचें परीक्षण त्यानंतर करून पुढील प्रकरणांत या झोटिंगशहांनीं मानवी संस्कृतीवर गंडांतर कसें आणलें व त्यासाठीं आधुनिक लोकशिक्षण व नैतिक मूल्यांच्या कल्पना यांचा मनमुराद उपयोग त्यांनीं कसा करून घेतला हें विस्तारपूर्वक सांगितलें. इतका वेळ चर्चिलेल्या हुकूमशाही राज्यसंस्थेविषयीं समालोचनापर प्रकरण त्यानंतर मुद्दाम घातलें. हें झालें आजच्या जगाचें सविस्तर परीक्षण. आजच्या जगाच्या गर्भाशयांत जन्म घेण्यास धडपडणाऱ्या उद्यांच्या जगाचें स्वरूप कसें असेल हेंहि थोडेंफार सांगण्याचा मी त्यानंतर प्रयत्न केला असून उद्यांच्या जगांत लोकशाहीचें अमरत्वच मनुष्याच्या अनुभवास येईल. हा माझा निश्चित प्रयास वाचकांना मी कळविला आहे. शेवटीं लोकशाहीच्या प्रयोगास हिंदुस्थानांत कायकाय अडचणी व अडथळे आहेत यांचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे.

झालें, प्रस्तावनेचें कार्य संपलें. माझ्या पुस्तकाचें हस्तलिखित तयार करण्याचे कामीं माझे स्नेही श्री. अनंतराव लाटकर बी. ए. व तें दुरुस्त करण्याचें क्लिष्ट काम माझे मित्र श्री. धों. र. तेंडुलकर यांनीं मोठ्या आनंदानें करून मला उपकृत केलें आहे. तसेंच पुस्तकाच्या सजावटींत भर घालण्यासाठीं श्री. शंकरराव किर्लोस्कर व श्री. गोपीनाथ तळवलकर यानीं सुंदर चित्रें पुरविलीं. पुस्तकाच्या त्वरित प्रकाशनाच्या कामीं माझे स्नेही श्री. शंकरराव कुळकर्णी यानीं आपुलकीनें अत्यंत परिश्रम घेतले आहेत हेंहि नमूद करावयास पाहिजे.

माझ्या पहिल्या पुस्तकाप्रमाणेंच याहि पुस्तकास योग्य तो आश्रय.........
हो पण ! रसिकांच्या जवळ ही प्रार्थना करावयास हवी काय ?

कोल्हापूर
५ सप्टें. १९४०

लेखक

# अनुक्रमणिका

# आधारभूत ग्रंथ


1. Modern Democracies. Vol. I & II —Bryce
2. Democracy In Crisis —Harold Laski
3. Dictatorship ( History & Theory ) —Cobban
4. Democracy —J. A. Hobson
5. Democracy After The War —J. A. Hobson
6. Political & Economic Democracy —Max Ascou
7. Democracy In The Dock —Gideon Clark
8. Marxism
9. Marxism Is Dead —Brij Narain
10. Crisis Government —Lindsay Rogers
11. Problem Of Socialist Government —S. Cripps
12. Which Way To Peace ? —Bertrand Russel
13. The Universal Aspects Of Fascism —Barnes
14. Why Democracy ? —Hudson
15. European Dictatorships —Sforza
16. Intelligent Man's Guide To Europe —Coles
17. State And Sovereignty In Modern Germany—Emerson
18. Democratic Despotism —L. Desvernine
19. I Will Not Rest —Romain Rolland
20. Where Stands Socialism To-day ? —S. Cripps
21. The Economic Foundations Of Fascism —Einzing
22. Dictators And Democracies To-day —Martin
23. After The Deluge —L. Woolfe
24. Socialism In Evolution —Coles

Etc. Etc.



हिटलरचा फावल्या वेळांतील छंद

[ १ ]

# लोकशाहीचे भगत आणि निंदक

## जादूचा दिवा

प्रत्येक युगांत जादूच्या कंदिलाप्रमाणें एकेका कल्पनेस नसतें महत्त्व प्राप्त होतें; आणि सर्वसाधारण मनुष्य त्या कल्पनेनें पुरा भारावून जातो. चालू विसाव्या शतकांत "लोकशाही" या लक्षवेधक शब्दाची वा कल्पनेची गत तीच झाली आहे.

फक्त वसंतऋतु प्राप्त होण्याच्या वेळीं कोकिळा गोड कूजन करूं लागते; पण एकदां का लोकांना एका विशिष्ट कल्पनेचा ध्यास लागला कीं वेळीं अवेळीं आणि वाटेल त्या क्षेत्रांत त्या कल्पनेच्या नांवानें ओरडण्याची जन्मजात खोड त्यांना लागलेली असते. एकाद्या कल्पनेचा उदोउदो करण्यास एकदां सुरवात झाली कीं त्या कल्पनेची उत्सवमूर्ती विसर्जन पावेतों तिची टाळ कुटण्यांत ते अहोरात्र मोडतील. असेंच लोकशाहीचें झालेलें आढळेल.

अशा बेफाम स्तुतीस लोकशाहीच्या प्रत्यक्ष व्याख्येपासून सुरवात होते. कोणी तिला " लोकांच्या ठिकाणीं वसलेली अंतिम राजसत्ता उर्फ सार्वभौमत्व " म्हणेल, तर कोणी तिला " बहुजन समाजाचें राज्य " असें म्हणेल. तिची व्याख्या करतांना " लोकांच्या हिताकरितांच लोकांकडूनच चालविलें जाणारें लोकांचेंच

राज्य अशी निर्दोष शब्दरचना करून त्याबद्दल कोणी प्रौढी मिरवील. कोणी ' स्वातंत्र्य, समता व बंधुत्व ' हीं तिचीं मूलभूत तत्त्वें " म्हणून सांगेल, तर कोणी तिला " ज्या स्थितीमध्यें व्यक्तीला आपल्या सर्व जीवनाची व परिश्रमाची सार्थकता करता येते अशी राजकीय परिस्थिती " असें म्हणेल. " समाजांतील जास्तींत जास्त—नव्हे सर्वच्या सर्व—लोकांचें कल्याण साधणारी घटना " असें कोणी तिला संबोधील, तर कोणी तिची व्याप्ति " राजकीय, आर्थिक सामाजिक व्यावहारिक समते " पर्यंत नेईल.

उत्तमोत्तम शहाण्या लोकांच्या नेतृत्वाखालीं सामाजिक उन्नति साधणारी व मनुष्याच्या निसर्गदत्त हक्कांचें प्रतिपालन करणारी म्हणून लोकशाहीला कोणी उचलून धरील. लोकांना चोख व निःपक्षपाती न्याय देणारी योजना लोकशाहींत असल्यानें तिच्या निर्वेध संचारासाठीं जगांत चिरकाल शांतता पाहिजे असा कोणी हट्ट धरील. नित्य चंचल अशा राज्यसंस्थेच्या इतिहासांत; न्यायाच्या पाया-वर उभारलेली व लोकांचें स्वातंत्र्य अबाधित राखणारी राज्यसंस्थेची परिणत अवस्था म्हणून कोणी तिचे गोडवे गाईल. एकूण शैक्षणिकदृष्ट्या मनुष्याचे अंतिम हेतू साध्य करून देणारी, आर्थिकदृष्ट्या मनुष्य जीवनांतील अनेक कूट प्रश्न सोडविणारी, ऐतिहासिकदृष्ट्या उत्क्रांतीच्या पायऱ्या चढत चढत शेवटचा टप्पा गांठणारी, नैतिकदृष्ट्या मनुष्यांच्या सद्गुणांना अनुभूति प्राप्त करून देणारी, फार काय, धार्मिकदृष्ट्यासुद्धां धर्मांचें अंतिम साध्य प्रत्यक्षांत आणणारी, म्हणजेच भूलोकावर प्रत्यक्ष परमेश्वराचें राज्य निर्माण करणारी अशी लोकशाही ही एक अजब जादू मनुष्यांस अनेक वर्षांच्या तपश्चर्येनें लाभलेली आहे.

## लोकसत्तेची अवहेलना

देवाच्या मूर्तीवर जितकीं ताजीं फुलें मुबलक व विपुल तितका तिच्यावरील निर्माल्यहि अधिक. त्याप्रमाणें लोकशाहीवर इतकी स्तुतिसुमनें उधळल्यावर, तिच्यावर अमर्याद निंदेचा मारा करणारीं माणसें निघावींत यांत कांहींच नवल नाहीं. या निंदकांची परंपरा फार प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. तींत प्लेटो, ॲरिस्टॉटल यांच्यासारख्या सात्विक लोकांपासून तो रोझेनबर्गसारख्या खटयाळ लोकांपर्यंत सर्वांचा भरणा आहे.

सारख्या योग्यतेचे असोत वा नसोत; सर्वांना एकाच मापानें मोजले जातें असें पक्षोपपक्षांनीं बुजबुजलेलें व कोणत्याहि कायद्याशिवाय चाललेलें

राज्य म्हणजे लोकशाही असें प्लेटो म्हणतो. राज्यसंस्थेंतील अत्यंत गचाळ व टाकाऊ प्रकार अशी ॲरिस्टॉटल लोकशाहीवर टीका करतो. कुत्र्याच्या मुतापासून शेणांत उगवणाऱ्या पावसाळी छत्रीप्रमाणें राज्यसंस्थेच्या इतिहासांत उगवणारी आगांतुक घटना अशी हेन्री मेन्स तिची हेटाळणी करतो.

येथून पुढें निंदकांनीं लोकशाहीची केलेली अवहेलना श्लील शब्दांत देण्याच्या लायकीचीसुद्धां नाहीं हें पुढील कांहीं मासल्यांवरून दिसून येण्याजोगें आहे. " राज्यसंस्थेस झालेला गर्भपात, " ' नालायकी व अज्ञान यांचा मूर्तिमंत पुतळा, ' ' नैतिक व बौद्धिक अधोगतीस नेणारी रचना, ' ' लोकांना अश्लील व वाईट गोष्टी शिकविणारी संस्था,' ' प्रतिभेचा खून पाडणारी व स्वार्थी गुंडगिरीस चालना देणारी संस्था ', ' लोकांना काय वाटेल ते करण्याची सर्रास सवलत देऊन, त्यांच्या अरेरावीस व हरामखोरीस पूर्ण मुभा देणारी संस्था,' 'राजकारणांत जाडजुडांचें प्रस्थ, पाजी लोकांचा कड व राष्ट्रांत भेदभाव पाडणारी अशी ही लोकशाही उर्फ बेबंदशाही दुर्दैवानें मनुष्याच्या वांटयास आली आहे. स्वतः दुखण्यानें पछाडलेला पण प्रत्येकजण दुसऱ्याची सेवाशुश्रुषा करण्याकरितां दाईपण पत्करतो अशी लोकशाही ही एक विचित्र कल्पना आहे. म्हणजे स्वतः ज्ञानानें व अनुभवानें पांगळा असलेला इसम स्वतःची सुधारणा करण्याऐवजीं इतरांच्या सेवेच्या बढाया झोंकतो आहे असेंच दृश्य लोकशाहींत दिसतें. अगाध गोष्टींनीं मनुष्याला भोंवळ आणणारें अद्भुतरसप्रधान नाटक म्हणून सुद्धां एका टीकाकारानें लोकराज्याची थट्टा केलेली आहे.

वर लिहिलेली लोकशाहीची स्तुति व निंदा यांचा थोडासासुद्धां समन्वय घालणें कठीण जाईल. उदाहरणार्थ, कोणी लोकशाही आत्मस्फूर्तीस चालना देते असें म्हणतात, तर कोणी आत्मस्फूर्तीचा खून पाडते असें म्हणतात. जगांतील सर्व माणसांना ती समानतेनें वागविते असें कोणी म्हणतात, तर मनुष्यांत उच्च-नीच वर्ग ती निर्माण करते असेंहि कोणी म्हणतात. अशा अनेक परस्पर-विरोधी व्याख्यांचा समन्वय घालणाराचें डोकें ताळ्यावर राहील कीं नाहीं याची शंका वाटते.

## जादूचें हृद्गत

लोकशाही पूर्णत्वास पोंचली तरी ती मनुष्यास लाज आणणारी गोष्ट आहे व ती स्थिर व सुरक्षित राज्यसंस्था नसल्यामुळें लवकरच आत्मघात करून घेईल

अशीसुद्धां भविष्यवाणी एका बहाद्दरानें ऐकविली आहे. आणि याच्या समर्थनार्थ विसाव्या शतकांतील लोकशाही या राज्यसंस्थेची जगांतील वाढती लागवड कशी अपेशी ठरली, कोट्यावधि लोकांना झालेला भ्रम तिच्या कटु अनुभवामुळें कसा नाहींसा झाला, व हुकुमशहारूपी मोठमोठे वृक्ष कसे जोरानें फोंफावले इत्यादि साग्रसंगीत इतिहास ते मोठ्या हौसेनें सांगतात.

या सर्वांच्या बुडाशीं माझ्यामतें लोकशाही वा लोकसत्ता या कल्पनेविषयींचें गाढ अज्ञान हेंच आहे. लोकमताचें वा लोकसत्तेचें नांव घेऊन वरचेवर आरडाओरडा केला, म्हणजे कांहीं मनुष्य लोकमतवादी वा लोकसत्तावादी बनत नाहीं. लोकशाही अगर लोकसत्ता या शब्दाचा हजारों वेळ उपयोग करणाऱ्या शहाण्या माणसांनासुद्धां त्याचा अर्थ पुरा उमगलेला नसतो मग साध्याभोळ्या जनतेची गोष्ट तर दूरच राहिली. तोंडावाटे व लेखणीद्वारें तिच्या नांवानें भरमसाट स्तुतिसुमनें किंवा शिव्याशाप देण्यांत जरी मनुष्यानें कितीहि विद्वत्ता दाखविली तरी तिचा अर्थ त्याला समजला असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. विज्ञानाच्या काळांतल्या या शतकांत लोकशाही ही दृष्टिवेधक जादूची कल्पना आहे असें म्हणण्याचें रहस्य हेंच. पण त्या जादूचें हृद्गत अद्याप संदिग्ध आहे. मग वाटल्यास तुम्हीं लोकशाहीचें मर्म अद्याप निद्रिस्त आहे असें म्हणा किंवा बेशुद्ध अवस्थेंत आहे असें म्हणा.

## लोकराज्याचीं लक्षणें

लोकशाही ही मुख्यतः राजकीय अर्थानेंच रूढ आहे. लोकशाही या राजकीय तत्त्वाची अंमलबजावणी करणारा एक विशिष्ट राज्ययंत्राचा प्रकार म्हणून बहुतेक लोक तिच्याकडे पाहतात. राजकीयदृष्ट्या लोकांच्याकडून चालविलें जाणारें राज्य यापेक्षां कमी अगर जास्त अर्थ त्यापासून निष्पन्न होत नाहीं. इ. स. ५ व्या शतकापासून तो तहत आजतागायत, ज्यांनीं ज्यांनीं या लोकशाहीचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला त्या सर्वांच्या म्हणण्यांत ही गोष्ट प्रामुख्यानें दिसून येते. पांचव्या शतकांत हिरोडोटस् यानें तिचा अर्थ " बहुजनसमाजाचें राज्य ( Multitude's Rule ") असा केला, थ्यूसिडिडस् यानें तिचा अर्थ " राज्यकारभार थोड्यांच्या हातीं नसून पुष्कळांच्या हातीं असणें " असा केला. " सर्वांत शेवटीं राज्याची अंतिम सत्ता लोकांच्या ठिकाणीं एकवटली जाणें " यास लोकशाही असें सिसेरोनें म्हटलें. " सर्व सत्तेचा उगम लोकांपासून होतो म्हणून ती उत्कृष्ट " असें

स्पिनोझानें शिफारसपत्र दिलें. " लोकांच्या कल्याणासाठीं लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें चालविलेलें राज्य " म्हणून लिंकन संबोधितो. " बहुसंख्याकांच्या इच्छेनें व आकांक्षेनें चालणारें राज्य " असें ब्राईस म्हणतो. देशाचीं मुख्य धोरणें व वरिष्ठ अधिकाऱ्यांची निवड लोकांकडून झाली कीं त्यास प्रोफेसर विल्बॉय लोकशाही म्हणणार.

लोकशाहीच्या तात्त्विक व्याख्या कशा संदिग्ध आहेत यांचीं हीं उदाहरणें झालीं. थोडेंसें आडमार्गानें गेल्यास लोकशाहीची व्यावहारिक कल्पना सुस्पष्ट करतां येते. व्यावहारिकदृष्ट्या लोकशाहीचीं दोन मुख्य लक्षणें सांगतां येतील. ( १ ) देशांतील प्रत्येक नागरिकाला मत बनविण्याचा व तें प्रदर्शित करण्याचा हक्क आहे. म्हणजेच प्रत्येक नागरिकाच्या अंगीं आपल्या देशाचा राज्यकारभार पाहण्याची असलेली पात्रता ( २ ) आणि देशाचा राज्यकारभार लोकांच्या सक्रिय संमतीनेंच चालला पाहिजे. थोडक्यांत सार्वत्रिक मतदान व बहुसंख्याकांच्या मताचा अंमल हेच लोकशाहीचे दोन आधारभूत स्तंभ होत.

लोकशाहीप्रधान राज्यांत राज्यकारभार प्रत्यक्ष लोकांनीं चालवावयाचा का अप्रत्यक्षरीत्या प्रतिनिधिद्वारा चालवावयाचा हें सध्यांच्या आंतरराष्ट्रीय तंट्यांचें मूळ आहे. पहिल्यामध्यें गोंधळ, बेजबाबदारी, बेबंद कारभार इत्यादिकाचें भय तर दुसऱ्यांत आपमतलबी स्वार्थी लोकांच्या कटाचें भय. देशांतील सर्व नागरिकांनीं एकदां जमून विचारविनिमय करावा, निवाडा द्यावा आणि कारभार हांकावा ही गोष्ट सांगावयाला सोपी आहे. पण अंमलबजावणीस जवळ जवळ अशक्य ! यामुळेंच संपूर्ण लोकशाहीऐवजीं तिच्या तत्त्वांचे कांहीं अंश राज्यसंस्थेनें आत्मसात केल्याकारणानें तिचे अनेक प्रकार झाले. कोणतीच राज्यपद्धति अगदीं सर्वस्वी नवीन असूं शकत नाहीं. जुन्या अनुभवांची भेसळ नवीनांत असावयाची, पण कांहींही झालें तरी या सर्व प्रकारच्या राज्यसंस्था लोकशाहीप्रधानच होत. पण लोकांची इच्छा तरी ओळखावयाची कशी ? लोकांच्या इच्छेची म्हणजे मतांची नुसती बेरीज करावयाची का मत देणाऱ्याच्या लायकीप्रमाणें त्यांना निरनिराळी किंमत देऊन त्यांची बेरीज करावयाची ? कशाही रीतीनें बेरीज केली आणि समाजाचें अमुक एक मत असें ठरलें, तर त्यांत व्यक्तीची इच्छा बुडणार नाहीं काय ? एकूण जेथें खरी लोकसत्ता व लोकमत हें निश्चित सांगतां येत नाहीं, तेथें लोकसत्ताक राज्यपद्धतीचा अमुक एक नमुना म्हणून

निश्चितपणें सांगतां कसें येईल ? लोकमत वाहत्या प्रवाहाप्रमाणें असतें त्या प्रवाहा-वर क्षणोक्षणीं उमटणाऱ्या लाटांचे आकार कोणाला सांगतां येतील ?

याशिवाय लोकशाहीची मर्यादा राजकीय क्षेत्रापुरतीच संकुचित ठेवावयाची का तिच्या कक्षेंत आर्थिक, सामाजिक इत्यादि सर्व बाबींचा समावेश करावयाचा हाही एक सध्यां महत्वाचा प्रश्न आहे.

## लोकशाहीच कां हवी ?

लोकशाही म्हणजे लोकांचें राज्य ही सुबोध व सुटसुटीत व्याख्या ठीक झाली. पण लोकांचेंच राज्य कां हवें असें कोणी विचारल्यास त्यास समर्पक उत्तर काय देतां येईल ? राजकीय तत्त्व म्हणून लोकशाही हवी असें कोणी म्हणणार नाहीं. कारण मुळांत प्रश्न असा कीं राजकीय लोकशाही हवीच कां मुळीं ? राज्यसंस्थेची शेवटची परिणत अवस्था हें साध्य म्हणून लोकशाहीचा स्वीकार करावयाचा का राज्यसंस्थेस परिणत स्वरूप प्राप्त व्हावें याकरितां साधन म्हणून तिचा स्वीकार करावयाचा ?

खरोखरी पाहिलें तर राज्यसंस्था हें कांहीं साध्य नव्हे तर तें एक साधन आहे. लोकराज्य सर्वोत्तम म्हणून कोणी तें स्वीकारीत नाहीं. उलटपक्षीं तें इतर राज्यव्य-वस्थेपेक्षां अधिक निकृष्ट व कमी कार्यक्षम असण्याचाच संभव जास्त. पण मनुष्य नेहमीं सुराज्यापेक्षां स्वराज्यच हवें अशी आकांक्षा बाळगतो. कारण त्यायोगें आपल्या तक्रारींची योग्य दाद लागते आणि प्रत्यक्ष राज्य चालविण्याचें समाधान लाभतें असें त्याला वाटतें. आणि तें बहुतांशीं खरेंहि आहे. ब्राईसनें लोकशाहीचें उद्दिष्ट म्हणून पुढील गोष्टी याकरितांच सांगितल्या आहेत. देशांतील प्रत्येक नाग-रिक राजकारणांत योग्य तो भाग घेणारा, लायक अशा लोकांना निवडणारा निस्वार्थी देशभक्त असला पाहिजे. म्हणजे देशाची परिस्थिति जाणून आपल्या व्यावहारिक ज्ञानाच्या जोरावर तो हें कार्य करीत राहतो. त्याची अंगभूत प्रेरणा व उत्साह निवडणुकीच्या संग्रामांतून त्यास पार पाडतात. एवंच देशांतील प्रत्येक नागरिक मतदानास पूर्णपणें जागरूक व लायक झाला कीं लोकशाहीनें स्वर्ग गांठला हें ब्राईसचें म्हणणें.

राजकीय लोकशाही साधनभूत ठरली तर तिचें साध्य कोणतें असा प्रश्न उद्भवतो. याचें सारांशरूपानें असें उत्तर देतां येईल कीं सामाजिक घडी बसवणें. लोकशाहीच्या प्रसारास लोकांच्या ठिकाणीं कांहीं विशिष्ट गुणधर्म हवेत असे अनेक

विद्वान् लेखक म्हणतात. त्यांच्या मतें कायदा व नीति यांची फारकत होऊं लागली म्हणून सध्यांची घोंटाळ्याची परिस्थिति प्राप्त झाली. एकूण लोकशाहींत विशेषतः राज्यसंस्थेचें अधिष्ठान नैतिक पायावर असल्यानें, मनुष्याचा नैतिक दर्जा वाढविणें हें लोकशाहीचें साध्य म्हणून मान्य केल्यावांचून गत्यंतर नाहीं.

ही लोकशाहीची कल्पना एकदां मान्य केली कीं तिची व्याप्ति केवळ राजकीय क्षेत्रापुरती मर्यादित न राहतां, एकंदर समाजाच्या व व्यक्तीच्या अंतिम कल्याणापर्यंत वाढविणें भाग पडतें. लोकशाही म्हणजे राज्यसंस्थेचा एक प्रकार नसून, 'जास्तींत जास्त समानता प्राप्त झाली आहे अशी सामाजिक स्थिति' असें टॉकव्हिल म्हणतो. 'समाजसुधारणा व व्यक्तिविकास साधणारी एक संस्था' असें त्यास क्रोली संबोधितो. या सर्वांचें रहस्य हेंच कीं लोकशाहीची खरी परीक्षा व्यक्तीच्या वाढत्या विकारांतच दृग्गोचर होते. या दृष्टीनें सर्व साधारण मतदार आपल्या मतास कवडीमोल समजतो किंवा फारतर निवडणुकीच्या मोसमांत येणाऱ्या भावास वा मोलास तो एक जिन्नस म्हणून समजतो तें किती चुकीचें आहे हें उघड होईल. या सर्वांचें कारण तो त्यास निव्वळ 'मत' समजतो. राज्यकारभाराच्या नित्य व्यवसायांतील एक रिकामटेकडा उद्योग म्हणून मतदार त्याकडे पाहतो. खरें म्हटलें तर व्यक्ति व समाज यांच्या विकारांचें विनामूल्य साधन म्हणून त्याकडे त्यानें पाहावयास हवें.

मनुष्याच्या सर्वांगीण विकासासाठीं त्याला कांहीं विशिष्ट हक्क दिलेले आहेत. लोकशाहींतील मानवी हक्कांचें स्वरूप कोणतें हें पुढील प्रकरणांत पाहूं.

[ २ ]

# लोकशाहींतील मानवी हक्क

ऐतिहासिकदृष्ट्या लोकशाही मनुष्याच्या हक्करक्षणाकरतां निर्माण झालेली दिसेल. आपल्या हक्कांना राजकारणांत निश्चित स्वरूप प्राप्त करून घेण्यासाठीं मनुष्यानें अविश्रांत प्रयत्न केले आहेत. आणि या हक्कांना ठाम शाश्वति लोकशाहींत मिळते असा त्याचा विश्वास आहे. म्हणून लोकशाहीला आव्हान दिलें गेलें कीं मनुष्याच्या अंतिम हक्कांची लाट नेहमीं उसळते. युरोपांतील या हक्काबद्दलच्या कल्पनेची व्याप्ति अमेरिकेंतील लोकशाहीवाल्यांनीं वाढविली. मनुष्याच्या हक्कांचें रक्षण करण्याकरितांच राज्यसत्ता अस्तित्वांत येते व असते असा निर्णय या नवीन जगानें दिला.

## हक्काचा मायाबाजार

मनुष्याला हक्क आहेत हे म्हणणें निराळें, आणि खरोखरी ते आहेत व असतात हें सिद्ध करणें निराळें. मनुष्याला जन्मसिद्ध हक्क आहेत हें म्हणणें सोपें आहे. पण तें शाबीत करण्याचा प्रसंग आला म्हणजे मात्र कठीण प्रसंग येतो. उदाहरणार्थ : उद्यां कांहीं थोडे लोक आत्महत्येचा जन्मसिद्ध हक्क प्रत्येक मनुष्यास आहे असें म्हणून भांडून तो प्रस्थापित करूं लागले तर तुम्हीं तें चूक कसें म्हणणार व हें

तुमचें म्हणणें शाबीत कसें करणार ? सक्तीनें कदाचित् त्यांना गप्प बसवाल. पण त्यामुळें तुमचें म्हणणें सिद्ध होत नाहीं.

जागतिक नियमच सांगायचा झाला तर तो असा ठाम सांगतां येईल कीं हक्कांची स्थापना विकारवशतेनें होते आणि त्यांचा खूनही पण विकारवशतेनेंच पडतो. हक्काच्या सर्व भानगडींत बुद्धीला मुळीं कामच नाहीं. सर्व विकारांचा खेळ. विशेषतः कोठल्याहि क्रान्तीच्या व लढयाच्या वेळीं हक्कांच्या जाहिराती हटकून फडकावल्या जातात. हक्क म्हणून संबोधिलेल्या सर्व गोष्टी एकत्रित केल्या तर तो एक छोटासा मायाबाजारच बनेल. त्यामध्यें परस्पराशीं विसंगत व विरोधक अशा-सुद्धां अनेक गोष्टी सांपडतील. उदाहरणार्थः राजाचे दैवी हक्क विरुद्ध लोकांचे प्रत्यक्ष हक्क; भांडवलवाल्यांचे हक्क विरुद्ध मजुरांचे दुर्लंघ्य हक्क; खुल्या व्यापाराचे हक्क विरुद्ध राष्ट्राच्या आर्थिक स्थैर्याचे हक्क अशा अनेक रामबली विरोधक हक्कांची नेहमीं कुस्ती जुंपलेली आढळेल. त्यामध्यें कधीं पहिल्याची तर कधीं दुसऱ्याची सरशी होत राहते, पण कुस्तीचा अखेरचा निकाल मात्र लागत नाहीं. या हक्कनिर्णयाच्या घनदाट जंगलांतल्या दलदलींत जरी अनेक लेखकांचीं सैन्यें गडप झालीं असलीं तरी त्यांतून अनेक कुशल सेनापतींनीं मार्ग शोधून काढले आहेत. निव्वळ शब्दजालानें प्रथमदर्शनीं घाबरण्याचें आपणांस कारण नाहीं.

## हक्क आणि कायदा

व्यक्तीला हक्क कोणते असा प्रश्न कोणी केला तर, जे हक्क राष्ट्र व्यक्तीला बहाल करतें ते असें चटकन् उत्तर त्याचें देतां येईल. राष्ट्राची इच्छा नेहमीं कायद्याच्या स्वरूपांत व्यक्त होत असल्यामुळें, कायद्यानें दिलेले हक्क अशी भाषा आपण व्यवहारांत वापरतों. पण सर्वच्या सर्व हक्क प्रत्यक्ष कायद्यानें दिले आहेत काय ? कायद्यांत प्रत्यक्ष निर्देश नसलेल्या हक्कांना आपण हक्कांचे खोटे आविर्भाव म्हणणार काय ? एखाद्या कायद्याला सर्व हक्कांचें उगमस्थान बनविलें तर तो कायदा तरी स्थिर व कायम कोठें आहे ? कायदा हा अत्यंत अस्थिर व नेहमीं बदलणारा असा आहे. मग तदनुसार लोकांचे हक्कही बदलतात असें मानणें भाग आहे. आधुनिक कालांत प्रत्येक देशांत नव्या कायद्यांचें भरभराट पीक येतें, तर वाळलेल्या जुन्या कायद्यांचा पालापाचोळा हवेंत उडतो. या कायद्याच्या बदलत्या स्वभावधर्मामुळें मनुष्यास नवीन हक्क मिळतात, जुने हक्क बुडतात, कांहींना मुरड घातली जाते इत्यादि गोष्टी खऱ्या मानाव्या लागतील. हक्काच्या कायदेशीर व्याख्येमुळें हा गोंधळ

झाला. व हक्काची कल्पना सुबोध होण्याऐवजीं दुर्बोध मात्र झाली. विख्यात कायदेपंडित असा निर्वाळा देतात कीं हक्कांचें अधिष्ठान कायद्यावर आहे, कायदा हक्कांचें रक्षण करतो व कायद्याचें संरक्षण नाहींसें झाल्यावर मनुष्याचे हक्क बुडतात. हें जरी सर्व खरें असलें तरी कायदा हा कांहीं मनुष्याचे मूलभूत हक्क निर्माण करीत नाहीं किंवा असले हक्क त्याला बहाल करीत नाहीं. शिवाय कायद्यांत समाविष्ट न झालेले असे अनेक हक्क मनुष्याला आहेत असें दाखवितां येईल. उदाहरणार्थः विचार स्वातंत्र्य हें कोणत्या कायद्यानें व्यक्तीला दिलें आहे ? विचार स्वातंत्र्याच्या हक्कावर फक्त परिस्थितीचें नियंत्रण लादतां येईल पण तें अजिबात काढून घेतां येणार नाहीं.

## राजा व प्रजा यांच्यामधले करार.

हक्कनिर्मितीचा छडा लावण्याचे प्रयत्न आजवर अनेक झाले पण ते सर्व फोल ठरले. कसें तें थोडेंसें पाहूं. राजा व प्रजा यांच्या दरम्यान सत्तेच्या देवाणघेवाणाचे करार ( Contract Theories ) होऊन सरकार निर्माण झालें असें म्हणणारांच्यावर आज मनुष्याचा विश्वास बसत नाहीं.

युरोपात अशा कराराची आपापल्यापरीनें उपपत्ति लावणारे हॉब्स, लॉक आणि रूसो हे प्रसिद्ध तत्त्ववेत्ते होऊन गेले. इंग्लंडांत पहिली राज्यक्रांती होऊन स. १६४८ मध्यें पहिल्या चार्लसचा शिरच्छेद झाला. त्यानंतर जी अनिश्चित स्थिति कांहीं काळ इंग्लंडात निर्माण झाली त्या सुमारास हॉब्सनें आपला सिद्धांत मांडला. समाजाच्या आद्यावस्थेंतील बेदिलीनें लोक बेजार झाल्यामुळें त्यांनीं आपापसात करार करून आपल्यावरील प्रभुत्व राजाकडे दिलें. स्वसंमतीनें राजा नेमून सर्वांचें नियमन करण्याची सत्ता त्यांनीं त्याला बहाल केली. राजाच्या हातीं अमर्याद सत्ता असावी व राजा शक्यतर आनुवंशिक असावा इ. हॉब्सचे विचार आहेत यानंतर इंग्लंडांतील सन १६८८ च्या रक्तहीन राज्यक्रांतीच्याप्रसंगीं दुसऱ्या जेम्सनें ' यः पलाय सजीवते ' केलें. त्या सुमारास लॉक पुढें येऊन त्यानें नियंत्रित राज्यसत्तेची तरफदारी केली. राज्य अगर राजा निर्माण होण्यापूर्वी मनुष्याला मुळींच हक्क नव्हते हें त्याला मान्य नाहीं. त्या निसर्गावस्थेंत परमेश्वरी प्रेरणेनुसार मनुष्यमात्रांचे व्यवहार चालत असत व मनुष्याला कांहीं जन्मसिद्ध हक्क होते. पण निसर्गावस्थेंत व्यवहारास चालना देणारे कायदे स्पष्ट नसल्यानें व त्यांचा निःपक्षपाती न्याय देणारा न्यायाधीश नसल्यानें लोकांना नेहमीं अस्वस्थता वाटे.

ती नाहींशी करण्यासाठीं आपले स्वातंत्र्य व हक्क थोडेफार गमावून त्यांनीं राजा व राज्य या संस्था निर्माण केल्या. त्या राजाची सत्ता अर्थातच मर्यादित आहे व त्यावर लोकांच्या इच्छेचें बंधन आहे असें लॉकचे विचार आहेत. वरील दोघांचे विचारांहून भिन्न अशी पूर्ण लोकसत्तेची कल्पना रूसो नामक फ्रेंच तत्त्ववेत्त्यानें पुढें मांडली. आद्यावस्थेंत सर्व मानवीप्राणी स्वतंत्र व समान दर्जाचे होते व त्यांनीं स्वेच्छेनें काहीं कराराच्या अटीवर सरकारला अधिकार सुपूर्त केले. तरी पण सरकारची सत्ता अत्यंत मर्यादित असून, राज्यसंस्थेचें स्वरूप ठरविणें व कायदे घडविणें या गोष्टी समाजाच्या हातीं नेहमीं राहिल्या पाहिजेत असा रूसोचा हट्ट आहे. थोडक्यांत कायदे करण्याचा हक्क व देशांतील प्रभुत्व या दोन गोष्टी लोकांनीं आपल्या हातींच ठेविल्या पाहिजेत असें हल्लीच्या लोकसत्तेचें वैशिष्ट्य निराळ्या भाषेंत रूसोनें प्रतिपादन केलेलें आहे.

एवढें मात्र खरें कीं या हक्कनिर्मितीस एक ऐतिहासिक पार्श्वभूमि ह्या विचारांनीं तयार केली. एक सोईची कल्पना शोधून काढली म्हणून वाटलें तर त्याची पाठ थोपटावी पण त्यापेक्षां अधिक सत्यांश या म्हणण्यांत नाहीं हें विसरतां कामा नये.

## हक्कनिर्मितीच्या उपपत्ति

सत्याप्रमाणें हक्क स्वयंसिद्ध आहेत, त्याला जागतिक मान्यताहि आहे असा कोणी पूर्वपक्ष केला तर एकादी गोष्ट स्वयसिद्ध आहे म्हणजे हा शाबितीचा पुरावा होत नाहीं असा उत्तरपक्ष करता येईल. शिवाय सत्य हें शाश्वत आहे तर हक्कच फक्त कां बदलावे ? याचें उत्तर मिळत नाहीं. हक्कनिर्मिती मनुष्याच्या अंत:प्रेरणेंतून होते ही विचारसरणी बुद्धीला न पटणारी आहे. हक्कदानाचा मक्ता कोणी देवाकडे देईल. अमेरिकेच्या स्वातंत्र्य-जाहीरनाम्यांत निर्मात्यानें मनुष्याला हक्क बहाल केले असे शब्द आहेत. पण हा बिचारा देव तरी सर्व जगभर एक कोठें आहे ? प्रत्येक धर्माप्रमाणें, जातीप्रमाणें, स्थलाप्रमाणें देवाची कल्पना बदलते. मग अशा निरनिराळ्या देवांनीं तेच हक्क सर्व मानवांना दिले, कां वेगवेगळ्या देवांनीं वेगवेगळे हक्क दिले ही पंचाईत पुन्हां आलीच ! देवाचा हवाला देणें हा प्रश्नच मुळांत श्रद्धेचा. त्यांत त्या श्रद्धेच्याही किती चिंधड्या उडतात हें आपण पाहिलेंच.

कोणी या हक्कांचें अधिष्ठान रूढी व सांप्रदाय मानतो. पण यामुळें हक्कनिर्मि-

तीचें मूळ पुरे शोधलें जात नाहीं. कारण रूढी व सांप्रदाय यांचें मूळ काय हें सांगण्याची जबाबदारी शिल्लक राहते. कोणी कोणी हक्कांचें अधिष्ठान शक्तिसामर्थ्यावर ठेवतात. सामर्थ्यवान् माणसाच्या पाठीशीं देव असतो, आणि तो माणूस अंगच्या जोरावर जें जें करील तें तें सर्व योग्य, बरोबर व हक्काचें असें मानण्याकडे यांची प्रवृत्ति असते. 'बळी तो कानपिळी' हा नीतीचा सिद्धांत खरा मानला तर जगांत जंगलातीलच हक्क, कायदा, न्याय इत्यादि प्रस्थापित करावे लागतील. कोणी हक्कनिर्मितीस मनुष्याच्या आद्यावस्थेचा आधार शोधील. सुपीक मेंदूनें मनुष्याच्या प्रथमावस्थेसंबंधीच्या कल्पना वाटेल त्या रचल्या आणि त्या अवस्थेंत अमुक एक हक्क मनुष्यास होते हें मोठ्या कष्टानें सिद्ध केलें (तें शाबीत करतां येणार नाहींच म्हणा, पण केलें) तर त्यामुळें आपला कार्यभाग पुरा होत नाहीं. मनुष्याच्या प्रथमावस्थेंतील सर्वच्या सर्व हक्क आजच्या सुधारलेल्या शतकांत व समाजजीवनांत मनुष्याला असले पाहिजेत असें म्हणण्याचें धाडस कोणीहि करणार नाहीं.

## हक्कांचें नैतिक अधिष्ठान

अखेर मानवी हक्काची कल्पना मुळांत नैतिक आहे हें मान्य केल्यावांचून गत्यंतर नाहीं. आणि म्हणूनच ते दुर्लंघ्य आहेत असें मानण्याची प्रथा पडली. हे हक्क आमच्यापासून हिरावून घेतां येणार नाहींत असें नाहीं, तर ते घेतले जाऊं नयेत अशी आमची तीव्र इच्छा असते. विशेषत: मनुष्यास जीवित, स्वातंत्र्य व सुख या विषयींचे सर्व हक्क असले पाहिजेत हें इष्ट आहे असें आम्हा सर्वांना वाटतें. हक्कांना कायदेशीर स्वरूप दिलें तरच ते परिणामकारक होतात व व्यवहारांत ते मोडणारावर वचक बसतो. कायदा काय आहे व तो कसा असावा या प्रश्नाची चर्चा सर्व शतकांत झाली आहे आणि यांतूनच मानवी हक्कांची वाढ वा छाटाछाट झालेली आढळते.

मानवी हक्क कसे निर्माण झाले हा वाद घटकाभर बाजूस ठेऊं. हक्काच्या काटेकोर व्याख्येसंबंधीं फारशी घांसाघीस न करितां आपण थोडक्यांत असें म्हणूं कीं हक्क म्हणजे अशा काहीं विशिष्ट गोष्टी आहेत कीं त्या मनुष्यास असणें अपरिहार्य आहे. त्या गोष्टी त्याला नाकारणें हा महान् अन्याय आहे किंबहुना तें नैतिक शिस्त झुगारून देण्यासारखें आहे. प्रत्येक राष्ट्राची नैतिक शिस्त व संघटना कायम राहण्यासाठीं मनुष्यास कोणकोणते हक्क असावे याचा विचार त्या त्या

देशाच्या परिस्थितीप्रमाणें व काळाच्या ओघाप्रमाणें करावा लागेल. तोही वाद थोडासा बाजूस ठेऊं.

## हक्कांचें कार्य काय ?

हक्काची पुरेशी कल्पना येण्यास मानवी जीवनांत हक्कांचें कार्य हें पाहणें अगत्याचें ठरेल. व्यक्तीची अंतिम इच्छा परिणत अवस्था प्राप्त करून घेणें आणि आपल्या जीवनाची सार्थकता परिपूर्ण करणें ही असते. अर्थात् ही इच्छा पुरी होण्यास लागणारी योग्य परिस्थिति निर्माण करणें हें प्रत्येक सरकारचें कर्तव्य. सरकार हें कार्य मानवी हक्कांच्याद्वारें पार पाडतें. व्यक्तिविकासाची योग्य ती तरतूद केली कीं हक्कांचें कार्य संपलें. त्या हक्कांची जाणीव प्रत्येक माणसागणिक कमीजास्त असणार व त्या मानानें तो आपला विकास करील. निराळ्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे हक्कांची खरी कसोटी व्यक्तीचें नैतिक कल्याण साधणें ही ठरते. कारण व्यक्तीचा आत्मविकास म्हणजे नैतिकदृष्ट्या परिणत अवस्था प्राप्त करून घेणें यांत आहे. मोठमोठ्या विद्वान् लेखकांनीं व्यक्तीच्या संपूर्ण विकासाला योग्य संधींचा पुरवठा करणें हें मानवी हक्काचें कार्य म्हणून मानलें आहे. प्रोफेसर लास्की म्हणतो कीं ज्या परिस्थितीमध्यें मनुष्याच्या अंगच्या कर्तबगारीस पुरा वाव मिळतो अशी सामाजिक परिस्थिति उत्पन्न करणें हें हक्कांचें कार्य.*

## व्यक्ती आणि समाज

थोडक्यांत, विशिष्ट कुळांत, जातींत, धर्मांत, वर्गांत जन्मल्यामुळें मनुष्यांच्या गुणांचें चीज होत नाहीं व त्याच्या गुणांचा पूर्ण उत्कर्षही होत नाहीं असा समाजांतील नेहमींचा अनुभव आहे. म्हणूनच प्रत्येकाला आपल्या प्रयत्नांनीं वाटेल तें स्थान प्राप्त करून घेण्याची पुरेपूर संधि मिळणें भाग आहे आणि अशी संधि आणून देण्याचें महत्कार्य हक्कांनीं वास्तविक करावयास हवें. व्यक्तीचें व्यक्तिमत्व निव्वळ व्यक्तीपुरतें मर्यादित नसून तो समाजाचा एक घटक आहे हें सर्वांना मान्य आहे. किंबहुना व्यक्ति आणि समाज यांची फारकत करणें

---

*Moral end is the true criterion of rights and this end is self-realisation in some form.

Rights are, in fact, those conditions of social life without which no man can seek, in general, to be his self at his best —Lasky.

अशक्य आहे, कारण त्यायोगें दोघांनाही अर्थशून्यत्व येतें. प्राण व शरीर यांच्या गट्टीप्रमाणें व्यक्ति व समाज यांचे संबंध आहेत. संपूर्ण समाज हें त्याचें शरीर आणि त्या समाजरूपी शरीरांतील अणुरेणूंमध्यें व्यक्ति ही प्राण म्हणून वसलेली आहे. व्यक्तीशिवाय समाज होत नाहीं हें उघड उघड दिसत असल्यामुळें मनुष्य तें तात्काळ मान्य करतो. पण समाजाशिवाय व्यक्तीला व्यक्तिमत्त्व नाहीं हें तितकेंसें स्पष्ट व प्रथमदर्शनीं सुबोध नसल्यामुळें माणसास पटत नाहीं. पण ती गोष्ट पहिल्याइतकीच खरी आहे. व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची व्याख्या दुसऱ्या व्यक्तींच्या म्हणजेच समाजाच्या तारतम्यानें बनवावी लागते ती यासाठीं. अशा व्यक्तिमत्त्वाचे परस्परसंबंध म्हणजेच केवळ समाज नाहीं समाजांत व्यक्तीचें व्यक्तिमत्त्व पुरें गुरफटून गेलेलें आहे. मनुष्य कितीही परमकोटीचा स्वार्थी झाला, तरी तो समाजापासून अलिप्त व अगदीं भिन्न होणें शक्य नाहीं. मानवी संस्कृतीच्या वाढीबरोबर व्यक्तींच्या हितसंबंधाची गुंतागुंत इतकी वाढली कीं त्यामुळें व्यक्तींच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक व सांस्कृतिक हितसंबंधांच्या प्रचंड गुंतावळीच्या जटा बनल्या. अशा तऱ्हेचे सर्व हितसंबंध शाबूत राखण्याची मोठी नाजूक कामगिरी या हक्कांनीं पत्करली. आणि यांतच नेमका पाय घसरला. हें कसें तें आपण पुढें पाहूं.

आपल्या हक्कावर कोणी वरवंटा फिरवूं नये म्हणून परमेश्वरानें मनुष्याला अविनाशी हक्क दिले. राष्ट्रापेक्षां व्यक्ती पुरातन म्हणून ते निसर्गदत्त आहेत असें म्हटलें जातें. त्यात जीवित, स्वातंत्र्य व सुख हीं मुख्य आहत असें मनुष्य नेहमीं म्हणतो. शिवाय माणूस हा एक बुद्धीनें चालणारा प्राणी आहे. आपल्या प्रगल्भ बुद्धीला योग्य वाव मिळाला पाहिजे हा त्याचा हक्क आहे. निराळ्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे मनुष्यास सर्व प्रकारचें स्वातंत्र्य हवें आहे. एवढेंच नव्हे तर तें कोणकोणत्या गोष्टींत कितीकिती प्रमाणांत हवें हें सुद्धां ठरविण्याचा अधिकार त्याला पाहिजे आहे.

## स्वराज्य आणि सुराज्य

व्यक्तीला हक्क राष्ट्राकडून प्राप्त होत नाहीं. राष्ट्र व्यक्तीच्या हक्कांना परिणामकारक स्वरूप, पुरेसें संरक्षण व प्रोत्साहन मात्र देतें. अमेरिकेच्या स्वातंत्र्य–जाहीरनाम्यांत मूलभूत हक्क संपादण्यास राज्ययंत्रें हवींत अशी भाषा आहे. १७८९ च्या फ्रान्सच्या जाहीरनाम्यांत मनुष्याच्या दुर्लभ्य हक्कांची जोपासना

करणें हें राज्यसंस्थेचें मुख्य कर्तव्य मानलें आहे. राष्ट्रानें हक्कांना जन्म दिला नसून राष्ट्र फक्त त्यांचें संरक्षण करतें. राष्ट्राची उत्पत्ति होण्यापूर्वीपासून मनुष्यास हक्क आहेत एवढाच याचा अर्थ आहे. त्या हक्कांना निव्वळ कायदेशीर बळकटी-पेक्षां नैतिक बळकटीचा आधार अधिक आहे.

आतां कोठल्याहि राजसत्तेची जरूरी मनुष्यास कां भासली आणि मानवी हक्क-रक्षणार्थ राज्यसंस्थेची गरज कां लागावी या दोन्ही प्रश्नांचीं उत्तरें वरील विवे-चनावरून देणें सुलभ होईल. व्यक्तींच्या सामाजिक संबंधांचें योग्य नियंत्रण करण्यासाठीं वरिष्ठ सत्ता, सरकार ही पाहिजे. अशा सरकाराचें आद्यकर्तव्य सामाजिक व्यवस्था सुरळीत व निकोप राखणें ही आहे. थोडक्यांत स्थानिक संस्थाप्रमाणें नागरिकांचा नैतिक जीवनक्रम शुद्ध व पवित्र राखणें हे प्रत्येक सरकारचें आद्य कर्तव्य ठरतें.

सामाजिक जीवन नियंत्रित करण्यास जर राज्यसंस्था हवी तरी ती लोक-शाहीप्रधानच का याचें उत्तर आतां अगदीं सोपें आहे. स्वराज्याचा हक्क जन्मसिद्ध आहे आणि स्वराज्याचा हक्क म्हणजेच लोकशाहीचा हक्क असेंहि कोणी म्हणतील. इतर हक्काप्रमाणेंच हा लोकशाही–हक्क शाबीत करण्याचा प्रसंग मनुष्यावर नाइलाजानें आलाच तर त्यांत तो पुन्हां हरल्याशिवाय रहाणार नाहीं. कसलीका राजसत्ता असेना, ती मनुष्यजीवनावर आवश्यक बंधनें लादून मनुष्याचे हक्क रक्षण करते; कायदे, न्याय, चोख कारभार, आणि अंमलबजावणी योग्य रीतीनें करते हें मान्य केल्यावर, तें कार्य लोकशाहीप्रधान राजसत्ता इतरांपेक्षा अधिक चांगल्या रीतीनें करते काय, असा प्रश्न विचारल्यास मनुष्यास निराशेनें "नाहीं" म्हणावें लागेल. कारण लोकशाहीची राजवट ही सर्वसाधारण मनु-ष्याच्या बुद्धीची राजवट आहे. अशा राजवटींत माणसाच्या बुद्धींतील व स्वभावांतील सर्व दोष असणें अपरिहार्य आहे. वास्तविक मनुष्यांस सुराज्य व स्वराज्य या दोन्हीही गोष्टी हव्या असतात; पण या दोहोंपैकीं कोणतें तरी एक मिळेल तें निवड असा सवाल त्याला टाकला तर तो सुराज्यापेक्षां स्वराज्य अगोदर पत्करील. स्वराज्य हें स्वसामर्थ्यावर संपादावयाचें असतें, तर सुराज्य हे आपल्या हातानें आपल्या पदरांत पाडून घ्यावयाचें असतें. स्वराज्य ही एक राज्यकारभारांतील अशी गुरुकिल्ली असते कीं तिच्या योगानें अंगीं शहाणपण आणि इच्छा असल्यास हव्या त्या गोष्टी तेव्हांच मिळूं शकतात.

चूकच होणार असेल ती आमची आम्हीं करूं आणि तिचें प्रायःश्चितही पण आमचें आम्हींच भोगूं. कितीहि निकृष्ट स्वराज्य झालें तरी ते मनुष्यांस प्रिय असते. याचें कारण तें स्वराज्य उपभोगीत असतांना त्यांना आपल्या कर्तृत्वाप्रमाणें व नाशिबाप्रमाणें सुराज्य प्राप्त करून घेतां येतें. स्वराज्याशिवाय असणारें सुराज्य कितीहि उत्कृष्ट झालें तरी त्यानें स्वराज्याची उणीव भरून निघत नाहीं आणि म्हणूनच मनुष्य केवळ सुराज्यांत असंतुष्ट असतो.

## फ्रेंच राज्यक्रांतीचें उदाहरण

फ्रेंच राज्यक्रांतीनें स्वातंत्र्य, समता व बंधुत्व हे लोकशाहीचे तीन आधारस्तंभ ठरविले. एकोणिसाव्या शतकांत राजकीय स्वातंत्र्य जगांत राजरोस वावरूं लागलें. पण राजकीय स्वातंत्र्याचा पुरा उपभोग घेण्याच्या कामीं समाजांतील विषमता अडथळा आणूं लागली. म्हणून समतेचीं तत्त्वें चोरवाटेनें मार्ग चालूं लागली. विसाव्या शतकांत तर स्वातंत्र्याच्या मागणीच्या जोडीस समतेचीहि मागणी झाली. सुमारें विसाव्या शतकाच्या मध्यास म्हणजे एकोणीसशें चाळीस सालांत स्वातंत्र्य व समता या दोन आधारस्तंभापेक्षां बंधुत्त्व हाच आधारस्तंभ मोठा महत्त्वाचा आहे हें मनुष्यास पटूं लागलें. याचें कारण बंधुत्त्व हा मानवतेचा गड्डा आहे. आणि मानवतेवर महान् संकट कोसळल्यामुळें लोकशाहीच्या तत्त्वांची वाच्यता बंद पडण्याची पाळी आली. स्वातंत्र्य व समतेची बढाई मारणाऱ्या रशियानें इतर देशावर अन्यायानें आक्रमण करून आपल्या अंगीं बंधुत्व अजूनहि न आल्याचा जाहीर पुरावा जगांत निर्माण केला. रशियांतील लोकशाहीच्या भ्रमाचा भोपळा फुटला.

बंधुत्वाच्या कल्पना थोड्याशा बाजूस ठेवून स्वातंत्र्य व समता या परस्पर विरोधी हक्कांचा समन्वय कितपत घालतां येतो तें पाहूं.

## समतेचे वेगवेगळे अर्थ

समतेचे दोन तीन अर्थ होऊं शकतील. पहिला असा कीं कांहीं विशिष्ट हक्क सर्वांना सारखे असणें. उदाहरणार्थः आजच्या प्रातिनिधिक राजवटींत मतदानाचा हक्क, निवडणुकीस उभे राहण्याचा हक्क, न्याय कोर्टांत सर्वांना सारखा निरपेक्ष न्याय मिळण्याचा हक्क, कायद्यानें सर्वांना सारखें वागविण्याचा हक्क इत्यादि समान हक्क सर्वांना दिलेले आहेत.

प्रत्येकाची जात, दर्जा व लायकी यांवरून हक्क, कायदा, न्याय व मतें यांची विषम तऱ्हेनें वांटणी होतां कामा नये ही समतेची कल्पना. कोणी यापुढें जाऊन केवळ विशिष्ट हक्कांत समानता नसून सर्व प्रकारच्या हक्कांत समता पाहिजे असा आग्रह धरील. सर्वांना नेमके तेच हक्क तितक्याच प्रमाणांत असले पाहिजेत असा याच्या म्हणण्याचा मतितार्थ.

याच्याहि पुढें मजल मारणारे कविकल्पक महात्मे जगांत नाहींत असें मात्र समजूं नये. हे अकलेचे खंदक निव्वळ हक्कांच्या समानतेनें संतुष्ट नाहींत तर मनुष्यामनुष्यांतसुद्धां मूलभूत समानता स्थापन झाली पाहिजे असा वेडगळ अट्टाहास ते धरतात. निसर्गानें जर सर्व माणसें सारखीं निर्माण केलीं आहेत तर मग मनुष्यानें विषमता कां पाळावी ? सर्वांना सारखेच शारीरिक अवयव जर परमेश्वरानें दिले आहेत तर मूळ धर्माप्रमाणें त्यांच्यांत समान दर्जा कां असूं नये ? म्हणजेच समता हा मानवांचा मूलभूत हक्क म्हणून मांडण्याची भूमिका हे पत्करतात. हक्काच्या समानतेंत व्यक्तीच्या समानतेची कल्पना थोडीबहुत आहे; पण सर्व नाहीं. व्यक्तीला जे हक्क आहेत ते ती समाजांतील एक व्यक्ति म्हणून आहेत. त्या बाबतींत इतर कोणत्याहि गोष्टी विचारांत घेतां कामा नये. निसर्गानें व्यक्तीला बरेवाईट आईबाप दिले. ते आईबाप आपल्या इच्छेप्रमाणें बदलतां येत नाहींत आणि आईबापांमुळें मिळणारी शारीरिक, बौद्धिक आणि सांपत्तिक परिस्थिति त्याला चुकवितां येत नाहीं. निसर्गानें मनुष्यांत उत्पन्न केलेली ही विषमता व्यक्तीला समान हक्क देऊन नाहींशी करतां येईल, एरवी नाहीं; असा यांच्या प्रतिपादनाचा रोख असतो.

शारीरिकदृष्ट्या व्यक्तिव्यक्तींत फारसा फरक असूं शकत नाहीं. पण सर्व व्यक्ती सारख्याच बुद्धीच्या व दर्जाच्या नसल्याकारणानें त्यांच्या कार्यक्षमतेंत फरक पडतो. लहान बालकें, वेडे, खुळे, अबला, प्रौढ, शास्त्रज्ञ, खलाशी, कोळी इत्यादि समाजांतील निरनिराळे घटक बुद्धिमत्तेंत एकसारखे असूं शकतील काय ? वरील सर्व लोक मूलभूत मानण्याच्या दृष्टीनें एक व समान ठरतील. सर्वांना तेच विकार, भावना व आकांक्षा असतील. पण प्रत्येकाची बुद्धि व कार्यक्षेत्र ही केव्हांहि वेगवेगळीच असणार. आणि त्या मानानें त्या व्यक्तींना आपल्या अंगची कर्तबगारी दाखविण्यास पुरेसे हक्क मिळाले, तरच समाजांत समता प्रस्थापित होईल असें कित्येक प्रतिपादन करतील. पण या विचारसरणीमुळें समाजांतील घटका-

घटकांना मिळणाऱ्या हक्कांत विषमता उत्पन्न होते आणि ही विषमता अमर्याद वाढूं लागते. हक्कांची वाटणी अशा रीतीनें प्रत्येकाच्या बुद्धिमत्तेप्रमाणें विषम प्रमाणांत करावी असें ठरविलें तरी ती गोष्ट प्रत्यक्षांत उतरणें अत्यंत कठीण आहे. कारण यासाठीं व्यक्तिमात्राची बुद्धि मोजण्याचें यंत्र माणसाला अगोदर शोधून काढावें लागेल. प्रत्येकाच्या बुद्धीची प्रगल्भता नित्य बदलत असल्यामुळें हें कार्य अधिकच बिकट होईल. शिवाय अशा हक्कांची वांटणी करण्याच्या कामीं परिमाणाच्या बाबतींत मतभेद माजतील. कोणी त्यास गुणांचें परिमाण लावील, तर कोणीं त्यास शिक्षणाचें लावील; कोणी व्यक्तिगत कार्यक्षमता मापील, तर कोणी त्यासाठीं व्यक्तीच्या आंगलटीचीसुद्धां गणना करील.

मनुष्यास पूर्णत्व प्राप्त करून देणें, समाज उन्नतिपर ठेवणें आणि राष्ट्र सुसंस्कृत राखणें हे लोकशाहीचे हेतू आहेत. व्यक्तीला मिळणाऱ्या अधिकाधिक अंतिम हक्कांच्या मोजमापानें सर्वसाधारणपणें राष्ट्राची प्रगति मोजली जाते. प्रत्येक व्यक्तीला वरील गोष्टी साधण्यासाठीं पूर्ण संधि मिळाली पाहिजे व त्या संधीची पूर्ण जाणीव त्याला पाहिजे हेंच लोकशाहीचें गमक सर्वांनीं मान्य केलें आहे ( Each man has his chance and knows that he has it ).

## व्यक्तीची स्वाधीनता आणि स्वातंत्र्य

एक व्यक्तिव्यक्तीमध्यें समानता अगर दुसरी व्यक्तींच्या हक्कांमध्यें समानता ही थोडक्यांत समतेची कल्पना. व्यक्तिव्यक्तीमधील समानतेची कल्पना फलद्रूप होणें प्रत्यक्ष निसर्गानेंच जेथें अशक्य करून ठेविलें आहे तेथें मानवी प्रयत्नाचा काय पाड ? व्यक्तींच्या हक्कांमध्यें समानता प्रस्थापित करणें पुष्कळांशीं शक्य आहे हें आपण वर पाहिलेंच. पण निव्वळ हक्कांच्या बाबतींत समानता असून भागत नाहीं असा नेहमींचा अनुभव आहे. हक्क असले तरी ते बजावण्यास आपण लायक आहों हें प्रत्येकाला दाखविण्याची पुरी संधि मिळाली पाहिजे. मग त्याचा उपयोग तो करो वा न करो. शाळेंतील एकाच वर्गांत अति बुद्धिवान, चलाख, कमी बुद्धीची, लड्डु, मूर्ख अशा सर्व प्रकारचीं मुलें असतात. पण वर्गांत शिकवितांना मास्तर सर्वांना तेंच शिकवितो. प्रत्येक मूल बुद्धीच्या कमीजास्त प्रमाणांत तें ग्रहण करूं शकेल हें निराळें. मास्तर तें शिकविण्यात पक्षपात करीत नाहीं; पण एवढयानें मास्तराचें कर्तव्य संपत नाहीं आणि विद्यार्थ्यांचें खरें कल्याणहि साधत नाहीं. उदाहरणार्थः शाळेंतील अति बुद्धिवान विद्यार्थी वर्गांतील शिक्षण आत्मसात्

करून मास्तरांकडून आपल्या बुद्धीला अधिक खाद्य मिळवूं शकतो. आपल्या बुद्धिमत्तेच्या विकासाला पूर्ण वांव कसा मिळेल याबद्दल तो यत्न करीत असतांना, तो त्याच वर्गात इतरांबरोबर बसतो, उठतो, वागतो व मिसळतो. याला तुम्हीं शिक्षणाच्या बाबतींतील विषमता म्हणणार कां पक्षपात म्हणणार ? तसेंच लोकशाहींतसुद्धां बुद्धिवान व कलावान लोकांना पूर्ण मुभा मिळण्याची सोय केली पाहिजे. आणि अशा प्रकारची सोय हक्काच्या बाबतींत व्यक्तिव्यक्तींमध्यें विषमता निर्माण न करतां साधणें शक्य आहे. बुद्धिवान व कलावान लोकांना विशेष सवलत मिळणें हें कोणत्याहि रीतीनें इतरांच्या हक्काशीं विरोधक वा विसंगत होत नाहीं.

व्यक्तीला स्वातंत्र्य किती असावें याची चर्चा करतांना या बोटावरची थुंकी त्या बोटावर करण्याचा अनावर मोह कित्येकांना होतो. यासाठीं व्यक्तीला लागणारी व्यक्तिगत स्वाधीनता व सामाजिक स्वातंत्र्य ( freedom and liberty ) यांची तुलना नेहमीं केली जाते. यापैकीं व्यक्तिगत स्वाधीनता हा प्रश्न सर्वस्वी खासगी आणि व्यक्तीपुरता मर्यादित असल्यानें त्यापुरतें व्यक्तीनें मनाला वाटेल तसें वागावें. त्यामध्यें "तूं असें वाग आणि असें वागूं नकोस" असें सांगण्याचा इतरांना यत्किंचितहि हक्क नाहीं. याच्या उलट सामाजिक स्वातंत्र्य ही एक सार्वजनिक बाब आहे. तिच्यावर इतरांच्या हक्कांच्या मर्यादा आहेत. आणि ती सापेक्षहि पण आहे. स्वातंत्र्याच्या व्याख्या करण्यामध्यें रुचिवैचित्र्य मनमुराद आढळून येतें. जेफरीनसारखा विद्वान् म्हणतो, "ज्या परमेश्वरानें मनुष्यास जन्म दिला त्यानेंच त्यास स्वातंत्र्यहि दिलें." शीलर म्हणतो, "मनुष्य जरी शृंखलांनीं बद्ध असा जन्मला असला तथापि तो स्वतंत्र असावा म्हणून देवानें निर्माण केला आहे." ( The God who gave us life, gave us liberty at the same time. Man is created free and is free, even though he is born in chains. )

## विश्वासघातकी भूत

स्वातंत्र्याची कल्पना स्पष्ट करण्यासाठीं ज्या ज्या व्याख्या आजवर झाल्या त्या सर्वांचा बिंडा एके ठिकाणीं केला तर त्यांतील मासलेवाईक उदाहरणांनीं मनाची घटकाभर करमणूक खास होईल. स्वातंत्र्याची कल्पना स्पष्ट करण्याच्या बाबतींत मोठमोठे महाभाग थकले व भागले आणि अखेर ती कल्पना मुळांत जितकी संदिग्ध होती तितकीच अद्यापिहि आहे. मादाम रोलंडसारखी लेखिका हताश

होऊन म्हणते, " हे स्वातंत्र्यदेवते, तुझ्या नांवानें मनुष्यानें आपली बुद्धि लावून किती व्याख्यांचा गोंधळ घालावा !" लोकशाहीचा पाया म्हणून त्या अधिदेवतेस कोणी गौरवितो तर कोणी लोकशाही मनुष्याच्या स्वातंत्र्यावर घाला घालते म्हणून तिच्या नांवानें खडे फोडतो. गुलामांच्या पायांतील पाश सोडविणारी म्हणून त्या स्वातंत्र्यदेवीची कोणी प्रशंसा करतात तर कोणी तिच्यामुळें अभिनव गुलामगिरी निर्माण झाली असा दोष देतात. ज्या त्या देशकालवर्तमानपरत्वें व्यक्तीला स्वातंत्र्य असावें व असतें असें कोणी आग्रहानें प्रतिपादील तर कोणी स्वातंत्र्याला " अनर्गलपणाचें किंवा फाजील मोकळिकीचें पोसलेलें मूल " असें म्हणून त्याची हेटाळणा करील. ( The foster child of license-which fools call liberty-Tacitius ). रस्किन अखेर कंटाळून म्हणतो, " स्वातंत्र्यासारखें विश्वासघातकी भूत जगांत दुसरें कोणतेंच नाहीं-किंबहुना स्वातंत्र्य अशी वस्तूच या विश्वांत मुळीं नाहींच." ( " The treachrous fantom which men call liberty-the most treachrous indeed of all fantoms. There is no such thing in the universe.—Ruskin. " )

## स्वातंत्र्य व समतेचा खरा अर्थ

कांहींहि झालें तरी रस्किनचे हे वरील उद्गार मनाला पटत नाहींत हें मात्र खास. कारण स्वातंत्र्य ही वस्तु निदान कल्पनारूपानें कां होईना या विश्वांत आहे यांत मुळींच शंका नाहीं. स्वातंत्र्याची सुटसुटीत आणि सोपी व्याख्या बनवावयाची झाली तर ती अशी बनवितां येईल. मनुष्यानें स्वतः भोंवतीं सामाजिक व बौद्धिक मर्यादांचें एक वर्तुळ स्वतःच बनविलेलें असतें. त्या वर्तुळाच्या कक्षेंत राहून स्वतःचें साध्य व साधनें ठरविण्याचा अधिकार म्हणजेच स्वातंत्र्य होय. या शिवाय दुसरें तिसरें कांहींहि नाहीं. वरील स्पष्टीकरणाच्या अगर व्याख्येच्या दृष्टिकोनानें पाहिलें म्हणजे स्वातंत्र्य हा एक मनुष्याला विशिष्ट हक्क आहे असें म्हणतां येत नाहीं. मनुष्यांला असलेल्या हक्कांचें स्वरूप कसें असावें हें सांगणारी स्वातंत्र्य ही ही एक कल्पना आहे. तसेंच समतेचें आहे. स्वातंत्र्य आणि समता हे व्यक्तीचे स्वतंत्रपणें वेगवेगळे हक्क होऊं शकत नाहींत तर व्यक्तीला असणाऱ्या हक्कांचे ते विशिष्ट गुणधर्म आहेत. प्रकाशांत निळा तांबडा रंग मिसळला म्हणजे जांभळ्या रंगाचा प्रकाश निर्माण होतो. पण जांभळा, निळा अगर तांबडा हा कांहीं त्य प्रकाशाचा मूळ रंग नव्हे. तर त्या मूळ प्रकाशास चिकटविलेला जांभळा हा एक

गुणधर्म आहे. याचप्रमाणें स्वातंत्र्य व समता हे गुणधर्म मानवी हक्कांना मुद्दाम चिकटविण्यांत आले आहेत. मनुष्याच्या संपूर्ण विकासाला स्वातंत्र्य व हक्क हवेत म्हणूनच हक्क व स्वातंत्र्य याची फारकत होऊं शकत नाहीं. एका दृष्टीनें हे हक्क व्यक्तीला अमुकअमुक गोष्टी करण्यास देणाऱ्या परवान्यासारखे असतात. तर दुसऱ्या दृष्टीनें त्याला विशिष्ट गोष्टी करण्यास प्रवृत्त करतात. गुलामांनासुद्धां कांहीं हक्क असतात हें खरें पण त्यायोगें तो कांहीं स्वतंत्र असतो असें कोणी म्हणणार नाहीं. याचें कारण त्याच्या हक्काला स्वातंत्र्याचा गुणधर्म चिकटविलेला नसतो. तसेंच एरवींच्या परिस्थितींतसुद्धां सामाजिक घटना, कायदे, नियंत्रण, हमी इत्यादि असल्याशिवाय व्यक्तीला आपले हक्क पूर्णपणें उपभोगतां येत नाहींत. म्हणूनच नेहमीं म्हणतात कीं कायद्याच्या प्रतिष्ठापनेचें अंतिम ध्येय स्वातंत्र्य आहे. स्वातंत्र्य उपभोगतां यावें म्हणून मनुष्यानें कायद्याची गुलामगिरी आपण होऊन पत्करली आहे.

व्यक्तीचें स्वातंत्र्य सापेक्ष असतें याची कारणपरंपरा अशीच आहे. वाळूच्या ढिगापासून एकादा पुतळा शिल्पकारास तयार करतां येणें अशक्य आहे. ते वाळूचे कण एकमेकांस चिकटून त्यांचा एकजीव होण्यास एकादा चिकट पदार्थच हवा असतो. त्याचप्रमाणें पूर्णपणें स्वतंत्र व सवत्या व्यक्तींच्या समुदायापासून समाज अगर राष्ट्र बनूं शकत नाहीं. त्या व्यक्तींचा एकजीव होण्यास एकादें सामाजिक अगर राष्ट्रीय तत्त्व लागतें. प्रत्यक्ष समाजाला असें स्वतंत्र मन असत नाहीं. व्यक्तीला असलेल्या मनांची बेरीज हेंच समाजाचें मन. समाजाचें मन हें त्यांत समाविष्ट असलेल्या व्यक्तींच्या मनांतूनच खरें वसत असतें. स्वातंत्र्याच्या योगानें व्यक्तीच्या बौद्धिक वाढीस अमर्यादित संधि मिळते; एवढेंच नव्हे तर व्यक्तीच्या सामाजिक आत्म्याचाहि विकास व्हावा असा त्याचा हेतू असतो. इतर सामाजिक प्राण्यांचा विकास, त्यांची वाढ व प्रगति याशिवाय होणें शक्य नाहीं. अर्थात् व्यक्तीचें स्वातंत्र्य इतरांच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें नेहमीं सापेक्षच असलें पाहिजे हें उघड आहे.

## स्वातंत्र्य व समतेची जोडगोळी

स्वातंत्र्य आणि समता यांची नेहमीं जोडगोळी असते. देशांत समता प्रस्थापित झाल्याविना खऱ्या स्वातंत्र्यास सुरवात होत नाहीं. समाजाच्या घटनेमध्येंच जर विषमता असेल तर सर्वांना स्वातंत्र्य सारखें दिलें आहे हें म्हणणें फोल आहे. उदाहरणार्थ सर्वांना सारखा न्याय समानतेनें देण्यांत येईल अशी घोषणा राज्य-

संस्था करीत असली आणि जर तो न्याय मिळण्यास सर्वसाधारण मनुष्यास न झेपण्याइतका खर्च येत असेल तर त्या घोषणेंत कांहीं अर्थ राहील काय? समतेच्या अभावीं स्वातंत्र्य दिलें आहे हें म्हणणें फोल व बाष्कळ आहे. अशा स्वातंत्र्याची कल्पना सांगणारानें सांगावी व ऐकणारानें मान डोलवावी!

यावरून आपणांस हें स्पष्ट दिसतें कीं मनुष्याच्या संपूर्ण विकासाला स्वातंत्र्य समता हे जोडभागीदार आवश्यक आहेत. व्यक्तीच्या व्यक्तिगत आत्मविकासाला स्वातंत्र्य हवें. व्यक्तीच्या सामाजिक विकासाला समता हवी. किंवा दुसऱ्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे व्यक्तीच्या हक्कांचें वैयक्तिक स्वरूप म्हणजे स्वातंत्र्य आणि त्या हक्कांची सामाजिक बाजू म्हणजे समता. स्वातंत्र्य किंवा समता हे विशिष्ट हक्क म्हणून त्यांकडे पाहणें चुकीचें आहे.

प्रत्येक मनुष्याच्या अंगांत भिन्नभिन्न असे पुष्कळसे गुण वा कला असतात. त्या सर्वांचा पुरा उपयोग करून घेण्यास त्याला योग्य ती सवलत वा सत्ता मिळाली तरच त्या स्वातंत्र्याचा आणि समतेचा खरा उपयोग. उदाहरणार्थः संशोधकास संशोधनाकरतां लागणाऱ्या मोठाल्या खर्चाच्या प्रयोगशाळा, चित्रकारास पुरासा रंग व कुंचले, भांडवलवाल्यांना बँका व पेढया इ. इ. त्या त्या व्यक्तीच्या विकासाला आणि साध्याला जरुरीच्या गोष्टी नाहींत कां? वेगवेगळया व्यक्तींना निरनिराळीं साधनें पुरविल्यानें सामाजिक विषमता निर्माण होईल असें कोणाला वाटत असेल तर तें सपशेल चूक आहे. किंबहुना अशा वेगवेगळया लोकांच्या बुद्धीप्रमाणें व कर्तृत्वाप्रमाणें योग्य ती संधि व सत्ता पुरविणें हें स्वातंत्र्य व समता यांचें मुख्य ध्येय आहे. कोणत्याही माणसाचें व्यक्तिमत्व दुसऱ्या माणसाच्या केवळ मर्जीनें दडपलें जातां कामा नये. त्याच्या अंगच्या गुणांचें चीज न होतां मातीमोल ठरणें अगर त्यांचा कोंडमारा होणें योग्य नाहीं. म्हणजेच त्याला आपल्या अंगच्या गुणांचा पूर्ण उत्कर्ष साधतां येईल ( No man's personality suffers frustration to the private benefit of others. )

# [ ३ ]
# प्रातिनिधिक राज्ययंत्राची परीक्षा आणि निदान

लोकशाहीच्या प्रसाराकरतां प्रातिनिधिक राज्यव्यवस्थेची टूम निघाली पण ही प्रातिनिधिक शासनसंस्था धनिक वर्गाची कशी बटीक बनली याचें परीक्षण प्रस्तुत प्रकरणांत करावयाचें आहे. लोकशाहीच्या नांवाखालीं भांडवलशाहीनें कसा धिंगाणा घातला, राज्यसंस्थेतील खरी सत्ता लोकांच्या हातून धनिक वर्गानें कशी उपटली आणि ती टिकविण्यासाठीं काय काय युक्त्याप्रयुक्त्या त्यांनीं आजवर केल्या याचें थोडेसें निरीक्षण जरुरीचें आहे. आणि यासाठीं पार्लमेंटरी राज्ययंत्रां-तील प्रत्येक अवयव कसोशीनें तपासून पहावा लागेल.

## ( १ ) सार्वत्रिक मतदान

### लोकशिक्षणाची हांकाटी

पार्लमेंटरी राजवटींत सार्वत्रिक मतदान ( Universal suffrage ) भांडवल-शाहीनें लोकांना दिलेलें नाहीं असें प्रथमदर्शनीं दिसून येईल. जसजशा लोकांच्या आकांक्षा व मागण्या वाढत गेल्या तसतसें अधिकाधिक लोकांना मतदान दिलें गेलें आहे. याचें उत्तम उदाहरण इंग्लंडच्या इतिहासांत १८३२, १८६७, १८८४, १९०९ सालांतली मतदानविषयक सुधारणा बिलें हीं होत. जो अनुभव

इंग्लंडांत तोच इतरत्र. अजूनही सार्वत्रिक मतदानपद्धतीला पुष्कळांचा विरोध आहे. विशेषतः सार्वत्रिक मतदान दिलें गेलें म्हणजे श्रीमंत गरीब, मालक मजूर, धनिक नोकर इत्यादि सर्व दर्जाचे लोक निदान राजकीय क्षेत्रांत सारख्या दर्जाचे होतात. यास भांडवलवाले अत्यंत भितात. राष्ट्रामध्यें मालमत्ता मुळींच नसणाऱ्यांचें नेहमीं प्रचंड बहुमत असतें व राहणारच; आणि राष्ट्रातील सर्व लोकांना मतदान दिलें गेलें तर कदाचित्-नव्हे खात्रीनें-उद्यां ज्या लोकाना आगापिछा नाहीं अशांच्या हातीं कायदेमंडळातील बहुमताची सत्ता जाईल. या बहुमताच्या जोरावर ते सर्व राज्ययंत्र काबीज करतील आणि शेवटीं राज्यसंस्थेच्या द्वारें धनिकवर्ग कायदेशीररीत्या लुबाडला जाईल अशा परंपरेची मोठी भीती भांडवलवाल्यांच्या पोटात असल्यामुळें ते या सार्वत्रिक मतदानास कसून विरोध करतात.

पण विरोध जाहीर करतांना आपल्या पोटांतील वरील भीति ते उघडपणें बोलत नाहींत. विरोधाकरतां तात्त्विक भूमिका पत्करतात. सार्वत्रिक मतदान देण्यापूर्वी, त्यांच्यामतें, सार्वत्रिक लोकशिक्षण दिलें गेलें पाहिजे. समाजातील बहुसंख्याक लोक अशिक्षित असल्यावर त्यांना राजकारणांतील गुंतागुंतीचे प्रश्न कसे समजतील? शिवाय लोकांना स्वतःच्या पोटापाण्याचा व्यवसाय करण्याखालीं राजकीय घडामोडींचा आणि कायद्यांचा सावधानपूर्वक विचार करण्यास तितकीशी सवड असते कोठें? इतकें स्वास्थ्य त्यांना लाभावें कसें? अशा अनभिज्ञ लोकांच्या हातीं राज्यकारभार देणें लहान पोराच्या हातीं आगपेटी देण्याइतकें घातक आहे अशी विचारसरणी भांडवलवाले पुढें मांडतात. यावर लोकशिक्षण विस्तृत प्रमाणावर वाढवावें असा त्यांना सवाल टाकला तर तिकडूनही त्यांचा नकार असतो. यांतच भांडवलशाहीचा आपमतलबीपणा आहे. उच्च शिक्षणाच्या झपाट्यानें झालेल्या वाढीनें तयार झालेले सुशिक्षित, गरीब म्हणून समाजांत राहण्यास नाखूष असतात. ते श्रीमंताबरोबरीनें स्वातंत्र्य, समता व संपत्ति यांची आकांक्षा धरितात. म्हणून पाश्चिमात्य देशांत फक्त प्राथमिक शिक्षण वयाच्या चवदा वर्षांपर्यंत सक्तीचें केलेलें आहे. समाजाच्या ज्ञानाची पुढील वाढ धनिक वर्गास घातक असल्यामुळें लोकशिक्षणाच्या वाढीस व प्रगतीस त्यांनीं पायबंद घातला आहे.

## निवडणुकीची धुळवड

लोकांच्या अज्ञानाचा आणखी एक फायदा धनिक वर्गातील लोक करून घेतात. निवडणुकीच्या वेळीं कायदेमंडळांत बहुमत कसें मिळेल या दृष्टीनें निरनिराळे

पक्षोपपक्ष लढत असतात. निवडणुकीच्या वेळीं कांहीं नवीन टूम काढून बहुजन-समाजास कसें फसवावें या उद्योगांत निरनिराळ्या पक्षांचे कल्पक पुढारी दंग असतात. बहुजनसमाजाच्या अज्ञानामुळें बहुमताचें सुकाणूं आपल्या बाजूस कसें फिरवावें याची अक्कल या पुढाऱ्यांना शिकवावी लागत नाहीं. प्रत्येक पक्षाच्या तात्त्विक भूमिकेची चिकित्सा करण्याइतकी बुद्धि सर्वसाधारण लोकांमध्यें असणें शक्य नाहीं. यामुळें केव्हां केव्हां अगदीं क्षुल्लकशा गोष्टीनें निवडणुकींतील यशापयश ठरलें जातें. एकादा पक्ष फारकाल अधिकारावर आहे एवढया साध्या गोष्टीवरसुद्धा नाखूष होऊन, बहुजनसमाज त्या पक्षाचा पाडाव करण्यास सिद्ध होतो.

अमेरिकेंतील अध्यक्षाच्या निवडणुकीसंबंधीं असें म्हणतात कीं ही निवडणूक म्हणजे राष्ट्रांतील चार महिन्यांची धुळवड होय (American Presidential Campaign is four months debauchery ). निवडणुकीच्या धुळवडींत वाटेल त्यानें वाटेल तसा धुमाकूळ घालावा आणि वाटेल त्याच्या अंगावर वाटेल ती घाण फेंकावी. १९२८ सालीं मि. आल्फ्रेड स्मिथ अध्यक्ष-पदाच्या निवडणुकींत पडले. कां तर ते म्हणे रोमन कॅथॉलिक होते! राष्ट्रांतील प्रत्येक मतदारास माहीत होतें कीं राजकारणांत धार्मिक मतांचा कांहींही उपयोग नसतो. मि. स्मिथ निवडून आले असते तर त्यांच्या राजकीय मतावर त्यांच्या धार्मिक मतांची नुसती सांवलीसुद्धां पडली नसती हेंहि प्रत्येक मतदार जाणून होता. अमेरिकेच्या अध्यक्षाच्या अंगीं लागणारा दुसरा एक गुण म्हणजे समाजांत मिळूनमिसळून वागणें हा मि. स्मिथ यांच्या अंगीं नव्हता हें खरें; पण एवढया सर्व गोष्टींचा विचार केला तरी ते निवडणुकींत अयशस्वी होण्याचें दुसरें कोणतेंही सबळ कारण नव्हतें. अशा उदाहरणाकरतां अमेरिके-कडेच धाव घेण्याची कांहीं जरुरी नाहीं. आमच्या देशांतील कायदेमंडळाच्या निवडणुकींतसुद्धां हाच तमाशा दिसतो. एकादा साधा कलाल पैशाच्या जोरावर प्रधान होऊं शकतो. निवडणुकींतील यशापयश उमेदवारांच्या लायकीपेक्षा ब्राह्मण ब्राह्मणेतर, मराठा मराठेतर, सिंधी गुजराथी इत्यादि धार्मिक गोष्टीवरच बहुतांशीं अवलंबून असतें. हा अनुभव सर्वांचा आहे. निवडणुकींत लोकमताचा तराजू केव्हां, कोठें आणि कसा खालीवर होईल हें सांगणें नेहमीं कठीण असतें.

## क्लिष्ट प्रश्नांची गुंतवळ

निवडणुकीस उभा राहिलेला उमेदवार तरी काय कमी खटपटी लटपटी करीत

असतो ! निवडणुकीचा दिवस उजाडेपर्यंत उमेदवार स्वतःची शिफारस, दुसऱ्याच्या कुटाळ्या, भरमसाट विधानें, मोठमोठालीं दांभिक व पोकळ वचनें इत्यादि गोष्टी सरसहा करतो. पूर्वी या गोष्टी तोंडी किंवा लेखी, वर्तमानपत्रें, जाहिरातीद्वारें तो करीत असे. पण आतां या कामीं रेडिओ, बिनतारी तारायंत्र, बोलका सिनेमा इत्यादि सर्व आधुनिक साधनांचा तो भरपूर उपयोग करून घेतो आणि हे सर्व चाळे पैशाचे असल्यानें भांडवलवाल्यांना ते उत्तम रीतीनें करितां येतात.

निवडणुकीपूर्वी उमेदवारानें बोलावलेल्या सभांना अगोदर मतदार हजर राहत नाहींत. जे हजर असतात ते सर्व ज्या उमेदवारानें ती सभा बोलावली असेल त्याचे पाठिराखे अगर बगलबच्चे असतात. त्यांत कांहीं ती सभा उधळण्याकरितां दुसऱ्या उमेदवारानें पाठविलेले गुंड असतात. अशा सभांच्या द्वारें बहुजनावर छाप पाडणें उमेदवारास अशक्य झालें तर त्याला वरील उपलब्ध साधनांचा उपयोग करावा लागतो. एकोणिसाव्या शतकांत राजकारणांतील प्रश्न सर्वसामान्य मतदारांना समजण्यासारखे होते. कारण ते धार्मिक सवलती, शिक्षणसुधारणा मताधिकारवाढ, परराष्ट्रीय व्यापार व राजकारण इत्यादि ठोकळ स्वरूपाचे मोठाले प्रश्न होते. आणि त्या प्रश्नावर निवडणुकी लढविल्या जात. वरील प्रश्नावर उमेदवारांना आपलें वक्तृत्व गाजवावयास सांपडे. वक्तृत्वाच्या जोरावर त्यांस केव्हां केव्हां बहुमत आपलेंसे करून घेतां येई. पण विसाव्या शतकांत आर्थिक, क्लिष्ट, बिकट व गुंतागुंतीच्या प्रश्नाची गुंतवळ आली. औद्योगिक सुधारणा, चलन सुधारण, आर्थिक बेकारांना वेतन वगैरे तात्त्विक स्वरूपाचे प्रश्न निर्माण झाल्यानें त्यावरील वक्तृत्वास फाटा मिळाला. अशा प्रश्नाचें सुकाणूं फिरविणारे विद्वान्, अभ्यासू व ज्ञानवृद्ध लोक असतात. आणि हे विद्वान् लोक निवडणुकीच्या फडांत पडूं इच्छित नाहींत. त्यांत त्यांचा अहंकार आडवा येतो. गुणी लोक लोकप्रिय नसल्यामुळें त्यांना मनुष्यबळाची आणि द्रव्यबळाची नड फार भासते. शिवाय अशा विद्वान् लोकांचीं भाषणें सर्वसाधारण जनतेस ऐकावयास मिळत नाहींत. आणि जरी यदाकदाचित् मिळालीं तरी त्यांपासून विशेष फायदा होत नाहीं. उमेदवारांकरवीं कांहीं समजेल म्हटलें तर खुद्द उमेदवारास हे प्रश्न पूर्णपणें समजलेले असतात कीं नाहीं याचीच शंका. तो बिचारा पक्षातर्फे मुख्य पुढाऱ्यानें काढलेली जाहिरात वाचून दाखवूनच वेळ मारून नेतो.

यामुळें निवडणुकींत एखाद्या मुद्याच्या गोष्टीवर पूर्वी जशी खळबळ उडे तशी

आतां उडत नाहीं. बाकी हेंहि खरें कीं अशा प्रकारची खळबळ एकसारखी राष्ट्रांत उद्भू लागली म्हणजे मुत्सद्यांना राजकारणांतील डावपेंच लढवावयाला शांत डोकेंच मिळावयाचें नाहीं. समाजांत वरचेवर खळबळ करून सोडणारीं प्रधानमंडळें केव्हांहि अल्पजीवीच ठरलीं असतीं. आधुनिक राजकारणांतील गुंतागुंतीच्या प्रश्नामुळें हा निवडणुकीचा कार्यक्रम एखाद्या यंत्राप्रमाणें सुरळित चालतो.

## हातांतून सुटलेला बाण.

निवडून दिलेल्या उमेदवारानें वचनभंग केला तर ठराविक कालपर्यंत मतदारांना गप्पच बसावें लागतें. वचनभंगाचा सूड मतदार फारतर पुढील निवडणुकींत घेतील पण तोंपर्यंत त्यांना चुरमुरे खात गप्प बसण्याखेरीज गत्यंतर नाहीं. निवडून दिलेला प्रतिनिधी म्हणजे हातांतून सुटलेला बाण. कितीहि तीव्र इच्छा असली तरी तो परत येणें शक्य नाहीं. सर्वसाधारणपणें आपण निवडून दिलेला इसम जो अधिकार गाजवील तो आपल्या हिताकरितां अशी मतदारांची प्रामाणिक समजूत असते. एखाद्या शिरजोर प्रतिनिधीनें आपली विवेकबुद्धि चालविली म्हणजे काय मतदारांचा विश्वासघात झाला ? प्रतिनिधीनें मतदारांचें प्रतिनिधित्व पत्करलें म्हणजे त्यानें मतदारांकडे स्वतःची बुद्धि गहाण ठेवलेली नसते अगर विकलेलीहि नसते.

वर्तमानपत्रांना प्रचलित संस्थांचा व पुढाऱ्यांचा उदोउदो करूनच पोट भरावें लागतें नाहींतर गिऱ्हाईक बुडतें व केव्हां केव्हां वर्तमानपत्र बंद पडण्याची पाळी येते. यामुळें तीं प्रचलित पुढाऱ्यावर व संस्थेवर कडक टीका करण्यास सहसा धजत नाहींत. याचा परिणाम मात्र असा होतो कीं देशाच्या राजकारणांतील खरी परिस्थिति, उद्योगधंद्याची व व्यापाराची परिस्थिति बहुजनसमाजास कळत नाहीं. स्वतःचें उदरंभरण नीट चालावें म्हणून वर्तमानपत्रें सरकारच्या बाजूनें किंवा एकंदर समाजाच्या कलाप्रमाणें लिहितात. आणि एकदां ठराविक व्यक्ति पुढारीपणास चढल्या कीं पुढारीपण त्यांची कायमची मिरास होऊन बसते.

## राजकारणाची पिवडी

एकंदरींत प्रातिनिधीक राजवटींत आपल्या हिताचा खरा पुढारी कोण हें मतदारांना शोधून काढतां येत नाहीं असें म्हणावें लागतें. उडाणटप्पू लोकांना यथेच्छ नाचण्यास जसा मोहरम हा सण किंवा अंगाला माती व घाण ही जशी धुळवडीच्या दिवशीं लागावयाची तसेंच राजकारणाची पिवडीहि मतदारांना

निवडणुकीच्या वेळीं काय लागेल तीच. यानंतर सगळ्या मतदारांचें नशीब एकट्या प्रतिनिधीच्या हातीं. तो काय करील तें पुढें व्हावयाचें ! एकूण निवडणुकीच्या दंगलींत ज्याचा उदोउदो जास्त होतो त्यालाच जास्त मतें मिळतात. वरील साधनाच्या साहाय्यानें लोकांचा पुढारी होण्याचा मानही भांडवलवाले मिळवितात. इतक्यांतूनहि निवडणुकीच्या कचाट्यांतून एखादा कर्तृत्ववान् व बुद्धिवान पुढारी निसटलाच तर तो काय करूं शकतो हें पुढील कायदेमंडळ व प्रधानमंडळ या प्रकरणांत दिसून येईल.

## ( २ ) कायदेमंडळ

### सभासद कसा असावा लागतो ?

राष्ट्रांतील विद्वान् आणि तज्ञ लोकांचा संग्रह कायदेमंडळांत असत नाहीं. असा संग्रह केला तरी तो कुचकामाचा होईल. अशा तज्ञाचें मतैक्य होणेंच कठीण. स्वयंपाकी जास्त झाले म्हणजे स्वयंपाक जसा हटकून बिघडतो तसें तज्ञ लोकांच्या प्रामाणिक मतभेदांमुळें देशाच्या राजकारणाचें खोबरें व्हावयाचें. तज्ञ लोक एकाद्या म्हणजे अर्थशास्त्र व्यवसायांत, एंजीनिअरींग, शेतकी वगैरेसारख्या एकेका विषयांत प्रवीण असतात. पण असा मनुष्य कायदेमंडळाच्या काय उपयोगी ? एंजिनिअर्स घरें कशीं बांधावींत, शहरें कशीं वसवावींत किंवा पूल कसे उभारावेत याविषयीं सल्ला देतील. भौतिकशास्त्रज्ञ निरनिराळे शोध लावतील. अर्थशास्त्रज्ञ हुंडणावळीसंबंधीं अगर उद्योगधंद्यासंबंधीं उत्तम सल्ला देतील. पण राजकारणांत एवढेच प्रश्न एकेकटे कधींहि येत नसतात. तज्ञपणापेक्षां अष्टपैलूपणा आणि विद्वत्तेपेक्षा बहुश्रुतपणा हे गुण कायदेमंडळाच्या सभासदांमध्यें असावे लागतात. निरनिराळ्या स्वभावांच्या लोकांमध्यें मिळूनमिसळून वागणें, वेळप्रसंगीं स्वतःच्या मतांना थोडीशी मुरड घालून कार्यभाग साधणें; वेळ, काळ, व परिस्थिति लक्षांत घेऊन कोणत्या गोष्टीस चालना द्यावी याचें ज्ञान असणें, कोणत्याही कायद्याची अमलबजावणी-करतांना त्यांत येणाऱ्या अडचणींचें निराकरण करण्याचे सोपे व सर्वांना पटतील असे मार्ग शोधून काढणें इत्यादि गुण सभासदांच्या अंगीं असावे लागतात. कायदेमंडळाचा सभासद इतर माणसांसारखाच माणूस असला तरी पण थोडासा पुढारलेला, अनुभविक, शहाणा आणि लोकप्रियता संपादन करण्यांत तरबेज असलेला असा तो एक प्राणी असतो. हे झाले सभासदाचे व्यक्तिशः गुणधर्म.

याहून वेगळ्या स्वभावाचा, तडफदार, कोणत्याही परिस्थितींत एक अणुभरही आपल्या मतांत माघार न घेणारा सभासद काय करूं शकेल हें आतां आपण पाहूं.

## मद्रासी बेचव सार

कायदेमंडळात सरकारी कामाचा व्याप इतका वाढला आहे कीं एकाद्या गोष्टीचा शांतपणें विचार करण्यास त्यांना मुळीं फुरसतच मिळत नाहीं. सरकारी कामाचा व्याप वाढल्यामुळें सभासदांच्या खासगी बिलांना सवड कोठली मिळणार? यामुळें कायदेमंडळाचा सभासद म्हणजे मत देणारें एक यंत्र झालें आहे. परराष्ट्रीय राजकारण आणि जमाबंदी यासंबधीं सरकार-व्यतिरिक्त सभासदाला एखादी नवीन गोष्ट सुचवितां येत नाहीं. कायदेमंडळाच्या बैठकींत सरकारी काम संपवितां संपवितां त्यांचे नाकींनऊ येतात. या दृष्टीनें पुनर्घटनेचीं कामें आणि सार्वजनिक फायद्याच्या गोष्टी करण्यास त्यांना मुळीं अवसरच मिळत नाहीं. एकाद्या अधिकाऱ्याचा सर्व वेळ खात्याच्या दैनंदिन कागदोपत्रांवर सह्या करण्यांत जावा, त्याप्रमाणें कायदेमंडळाचा सर्व वेळ सरकारी नित्यक्रमाच्या कामास ( Routine work ) मंजुरी देण्यांत जातो. आणि त्यावर उलटसुलट मत देणें एवढेंच काम सभासदांना शिल्लक उरतें. कायदेमंडळांत सरकारपक्षास हमखास प्रचंड बहुमत असेल तर विरोधी अल्पसंख्याक पक्ष अजागलस्तनाप्रमाणें निरुपयोगी. सरकारपक्षास बहुमत नसेल तर त्यांस आपले मनोरथ तडीस नेतां येत नाहींत. एकदोन पक्षांच्या संमिश्र कडबोळ्यापासून कोणाचाहि फायदा होत नाहीं. त्यांत ( राष्ट्रीय सरकाराप्रमाणें ) सर्वपक्षीय सरकार असलें म्हणजे काम भागलें! सर्व पक्षांना संमत असलेला ठराव हा मद्रासकडील तिखट व डाळ नसलेल्या साराप्रमाणें बेचव जिन्नस असतो. कायदेमंडळांतील त्रांगडें असें विचित्र आहे.

कायदेमंडळांतील नित्यक्रमाच्या गर्दीमुळें सभांना हजर राहण्याइतकी आस्था सभासदांमध्यें राहत नाहीं. केव्हाकेव्हां सभागृहामध्यें कोरमपुरतेही सभासद असत नाहींत आणि कांहीं महत्त्वाच्या प्रसंगीं सरकारला, स्वतःची बाजू संभाळण्यासाठीं नव्हे तर कोरम भरण्यासाठीं, हीं सभासदरूपी मेंढरें धनगरांकरवीं ( Whips ) सभागृहांत हांकून आणावीं लागतात.

## चटावरील श्राद्धें

अल्पसंख्यांक पक्षाच्या टीकेचा सरकारवर कांहींच परिणाम होत नाहीं असें मात्र म्हणतां येत नाहीं. त्या टीकेचा मजकूर वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतो. ती

टीका रास्त असेल व लोक विसरले नसतील तर त्याचा परिणाम पुढील निवडणुकीवर खास होतो शिवाय प्रतिपक्षी आपल्यावर टीका करील व आपलीं बिंगें बाहेर काढील या भयानें सरकारला नेहमीं डोळ्यांत तेल घालून जपावें लागतें. अल्पसंख्यांकांच्या विरोधामुळें सरकार कोसळून पडत नाहीं किंवा त्यांच्या गर्भित वा प्रच्छन्न टीकेमुळें बहुमत असलेल्या सभासदाचें मतपरिवर्तन होण्याचीही आशा नसते. हें जरी सर्व खरें तथापि विरोधी पक्षाच्या अस्तित्वामुळें सरकारला चारी दिशा मोकळ्या सुटत नाहींत आणि कायदेमंडळांत निर्लज्जपणें हुकुमशाही गाजवायला सापडत नाहीं. कायदेमंडळांत होणारा वादविवाद नेहमीं सर्वसाधारण तात्त्विक गोष्टीवरच होतो. प्रत्येक लहानसहान गोष्टीवर तो होऊं लागेल तर वेळ पुरणार नाहीं व कामाची खोटी होईल. वाढत्या प्रमाणात असलेल्या सरकारी कामामुळें कायदेमंडळांतील कामें चटावरील श्राद्धाप्रमाणें झरझर उरकून घेतलीं जातात.

## पाठशिवणीचा खेळ

पार्लमेंटरी राज्यव्यवस्थेमध्यें दोन परस्परविरोधी पक्षांच्या प्रधानमंडळांच्या धोरणांत देखील एका दृष्टीनें एकवाक्यता दिसून येते. प्रत्येक नवीन प्रधानमंडळ " नवी विटी नवें राज्य " याप्रमाणें जुनें सर्व मोडूनतोडून सर्व नवीन बनवीत नाहींत. उलट जुन्या बांधकामावर आपल्या दृष्टीनें निराळ्या स्वरूपाची इमारत बांधण्याचा तें प्रयत्न करतें. पुनश्च निवडणुकीचें भय प्रत्येकाच्या पोटांत असतें. जुन्याचें सर्व मोडून टाकावें तर जुनें पुनः अधिकारारूढ झाल्यावर आपल्या कार्याचा नाश करील असें नव्यांना वाटतें. म्हणून ते जुन्यांनीं रचलेल्या पायावर आपल्या बांधकामाची उभारणी करतात. उदाहरणार्थ: इंग्लंडमध्यें परवांपर्यंत पुराणमतवादी व उदारमतवादी यांच्यामध्यें जो पाठशिवणीचा खेळ सुरू होता तो आतां पुराणमतवादी व मजूर यांच्यामध्यें सुरू झाला आहे. पुराणमतवादी पक्षास भांडवलवाल्याचें संरक्षण करावें व मजुरांना फार सवलती देऊन शेफारूं देऊं नये असें कितीहि वाटलें तरी ते मजुरांच्या हिताकरतां नवीन कायदे करितातच व जुनें कायम ठेवतात. केव्हां केव्हां खुद्द भांडवलवाल्यांच्या विरुद्धसुद्धां ते कायदे करण्यास मागेंपुढें पहात नाहींत. तसेंच भांडवलवाल्यांच्या मुळावर घाव घालावा असें मजुरांना कितीहि वाटलें तरी त्यांचा पक्ष अधिकारारूढ झाल्यावर तसें घडत नाहीं. विशेषतः इंग्लंडमध्यें एकमेकांच्या सोयीनें, विचारानें आणि देवाणघेवाण करून सर्व राज्यकारभार चालतो. लोकहितदक्षतेमुळें पक्षा-

पक्षांतून खेळीमेळीची भावना निर्माण होते. फार काय पण संगनमतानें ते आपापसांत पुढारीपणाची वाटणी व पाळी ठरवूं शकतात.

लोकशाहीच्या रेंगाळत चालणाऱ्या गाड्यांत सभासदाच्या कर्तृत्वास विशेष कसा वाव नाहीं हें आपण पाहिलें. तसेंच कायदेमंडळांत बहुमत असलेल्या पक्षास काय वाटेल तें चुटकीसरशी करतां येत नाहीं हेंहि दिसतें. प्रत्येक पक्ष लोकांची संमति व सहानुभूति मिळविण्याच्या नादास लागलेला असतो. लोकमताविरुद्ध केलेला कायदा फार वेळ जिवंत राहूं शकणार नाहीं. आणि लोकहि कायद्याला मान देतात, म्हणूनच कायदेमंडळाची अब्रू बचावते. अशा प्रामाणिक समजुतीनें पार्लमेंटरी राज्यकारभार चालतो. यामुळें कायदेमंडळाच्या कार्यक्षमतेला व कर्तृत्वाला कमीपणा येतो. त्यांतल्या कामांत आत्मविश्वास, सुसगतपणा, सातत्य, आटोपशीरपणा, मितव्ययीपणा, तडफ, कल्पकता इत्यादि गुणांचा अभाव अत्यंत प्रामुख्यानें दिसून येतो.

## ( ३ ) प्रधानमंडळ

लोकसत्ताककालांत तत्त्वतः राजसत्ता कायदेमंडळाच्या म्हणजे लोकप्रतिनिधींच्या हातीं आली. पण राज्यकारभार पहावयाला आणि अधिकाराचा योग्य उपयोग करावयाला एखादी लहानशी सुटसुटीत संस्था पाहिजे म्हणून कायदेमंडळांत बहुमत असलेल्या पक्षांतील ठळकठळक व्यक्तींचें प्रधानमंडळ निर्माण झालें. पण याहि छोटया संस्थेंत कायदेमंडळाप्रमाणेंच कामाची गर्दी, घाई आणि गोंधळ.

## पक्षभेदांचें कडबोळें

प्रत्येक प्रधानाला आपल्या खात्याचें काम पुरून उरण्याइतकें असतें. यामुळें दुसऱ्या खात्याची चौकशी करण्यास त्याला फुरसत असत नाहीं. प्रत्येक प्रधानाला प्रधानमंडळाच्या सभेस हजर राहून सार्वजनिक प्रश्नांची छाननी करावी लागते आणि कायदेमंडळांतील बूड कायम राखण्याच्या दृष्टीनें सामुदायिक धोरण आंखावें लागतें. शिवाय आंतरराष्ट्रीय करारमदारांत भाग घेणें, निरनिराळ्या सभांना हजर राहणें, आपल्या पक्षाच्या मतांचा प्रसार करणें, मोठमोठया सरकारी समारंभांना डगलेपट्टे चढवून खडीताजीम देणें इत्यादि हजार गोष्टींत त्याला त्याच्या इच्छेविरुद्ध पुष्कळसा वेळ अनाठायीं खर्च करावा लागतो. त्या सर्वांतून

कांहीं थोडी सवड सांपडली तर तो ज्या मतदारांनीं त्याला निवडून दिलेला असतो त्यांच्या अडचणी दूर करण्याकडे त्याला लक्ष पुरवावें लागतें.

प्रधानमंडळाच्या कामांत, कामाच्या गर्दीत व घाईमुळें, गोंधळ उडाला नाहीं असा एक दिवस जात नाहीं. यामुळें कोणत्याही प्रश्नांचा सांगोपांग विचार या ठिकाणीं होऊं शकत नाहीं. शिवाय या प्रधानमंडळांत एका मताचे लोक तरी असतात कोठें ? प्रधानमंडळांतील सभासद एका विशिष्ट पक्षाचे लोक असतात एवढेंच. त्यांच्यामध्यें बारीकसारीक मतभेद हे असतातच. थोडक्यांत प्रधानमंडळ हें एक कायदेमंडळांतील लहानलहान पक्षभेदांचें कडबोळें असतें. त्यांत आप-आपल्या मतांना मुरड घालणारीं माणसें असलीं तर ठीक नाहींतर तें प्रधानमंडळ केव्हां कोसळेल याचा पत्ता लागावयाचा नाहीं. याचें उत्कृष्ट उदाहरण फ्रान्समध्यें सांपडतें. फ्रान्समधील प्रसिद्ध मुत्सद्दी मि. ब्रियांद यांनीं एकदां असें म्हटलें आहे कीं " फ्रान्समध्यें एक प्रधानमंडळ अधिकारसूत्रें हातांत घेत असतांनाच त्यांतील एकाददुसरा प्रधान अधिकाराच्या जागा खालीं करीत असतो." हें अगदीं अक्षरशः खरें आहे.

## खोखोचा डाव

कायदेमडळ जवळजवळ प्रधानमंडळाच्या हातांतील बाहुल्याप्रमाणें असतें. प्रधानमंडळ कायदेमंडळाचें विश्वासू नोकर असतें. विशेषतः तें ज्या पक्षाचें असेल त्यांच्या हितसंबंधाकडे तर त्यांना मुळींच दुर्लक्ष करतां येत नाहीं हें जरी खरें असलें तथापि कायदेमंडळाला आपल्या मुठींत ठेवण्याची विद्या प्रधानमंड-ळाला चांगली अवगत असते. कोणतीही नवीन योजना अंमलांत आणण्यास इच्छा व शक्ति या दोन गोष्टी प्रधानमंडळाजवळ असाव्या लागतात. नुसती इच्छा असून भागत नाहीं. मजूर प्रधानमंडळास पुष्कळ आशा व आकांक्षा होत्या पण शक्तीचा अभाव होता. कारण कायदेमंडळांत त्यांचें हमखास बहुमत नव्हतें. इच्छेच्या अभावीं नुसती शक्ति असून भागत नाहीं. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षास पुष्कळ वेळां प्रचंड बहुमत असूनहि इच्छा नसल्यानें लोकांचा फायदा झाला नाहीं. पदच्युत होणाऱ्या प्रधानास ना दुःख ना लाज. आज पदच्युत होणारा प्रधान सभागृहात शेवटच्या बांकावर बसलेला दिसला तरी तेथून तो पटकन् प्रधानमंडळाच्या खुर्चीत कशी उडी टाकील याचा पत्ता लागावयाचा नाहीं. सभागृहांत एक प्रकारें खोखोचा डाव सभासद खेळत असतात.

ही झाली प्रधान मंडळाची गोष्ट. प्रत्येक प्रधानास त्यांच्या खात्यांत पूर्ण अख्त्यारी आहे म्हणावें तर तिकडूनही नकार. प्रधानाच्या पायांत नोकरशाहिची बेडी अडकविलेली असते. कोणताही प्रधान अधिकारावर येतो तेव्हां त्याला त्याच्या खात्यांतील सर्व प्रश्नांची सांगोपांग माहिती असणें शक्य नाहीं व नसतेही. त्याचीं कांहीं ठराविक धोरणें व तंत्रें असतात. पण तीं धोरणें कलमें व्यवहारांत उतरवितांना नोकरशाही त्यांना अडथळा करते. नोकरशाही पूर्वापार चालत आलेली पद्धत मोडण्यास नेहमीं नाखूष असते. कारण नोकरशाहींत सर्व जातीच्या पक्षांच्या लोकांचे हितसंबंध एकत्रित झालेले असतात. कोणत्याहि एका जातीविरुद्ध अगर वर्गाविरुद्ध एखादी योजना प्रधानानें आंखली कीं नोकरशाही ती हाणून पाडते. हें कसें तें पाहूं.

## ( ४ ) नोकरशाही

### अंमलदार आणि कारकून

कोणत्याही देशाचा आजपर्यंतचा इतिहास पाहिला तर खरी राजसत्ता नोकरशाहीच गाजवीत आलेली आहे असें आढळून येतें. विशेषतः नित्य बदलत्या राज्ययंत्रांतील जर कोणतें कायम यंत्र असेल तर तें हा कायम पगारी नोकरशाहीचा तांडा. प्रधान मंडळ येवो वा जावो, तें राजिनामा देवो वा गडगडो, निवडणुकीची धांदल माजो अगर नवीन प्रधानमंडळ अधिकारापन्न होवो या नोकरशाहीस त्याची फिकीर नाहीं. नोकरशाहीचा नित्य कारभार चालू राहतो; त्यात खळ पडत नाहीं. बऱ्याचशा गोष्टीकरतां प्रधानाला आपल्या हाताखालच्या नोकरशाहीवर विसंबून रहावें लागतें. कचेरींत अंमलदाराला हाताखालच्या कारकूनमंडळींवर नेहमी विसबावें लागतें. कारकूनमंडळीनीं अंमलदाराला फसवावयाचें अगर खड्डयांत घालावयाचें मनांत आणल्यास ती गोष्ट सहजसुलभ असते. तसेंच या नोकरशाहीचें आहे. नवीन प्रधान अधिकारावर आला कीं तो आपल्या नवीन धोरणाचें तोरण सभागृहाला लावतो. त्या धोरणांस अनुसरून कायदेमंडळ ठोकळ कायद्याची भाषा ठरविते. पण कायदेमंडळांचा हेतू लक्षांत घेऊन वरील कायद्यांतील बारीकसारीक गोष्टींचा व कलमांचा मालमसाला नोकरशाहीस पुरवावा लागतो. याकरतां नोकरशाही अत्यंत हुषार, प्रसंगावधानी, दूरांदेशी, सावध व प्रत्युत्पन्नमति अशी असावी लागते. या गुणांच्या अभावीं नोकरशाही निव्वळ कर्तृत्वहीन होऊन भागत नाहीं. कारण तसें झालें तर त्याचा बट्टा सर्व

प्रधानमंडळाला लागतो. उदाहरणार्थ: हिंदुस्थानांतल्या नोकरशाहीची नेहमीं वाहवा केली जाते. ती वाहवा किती अनाठायीं आहे हें नुकत्याच झालेल्या मुंबई प्रांतांतील दारुबंदीच्या धोरणाचा जो बोजवारा उडाला त्यावरून उघड झालें. दारुबंदीच्या धोरणाच्या फट्फजितीचा दोष कोणी प्रधानमंडळाकडे देतील पण खरें पाहिलें तर या सर्व फट्फजितीस मुंबई प्रांतांतील कर्तृत्वशून्य नोकरशाही जबाबदार आहे. दारुबंदीचें धोरण एकदां प्रधानमंडळानें आंखल्यानंतर ती गोष्ट कोठल्या कायद्याच्या चौकटींत कशी बसवावयाची हें काम खरें नोकरशाहीचें असतें व आहे.

## नोकरशाहीच्या कारवाया

असो. या नोकरशाहीच्या कायम यंत्रामुळें राज्यकारभारांत एक फार मोठी गोष्ट साधली आहे. ती अशी कीं एकाद्या नवीन अनभिज्ञ प्रधानाच्या हातूनसुद्धा घोडचूक होण्याची शक्याशक्यता पुष्कळच कमी झालेली आहे. एकादा नवीन प्रधान फार मोठी चूक यामुळें करूं शकत नाहीं. पण तसेंच एकाद्या हुशार प्रधानास नवीन सुधारणा चटकन् अंमलांत आणतां येत नाहींत. कारण अशा धोरणास ही नोकरशाही एकसारखी विरोध करीत राहते. इतक्या सर्वांना तोंड देऊन पुरून उरणारा असा एकादाच खंबीर प्रधान निघावयाचा. बहुतेक सर्व प्रधान या नोकरशाहीच्या कारवाईस बळी पडतात. अशा रीतीनें नोकरशाही आपला कार्यभाग साधून आजवर राज्य करीत आलेली आहे.

नोकरशाहीस देशाची खरी परिस्थिती तंतोतंत माहीत असते. कोणत्या वेळेस काय केलें असतां त्याचा परिणाम कसा होईल याची कल्पना या नोकरशाहीस अनेक वर्षांच्या अनुभवानें असते. देशांतील चलाख, बुद्धिवान् आणि कल्पक अशा तरुण वर्गांतील गुणाच्या चढाओढीवर नोकरशाहींतील लोकांची निवड केलेली असते. जाग्यावर आलेला नवीन प्रधान बहुधा उदात्त तत्त्वें व उच्च ध्येयें बरोबर घेऊन आलेला नवखा असतो. कोणत्याही गोष्टीच्या तात्त्विक ज्ञानांत तो कदाचित् नोकरशाहीस ऐकणार नाहीं पण व्यवहारज्ञानांत नोकरशाही त्यास चकित केल्याशिवाय राहणार नाहीं. याचें आपण अगदीं साधें उदाहरण घेऊं. एकाद्या फडणिसास कागदी चलन वाढवावेंसें वाटलें किंवा जुनें ज्यास्त व्याजाच्या दराचें कर्ज फेडण्यासाठीं नवीन कमी दराचें कर्ज उभारावयाचें असें त्यानें ठरविलें आणि तें नोकरशाहीस नको असेल तर ती प्रथमतः त्यास विरोध करील. विरोधानें

प्रधान ऐकत नाहीं असें ठरल्यास वरील गोष्टी अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत घडवून आणून त्याच्या पदरांत चुकीचें माप घालील. अशा रीतीनें आपलें वर्चस्व ती प्रधानावर कायम राखील. एकादाच स्वतंत्र विचाराचा, बाणेदारवृत्तीचा, व कर्तृत्ववान प्रधान या नोकरशाहीस बळी पडत नाहीं. एरवीं कोठलेंहि सावज नोकरशाहीच्या तांवडीतून सुटूं शकत नाहीं.

## पोलादी चौकट

सहसा आपल्या हातून कांहीं चुकूं नये याबद्दल प्रधान नेहमीं जपत असतो. कारण कांहीं चुकलें कीं कायदेमंडळ त्यांस सतावून सोडतें. यामुळेंहि नोकरशाहीस न दुखवितां त्यांच्या कलाप्रमाणें पुष्कळशा गोष्टी प्रधानास कराव्या लागतात. हिंदुस्थानांत नोकरशाही इतकें बेजबाबदार वर्तन करीत असते कीं एकाद्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें सद्हेतूनें कांहीं चांगलें काम करण्याचें मनांत आणलें तरी त्याला तें करतां येत नाहीं. नोकरशाहीच त्याला तें करूं देत नाहीं. म्हणून ही 'पोलादी चौकट' ( Steel frame ) या नांवानें हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे. मालकाच्या मनांत कितीहि देण्याचें आलें तरी या नोकरशाहीच्या उर्फ कोठवळ्यांच्या पोटांत दुखतें. त्यांत ते आपली शिताफी म्हणून कांहींतरी लढवितातच. नोकरशाहीची ही भरभक्कम पोलादी चौकट मगरूरपणें एकट्या हिंदुस्थानांतच वागते असें नाहीं. सर्व जगभर कमीअधिक प्रमाणांत तिचें अस्तित्व प्रत्येक राजवटींत जाणवतें. यांचा खरा विरोध लोकशाहीतत्त्वांच्या प्रसारास असतो.

एकंदरींत भांडवलवाल्यांच्याविरुद्ध असलेला एकादा लोकांचा पुढारी अगोदर निवडून कायदेमंडळांत यावयाचा म्हणजे मोठी मुष्कील. सभासद म्हणून तो निवडून आलाच तर कायदेमंडळांतील विचित्र परिस्थितीमुळें तेथें हालचाल करणें कठीण. इतकेंही करून एकादा पुढारी प्रधानमंडळांत शिरलाच तर तेथें नोकरशाही आडवी पडते. सनदशीरमार्गानें बहुजनसमाजानें यदाकदाचित् सरकार ताब्यात घेतलें तरी कायदेमंडळाची स्थिति इतकी असमाधानकारक आहे कीं त्याठिकाणीं राहून भांडवलशाहीस शह देणें अशक्य आहे. एकूण भांडवलवाले आपल्या विरोधकांना कोणत्याही क्षेत्रांत डोकें वर काढूं देत नाहींत हेंच खरें. राज्ययंत्रांतील महत्त्वाच्या ठिकाणीं भांडवलशाही कशी बूड संभाळून आहे हें आपण पाहिलें. न्यायखात्यांत तरी या भांडवलशाहीपासून पुरेसें संरक्षण बहुजनसमाजाला मिळतें काय ?

# ( ५ ) न्यायखातें

## समाजाच्या अंतरंगाचें प्रतिबिंब हा कायदा

लोकशाहीच्या अमदानींत न्यायखात्याला पुष्कळशी मुभा आणि स्वातंत्र्य मिळालें. न्यायखातें इतर राजकीय पक्षोपक्षांपासून खरोखरीच अलिप्त असून न्याय देण्यामध्यें काळा गोरा, उच्च नीच, श्रीमंत गरीब असा भेदभाव ते करीत नाहीं असा लौकिक आहे आणि तो कांहीं प्रमाणांत योग्य आहे. कायदा ही कांहीं सजीव वस्तू नाहीं किंवा अबाधित तत्त्वही नाहीं. वेळ, काळ, परिस्थिति यांना अनुसरून तो बदलतो. याहीपुढें जाऊन असें म्हणतां येईल कीं कायदा समाजाच्या अंतरंगाचें प्रतिबिंब आहे. समाजाच्या प्रगतीबरोबर कायदा पालटत जाणार व जातोही. परंतु समाजाच्या प्रगतीच्या बरोबरीनें मात्र कायद्यास वाट चालतां येत नाहीं. एखाद्या लहान मुलास बरोबर घेऊन फिरावयास निघालें म्हणजे जसा तो मुलगा वरचेवर आपल्या पाठीमागें राहतो तसें कायद्याचें होतें. लोकमत समाजाच्या प्रगतीच्या पुष्कळसें पुढें असतें. आणि समाजाची प्रगति ही कायद्याच्या नेहमींच पुढें असते. असा हा पाठशिवणीचा खेळ लोकमत, समाज व कायदा यामध्यें नित्य चालू असतो आणि या खेळांत कायदा नेहमीं पाठीमागें पडत असतो.

या दृष्टीनें कायदा हें प्रचलित समाजाचें प्रतिबिंब नसलें तरी मागील समाजाचें खास असतें. अर्थात् समाजांतील हितसंबंध संरक्षण करणाराची भूमिका कायदा पत्करतो. ज्या ठिकाणीं लोकांना मालमत्ता, इष्टेट इत्यादि धारण करतां येतात, त्या ठिकाणीं समाजांतील हे हितसंबंध न्यायखातें रक्षण करतें. थोडक्यांत भांडवलवाल्यांचें संरक्षण कायदा करतो. रशियामध्यें तरी काय कम्युनिस्टांना विशेष संरक्षण कायदा देतोच कीं नाहीं ? ज्या प्रकारची सामाजिक घटना त्याचप्रकारचे त्यांतील हितसंबंध. आणि हे हितसंबंध कायद्याच्या रूपानें संरक्षिले जातात. हा सांगण्याचा मुख्य मुद्दा.

## न्यायखात्याच्या हातांतील शस्त्र

फक्त एका अमेरिकेमध्यें सुप्रीम कोर्ट कायदेमंडळाच्या जुलमी आणि अरेरावी वर्तनास आळा घालूं शकतें. इतरत्र न्यायखातें कायदेमंडळाचे सर्वश्रेष्ठ अधिकार मान्य करून त्यांनीं केलेले कायदे बिनतक्रार अमलांत आणतें. कायदेमंडळानें पसार केलेला कायदा मूळ राज्यघटनेच्या हेतूच्या विरुद्ध आहेसा वाटल्यास

अमेरिकेंतील सुप्रीम कोर्ट त्यांची अंमलबजावणी करण्याचें नाकारून त्या कायद्याची पूजा बांधते. या न्यायखात्याच्या आत्यंतिक स्वतंत्रावस्थेमुळें गेल्या शेंदीडशें वर्षांत अमेरिकन राज्यघटना बदलणारे अवघे चौदाच कायदे पास होऊं शकले. प्रेसिडेंट रूझवेल्टनीं हा आंकडा वाढविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला त्यांत पण त्यांना एकदां सोडून दहादां थप्पड खावी लागली. अमेरिकन राज्यपद्धतीसंबंधीं एक प्रसिद्ध ग्रंथकार म्हणतो कीं " राज्यघटना म्हणजे न्यायखात्याच्या हातांत दिलेलें मेण किंवा शाडू. त्याच्यापासून वाटेल तो जिन्नस त्यांनीं तयार करावा ! म्हणूनच अमेरिकेंत भांडवलशाहीचें उत्कृष्ट संरक्षण केलें जातें. "*

अमेरिकेंतील समाजवादीपक्षानें कायदेमंडळ आणि अध्यक्षपद दोन्ही हस्तगत केली तरी त्यांना भांडवलशाही नष्ट करतां येणार नाहीं. कारण त्या गोष्टीवर वरवंटा फिरविण्यास सुप्रीम कोर्टरूपी सासूबाई बसली आहे. कायदेमंडळानें पाटीवर लिहावें आणि सुप्रीम कोर्टानें त्यावर बोळा फिरवावा अशी तेथें स्थिति आहे. न्यायाधिशांची नेमणूक प्रचलित सरकार उर्फ कायदेमंडळांत बहुमत असलेला पक्ष करतो पण त्या एका पक्षाच्या कारकीर्दीत सुप्रीम कोर्टाचे सर्व न्यायाधीश कसे बदलले जाणार ? एकूणएक न्यायाधीश बदलल्याशिवाय भांडवलशाहीविरुद्ध तोंडांतून ब्र काढण्याची सोय नाहीं. यामुळें सुप्रीम कोर्टाविरुद्ध अमेरिकेंत बराच असंतोष व ओरड ऐकूं येते.

## लालचिंधीला बुजणारे न्यायाधीश

खुद्द समाजांत विषमता असल्यावर न्यायालयांत समता आहे या म्हणण्यांत विशेष तथ्य नाहीं. समाजांतील विषमतेचें संरक्षण आजवर न्यायालयें करीत आलीं आहेत व पुढेंही करीत राहतील. आतां समाजातील विषमतेचेंच उच्चाटण झालें तर मात्र गोष्ट निराळी. इंग्लंडमध्यें समाजाची घटना आणि पूर्वापार पद्धति या विरुद्ध न्यायाधिकाऱ्यांना मुळींच जातां येत नाहीं. कायदेमंडळानें पास केलेला लिखित कायदा जसा त्यांच्यावर बंधनकारक आहे तसा कायदेमंडळानें मूकसंमति दिलेला अलिखित कायदाहि त्यांना मानावा लागतो. हा अलिखित कायदाच भांडवलवाल्यांचें रक्षण करतो.

* The Constitution is a mere thing of wax in the hand of Judiciary, which they may twist and shape into any form they please...They become protective ramparts of capitalistic principles.

साध्या मजूर आणि मालक यांच्या तेढीमध्यें न्यायाधीश मजुरांच्या संघटनेकडे संशयी दृष्टीनें पाहतात आणि मालकांच्या बाजूनेंच न्यायाचें पारडें फिरतें. उदाहरणार्थ: कम्युनिस्ट लोकांना लष्करांतील लोक फितविणें सदासर्वकाळ शक्य नसतें. तरीपण साप म्हटलें कीं जसा ठेंचावा मग तो विषारी असो वा नसो; त्याप्रमाणें कम्युनिस्ट म्हटला कीं त्याला तुरुंगवास हा दाखवावयाचा. कम्युनिस्ट या लाल चिंधीला बुजणारे कांहीं बैलोबा न्यायालयांत असतात. एकादा मजूर कारखान्यांत काम करीत असतां जखमी झाला तर त्याला नुकसानभरपाईदेखील योग्य व बरोबर मिळत नाहीं. त्यापायीं मजूरसंघानें त्याची बाजू घेऊन मालकाशीं तेढीची भाषा सुरू करावी त्यावेळेस मालक शुद्धीवर येऊन बोलूं लागतो.

## जुना कायदा आणि जुन्या मात्रा

राजकारणांत वकील लोक मुत्सद्दीपणा गाजवितात हा एक मोठा दोष आहे. या मुत्सद्दीपणाच्या जागेचा स्वतःच्या पोळीवर भरपूर तूप ओढण्याकडे ते खासा उपयोग करून घेतात. शिवाय वकील लोकांचें पोट समाजातील तंट्याबखेड्यांवर असतें. तंट्याबखेड्याचें मूळ बहुतांशीं सामाजिक विषमतेंत असल्यानें आपलें पोट जाळण्यासाठीं ती विषमता कायम ठेवण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते. या हेतूनें न्यायालयांत जुना कायदा आणि जुन्या चालीरीती यांचा पुरस्कार ते करीत राहतात. उद्यांच्या खटल्याचे निकाल कालच्या निकालाप्रमाणें व्हावेत अशी त्यांची खटपट असते. पण समाज पुढें चालला आहे आणि कालचा समाज, आज किंवा उद्या, जशाचातसा राहात नाहीं याची वाट काय ? जुना कायदा आणि बटव्यांतील जुन्या मात्रा दोन्हीही सारख्याच निरुपयोगी ! नव्या समाजास नवा कायदा हाच प्रगतीचा दंडक. जुन्या कायद्यांत परिस्थित्यनुसार फेरबदल होत नसेल तर तो कायदा निर्जीव व मृत समजला पाहिजे. आणि अशा कायद्याच्या आधारावर समाज निःशंक आणि बेफिकीर राहील तर एक दिवस समाज देखील निर्जीव व मृत खास होईल. इंग्लंडमध्यें विद्यालयांतून फक्त जुने कायदे शिकविले जातात. अमेरिकेमध्यें जुन्या कायद्याबरोबर त्यांत नवीन काय सुधारणा पाहिजेत हेंहि शिकविलें जातें. अशी पद्धत सर्व ठिकाणीं अंमलांत आल्याशिवाय कायदा समाजहितसंरक्षक होऊं शकत नाहीं. सध्यां कायदा म्हणजे लोकमत तुडविणारें आणि समाजाच्या प्रगतीस अडथळा करणारें, एक जुलमी यंत्र होऊन बसलें आहे. जोंपर्यंत वर निर्दिष्ट केलेल्या सुधारणा त्यात होऊं शकत नाहींत तोंपर्यंत हें जुलमी

यंत्र लोकमत आणि समाजहित भरडून काढणार यांत शंका नाहीं. याशिवाय एक सुधारणा होणें क्रमप्राप्त आहे. आजचीं न्यायालयें कायद्याच्या शब्दाची तंतोतंत अंम्मलबजावणी करितात. त्या कायद्यामागील हेतूंची फारशी चिकित्सा तीं करीत नाहींत. पुष्कळ वेळां कायदेमंडळांच्या घाईच्या आणि गर्दीच्या कार्यक्रमामुळें कायद्याचा हेतू एक आणि शब्द मात्र चुकून भलते पडलेले असतात. केवळ शब्दाला चिकटून राहण्याच्या न्यायखात्याच्या प्रवृत्तीमुळें केव्हांकेव्हां फार मोठा अनर्थ गुदरतो. झांपड अडकविलेल्या टांग्याच्या घोडयाप्रमाणें न्यायाधिशांनीं एका सीध्या मार्गानें नेहमीं जाणें इष्ट असत नाहीं.

*    *    *

पार्लमेंटरी राज्यपद्धतींतील विस्मयकारक देखावा इतका वेळ वर्णन केला. प्रातिनिधिक राजवट ही लोकांना जबाबदार असलेली राज्यपद्धति खरी पण तींमध्यें प्रत्यक्ष आणि खरी जबाबदारी अशी कोणावरच असत नाहीं. जें सर्वांचें काम तें कोणाचेंच नव्हे अशी कांहींशी स्थिति तीमध्यें असते. प्रत्यक्ष व खऱ्या जबाबदाराची आंच जशी एकाद्या व्यक्तीला लागते तशी ती अदृश्य व असंख्य व्यक्तिसमूहाला लागूं शकत नाहीं हाच यावरून घ्यावयाचा धडा.

## रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति

एकोणिसाव्या शतकांत लोकशाहीच्या पुरस्कारार्थ प्रातिनिधिक राज्यसंस्था अवतरली. तिच्या पाठोपाठ जन्मलेल्या औद्योगिक क्रांतीनें लोकांची दृष्टी फिरली. विसावें शतक उजाडलें. नवनवीन प्रश्न क्षितिजावर दिसूं लागले. औद्योगिक उन्नतीमुळें मनुष्याच्या जीवनाचें मोजमाप वाढलें व सुखसोयींची लयलूट उडाली. ऑस्ट्रेलियांत सोन्याच्या खाणी मिळाल्या त्याहीपेक्षां अधिक आनंद लोकांना झाला. पण यांतच नेमकें मालक आणि मजूर यांच्या तंटयांचें बीज रुजलें. ' रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति ' या म्हणीप्रमाणें प्रातिनिधिक राज्यव्यवस्थेचा मोह मालकांना सोडवेना व मजुरांना तोडवेना. म्हणून हळूंहळूं मजुरांचे हक्क सरकारकडून मान्य केले जाऊं लागले. पण भूतदयेची आणि परोपकाराची भिक्षा मागणारे हे मजूर भांडवलवाल्यांचें गाठोडें ( भांडवल ) पळविण्याचाच बेत जेव्हां करूं लागले त्याबरोबर भांडवलवाल्यांचे डोळे खाडकन् उघडले. आपल्या भांडवलाच्या संरक्षणार्थ त्यांनीं कंबरा बांधल्या. अशा रीतीनें भांडवलशाहीविरुद्ध जगभर चालूं असलेल्या झगडयास प्रारंभ झाला.

# [ ४ ]

# भांडवलशाहीवर कालचक्र

## नवीन युगाचे प्रवर्तक

फ्रान्सच्या राज्यक्रांतीनें युरोपांतील जुलमी राजांची सत्ता संपुष्टांत आणली. विसाव्या शतकांत जरी कांहीं देशांत ‘ राजा ’ नांवाचा प्राणि दिसला तरी त्याचे अधिकार, सत्ता, हक्क व वर्चस्व यांना पायबंद घातला गेला होता. म्हणजे थोडक्यांत हातनखें काढून पिंजऱ्यांत ठेवलेला सिंह. फार तर समारंभाच्यावेळीं शोभेसाठीं त्याला बाहेर काढून सजवून मिरवावा एवढा काय तो त्याचा उपयोग. म्हणून त्याला “ नियमित राजसत्ता ” हें नांव मिळालें. इंग्लंडमध्यें राजा राज्य करतो, राजाच्या नांवानें राज्यकारभार चालतो पण तो सत्ता मात्र गाजवीत नाहीं असें म्हणतात याचें मर्म सहज लक्ष्यांत येईल.

फ्रान्सच्या राज्यक्रांतीनें मनुष्याच्या मूलभूत हक्कांना मान्यता देऊन जगांत एक अपूर्व गोष्ट साधली. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धांत तर नागरिकांना देशाच्या राजकारणांत निश्चित स्थान व भाग दिल्याविना सरकारला कर बसविण्याचा अधिकार नाहीं असें जाहीर केलें गेलें. लोकशाहीची घोषणा सर्वत्र सुरू झाली. राजसत्तेची जागा लोकसत्ता पटकावूं लागली.

पण एवढयानें भागलें नाहीं. या राज्यक्रांतीमागोमाग जगांत औद्योगिक युग अवतरलें. देशांत नानातऱ्हेच्या उद्योगांना चालना मिळाली. या नवीन प्रकारच्या ऐश्वर्यानें लोकांचे डोळे दिपले. पण ही औद्योगिक क्रांतीची वावटळ स्थिरावतांच लोकांना आढळून आलें कीं या क्रांतीनें मनुष्यजीवनांत अत्यंत मोठ्या उलाढाली केल्या आहेत. लोकशाहीनें हा औद्योगिक भरभराटीचा काल आणला या भ्रांतीचे निराकरण आपोआप होऊं लागलें. कारण दोघांचा अर्थाअर्थी कांहींहि संबंध नव्हता. या नवीन युगांत सत्ता आणि धन यांमधील वितुष्ट विकोपास जाण्याची पूर्वचिन्हें दिसू लागलीं. एकोणिसाव्या शतकांत हिंदुस्थान, चीन, जपान इत्यादि पौर्वात्य मागासलेल्या देशांना वेडावून दाखवून, ' नवीन युगाचे प्रवर्तक ' म्हणून जगभर टिमकी वाजवून मिरविण्यास पाश्चिमात्यांना सांपडलें. पण विसाव्या शतकांत लोकशाहीचा कळस गांठला असें म्हणणारीं पाश्चिमात्य राष्ट्रें घोटाळयांत सांपडलीं; व ' पुढें काय ? ' अशा प्रश्नांकित मुद्रेनें सगळ्या जगाच्या तोंडाकडे तीं केंविलवाण्या चेहऱ्यानें पाहूं लागलीं. नवीन कोणतीच उपाय योजना न सांपडल्यामुळें सक्तीनें व जुलुमानें आपली डळमळती सत्ता ते कशीबशी सांवरून धरितांना दिसत आहेत. लंडन, बर्लिन, पॅरिस, न्यूयॉर्क इत्यादि ठिकाणची सुधारणा—बीजें पौर्वात्य देशांनीं पळविलीं काय म्हणून ते शोधूं लागले आहेत.

## मजुरांचे प्रश्न उद्भवले

औद्योगिक क्रांतीमुळें कारखान्याचें युग आलें व या युगाबरोबर मनुष्याच्या जीवनांत व राहणींत विलक्षण फेरफार झाले. समाजांत मालक व मजूर असे दोन वर्ग निर्माण झाले. मजुरांचें जीवन कारखानदारांच्या मुठींत आलें. उलटपक्षीं मजुरांच्या हातांत मालकाची कसलीच शेंडी राहिली नाहीं. या सामाजिक फेरफारांत धनिक वर्गानें राजसत्ता बळकावली. औद्योगिक क्रांतीनें मध्यम वर्ग पुढारला. लोकशाहीचा काळ असूनहि भांडवलवाले राजसत्ता काबीज करून बसले; लोकशाही तिनें संपूर्ण व्यापिली. लोकशाहीचा मूळ उद्देश, तिचें ध्येय व कार्य हीं एका बाजूस राहिलीं आणि कांहीं काळ भांडवलशाही म्हणजेच लोकशाही असा क्षणभर भ्रम उत्पन्न झाला. या भांडवलशाहीच्या कचाट्यांतून कांहीं मध्यमवर्गीय लोक मान वर काढून स्वतंत्रपणें विचार करूं लागले. त्यांना प्रचलित राज्यकारभारांत योग्य तो फेरफार करावा असें वाटूं लागलें आणि या स्वतंत्र

बुद्धीस पायबंद घालण्याचा प्रयत्न जसजसा भांडवलशाही करूं लागली तसतसा भांडवलशाहीविरुद्ध असंतोषाचा वणवा वाढूं लागला.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत कारखान्याच्या युगामुळें कमींतकमी वेतन, तासांचें मर्यादीकरण, मजुरांची राहणी, शिक्षण, घरें, मुलांचें संगोपन, प्रसूतीची व्यवस्था इत्यादि मजूर-जीवनविषयक नवीन प्रश्न उद्भवले. नवीन राहणीबरोबर आलेलीं दुःखें निवारण होण्याची सोय व्हावी एवढाच हेतू त्या वेळेस मजुरांचा होता. आणि भूतदयावादी बुद्धीनें परोपकार म्हणून कांहींकांहीं गोष्टी मालक करीत होता. वरील गोष्टी मजुरांच्या हक्कांच्या म्हणून कोणीच मानीत नव्हतें. भांडवलवाल्यांच्या मालकींत हिस्सा मागण्याची कल्पना मजुरांच्या स्वप्नांतहि येणें शक्य नव्हतें. पण हळूंहळूं परोपकारानें दिलेल्या सवलतींना हक्कांचें स्वरूप येऊं लागलें व खुशीच्या ऐवजीं सक्ती आली. त्यांत मताधिकार दिवसेंदिवस वाढविण्यांत आल्यामुळें मजुरांच्या गाऱ्हाण्यांची दाद लागण्याचा मोका आला. निवडणुकीच्या वेळीं मतें मिळविण्यासाठीं मजुरांना उमेदवार आकर्षक वचनें देऊं लागले. पण या वचनांची दांभिकता प्रत्ययास येऊं लागल्याकारणानें मजुरांनीं आपला संघटित पक्ष स्थापला.

## मालक मजुरांचा तंटा सुरू

अनियंत्रित राजसत्तेंत पैसा व अधिकार एकाच व्यक्तीच्या हातीं होते. लोकशाहींत त्यांची विभागणी होणार असा रंग दिसूं लागला. पण पैसेवाल्यांना दोन्हीहि गोष्टी सुलभ झाल्या. पैशाच्या जोरावर देशातील उद्योग, व्यापार व धंदे हातीं आले. एवढेंच नव्हे तर त्याच्या जोरावर समाजांत व राजकारणांत मानमान्यता व वर्चस्व मिळविणें हा त्यांच्या उरल्यासुरल्या वेळेंतील व्यवसाय झाला. मोठमोठ्या संघांना, संस्थांना, पक्षांना, हॉस्पिटल, विश्वविद्यालयें, शाळा इत्यादींना मोठमोठाल्या देणग्या देऊन त्यानीं समाजांत दानशूरपणा व मानमान्यता मिळविली. राजकारणात अधिकार व सत्ता मिळवून देणारी जी राजसत्ता म्हणजे संपत्ति आणि ती ज्याच्या हातीं त्यांचें बूड राजकारणांत स्थिर होणें स्वाभाविक होतें. राजकारणांत धनिकांचें प्रस्थ माजलें. इतकें कीं त्यांनीं लोकशाही पुरी ग्रासली.

या भांडवलशाहीच्या अमदानींत भांडवलवाले व मजूर याचा एकमेकांवरील विश्वास नाहींसा होत चालला. लोकशाहीच्यापूर्वी मालक व नोकर याचे संबंध निश्चित ठरलेले होते. नोकर जवळजवळ मालकांचे गुलाम. लोकशाहीच्या कालांत

गुलामगिरी तत्त्वतः नष्ट झाली पण भांडवलवाल्यांच्या वरचष्म्यामुळें मजुरांना सुधारलेल्या गुलामांचें स्वरूप प्राप्त झालें. भांडवलशाही लोकशाहीच्या नांवानें राज्य कारभार पहात होती. लोकशाहीच्या आद्यतत्त्वाप्रमाणें मालक नोकर समान दर्जाचे, सारख्या नागरिकत्वाचा अधिकार असलेले आणि कायद्यानें समान हक्काचे व दर्जाचे ठरले. पण व्यवहारांत औद्योगिक क्षेत्रांत मात्र एक दुसऱ्याचा गुलाम. मजुरांकडून कलाकौशल्य, निष्ठा, प्रामाणिकपणा व मुख्यतः बिनतक्रार आज्ञाधारकपणा यांची अपेक्षा मालक करतो. पण मालक स्वतःची अधिकारलालसा मात्र यत्किंचितहि सोडण्यास तयार असत नाहीं. मालकमजूर यांचे हितसंबंध मूलतःच वेगवेगळे असतात व यांतच दोघांमधील तंट्याचें मूळ असतें. तें मालकांच्या आढ्यताखोरपणामुळें वाढलें. आपल्या एकट्यादुकट्यांच्या गाऱ्हाण्याची दाद लागत नाहीं म्हणून मजूर एकी करून संघ बनवितात आणि या संघशक्तीपुढें मालकांना केव्हांकेव्हां नमण्याचा प्रसंग येत असल्यानें, दोघांमधील प्रेमाचे संबंध द्वेषांचे होत गेले. दोघेहि एकमेकांविरुद्ध चिरडीनें उट्टें काढण्यासाठीं टपून बसले.

## भांडवलशाहीचा आत्मविश्वास डळमळला

अशा स्थितींत विसावें शतक उजाडलें. या शतकात मात्र भांडवलशाहीचा आत्मविश्वास डळमळला. मरूं घातलेलें जुनें युग आणि अवतरित असलेलें नवीन युग या दरम्यानचा काल केव्हांहि धामधुमीचा असणार.

हल्लीच्या युगाचें मुख्य गमक म्हणजे सर्व राष्ट्रांचें परस्परावरील अवलंबन. राष्ट्राची श्रीमंती व देशातील लोकांची उच्चनीच राहणी बाहेरच्या बाजारपेठा काबीज करण्यावर अवलंबून राहिली. एरवीं घरची श्रीमंती कितीहि उगाळली तरी कामीं पडेना. प्रत्येक राष्ट्रानें आपापल्या गरजा भागवून स्वावलंबी व्हावें ही जाणीव बळावली व याचा परिणाम प्रत्येकानें आपल्याभोंवती गगनचुंबी जकातीचे तट बांधण्यांत झाला. जगांतील मोकळ्या देवाणघेवाणीस प्रत्येक ठिकाणीं खो बसला. खुल्या व्यापाराचा टेंभा मिरविणारें एकटें इंग्लंड; त्यालासुद्धां जागतिक मंदीनें संरक्षित व्यापाराकडे वळावें लागलेंच कीं नाहीं ? वाढत्या उत्पादनाचीं साधनें यंत्ररूपानें दिवसेंदिवस भयंकर प्रमाणांत वाढूं लागलीं आणि त्यामुळें जुन्या बाजारपेठा अपुऱ्या पडून नित्य नव्या पेठांची जरूरी भासूं लागली. बाजारपेठा काबीज करण्यासाठीं आतां राष्ट्रांना आपापसांत मारामारी ऊर्फ युद्धें केल्याविना गत्यंतर राहिलें नाहीं. ( Modern wars are for markets. ) उत्पादनाच्या प्रचंड

साधनांमुळें राष्ट्रांतील बेकारीचा प्रश्न उग्र स्वरूप धारण करूं लागला. राष्ट्रावरील कर्जाचा डोंगर उंचउंच होऊं लागला. यामुळेंच राजकीय प्रश्नावरील पक्षभेद थांबून आर्थिक प्रश्नावर ते लागले. गरीबांचा वाली सरकार अशी घोषणा प्रत्येक करूं लागल्यानें श्रीमंतांची श्रीमंती सरकारद्वारा गरिबांच्याकडे जाण्याचा मार्ग सुलभ झाला.

या नवीन आर्थिक युगास योग्य अशी शासनपद्धती शोधून काढणें मोठें दुर्घट होऊन बसलें. औद्योगिक क्षेत्रांतील पुढाऱ्यांच्या हातीं राजसत्ता आल्यानें स्वार्थाकरतां ते स्वतःच्या लोकाविरुद्ध लढण्यास त्याचा दुरुपयोग करूं लागले. कारण स्वतःच्या हातांतील अधिकार व सत्ता ते सुखासुखी गमावण्यास कसे तयार होतील ? यामुळेंच सर्वसाधारण जनतेस सामाजिक क्रांतीचा अवलंब करून धनिक वर्गाची सत्ता सक्तीनें काढून घेणें हा अगर भांडवलशाही देईल त्या सवलती अपुऱ्या असल्या तरी संतोषानें स्वीकारणें हा असे दोनच मार्ग उपलब्ध राहतात. बहुजनसमाज क्रांतीला नेहमीं नाखूष असतो. दुसऱ्या मार्गात मिळणाऱ्या सवलती बहुजन समाजाच्या रोजच्या वाढत्या गरजेस व मागणीस अपुऱ्या पडूं लागतात असा नेहमींचा अनुभव आहे. अशा द्विधा मनोवृत्तीनें भांबावलेला बहुजनसमाज आज भाडवलशाहीशीं टक्कर देऊं इच्छितो. बाकी कांहींहि असो; दोघांच्या दरम्यान भांडणाला प्रारंभ झाला आहे हें मात्र निश्चित.

## पोटांतील आगीवर होमिओपॅथिक गोळी

भांडवलशाहीविरुद्ध सध्यां झगडा चालू आहे तो मुख्यत्वेंकरून तिच्या सत्तेविरुद्ध व शिस्तीविरुद्ध. केवळ राज्यपद्धतींत थोडाफार बदल करून लोकांचें समाधान होण्यासारखी परिस्थिति राहिलेली नाहीं. कारण लोकांच्या असंतोषाची बीजें फार खोलवर गेलेलीं आहेत. समप्रमाणांत प्रतिनिधित्व ( Proportional Representation ), कायदा सुचविण्याचा अधिकार ( Initiative ), कायद्याला मान्यता देण्याचा अधिकार ( Referendum ), कायदेमंडळांतील प्रतिनिधीला परत बोलावण्याचा हक्क ( Recall ) इत्यादि सर्व प्रयोग झाले. पण लोकांचें समाधान होईना. पोटांत आगीचा डोंब उसळला असतां त्यावर लहान होमिओपॅथिक गोळी देण्यासारखे हे मार्ग होऊं लागले.

कोणतीहि राज्यघटना सर्वांशीं समाधानकारक व दोषरहित असूं शकत नाहीं आणि त्या घटनेंतील जिवंतपणा नाहींसा झाल्यावर तिला कोणी विचारणारहि

नाहीं हें खरें. कोणतेंहि राज्ययंत्र लोकमताचें निदर्शक किंवा प्रतिबिंब असें नेहमीं ठेवणें अत्यंत अवघड काम आहे. त्यासाठीं लोकांनीं समंजसपणें सर्वसंमत असे फेरफार आपण होऊन केले पाहिजेत. ती आपुलकीची आस्था नसेल तर सर्व व्यर्थ. राष्ट्रसंघ याचमुळें अयशस्वी झाला. संयुक्त राज्यघटनेची लोकप्रियताहि या कारणास्तव ओसरूं लागली.

याच गोष्टीच्या अभावामुळें बहुमताच्या जोरावर हुकूमशाही गाजविण्याचा काळ आज येऊन ठेपला आहे. अल्पमतवाल्यांचीं मतें सर्वत्र चुकीचीं असतात असें नाहीं. त्यांच्यांतहि थोडाफार सत्यांश व प्रामाणिकपणा असतो. त्यांचे पुढारी समंजस व व्यवहारज्ञ असतात. पण त्यांचें शहाणपण सत्तेपुढें लुळें पडतें. लोकमतांना संभाळून लोकांची मनधरणी करणाऱ्या सरकारांपेक्षां धाकधपटशा दाखविणारे सरकार जास्त जास्त लोकप्रिय होऊं लागलें आहे. स्वातंत्र्याची स्तुतिस्तोत्रें मनमुराद गाणाऱ्या लोकशाहीच्या राजवटींतसुद्धां व्यक्तिस्वातंत्र्यावर घाला घालणारे कायदे सरकार जारी करूं शकतें असा अनुभव आला. फार काय, रशियन राज्यक्रांतींतील सैतान आज साधुसंत ठरले नाहीं का ? भांडवलशाहीनें ज्या ज्या म्हणून सवलती मजुरांना दिल्या त्यामुळें मजुरांची सत्ता वाढतच गेली. लोकमतास कौल लावण्याचा केलेला प्रत्येक प्रयोग अंगावर येत गेला. मताधिकार विस्तृत झाले पण त्यामुळें विरोधीपक्ष अधिक अधिकारसंपन्न झाला. जो अनुभव राजकारणांत तोच औद्योगिक क्षेत्रांत. समानाधिकार, फायद्यामध्यें मजुरांचा हिस्सा, मजूरमालकांचे मिळून कौन्सिल इत्यादींमुळें मजुरांना अधिक अधिकार मिळाले व ते भांडवलशाहीविरुद्ध उठले. समाजवादाचीं तत्त्वें व्यवहारांत आणण्याच्या योजना पुढें येऊं लागतांच धनिकांचें धाबें दणाणलें.

## भांडवलशाहीचे दोष

भांडवलशाहींत पुढें येणाऱ्या सर्व गोष्टींमध्यें अनिश्चितता, निर्बलता व संदिग्धपणा हे दोष प्रामुख्यानें दिसून आले. या दोषांमुळें प्रत्येक अडचणींत भांडवलशाहीनें अपयश पदरीं बांधून घेतलें. ट्रेड डिस्प्यूटस् कायद्यासारख्या कायद्यानें मालक मजुरांमधील कांहीं भांडणें मिटवितां आलीं म्हणून कांहीं त्यामुळें भांडणाचें मूळ नाहींसें करतां आलें नाहीं.

एकंदरींत लोकशाही जन्माला आली ती स्वातंत्र्य व समता बरोबर घेऊन आली. पण लोकशाहीच्या अमदानीस योग्य अशीं स्वातंत्र्य व समता हीं लोकांना

भांडवलशाहीनें उपभोगण्यास दिलीं नाहीं. म्हणून भांडवलशाही कुचकामाची असा ग्रह उत्पन्न झाला. स्वातंत्र्य व समता हीं तत्त्वें व्यवहारांत उतरूं देण्यास भांडवलशाहीनें अपूर्व स्वार्थत्याग करणें भाग होतें. स्वा‌ंचा फायदा व खासगी मालमत्ता यावर पाणी सोडण्यास भांडवलवाल्यांनीं तयार झालें पाहिजे होतें. तरच ती गोष्ट शक्य झाली असती.

## भांडवलशाहीवर गंडांतर

लोकशाही जिवंत राहील कीं नाहीं हा आजचा मुख्य प्रश्न नाहीं. अनियंत्रित जुलमी सत्तेपासून आपली सोडवणूक करून घेऊन लोकशाहींतील स्वातंत्र्याच्या जीवनास चटावलेला लोकांचा आत्मा, तें सर्व कायमचें टाकून, परत व जुलमी एकतंत्री सर्वाधिकाऱ्याच्या हातीं आपलें सर्वस्व सदासर्वकाळ देईल हें शक्य नाहीं. आज ती गोष्ट दिसत असली तरी ती नैमित्तिक आहे. नित्याची नाहीं. त्यांत लोकशाहीचा कांहींतरी निराळा हेतू असण्याचा संभव आहे. लोकशाही जिवंत राहील कीं नाहीं हा आजचा मुख्य प्रश्नच मुळांत उत्पन्न होऊं शकत नाहीं कारण निर्भेळ व निर्दोष लोकशाही ही चीजच मुळीं जगांत आज नाहीं, तेथें तिच्याविषयीं भविष्य वर्तविणेंच चूक. भांडवलशाही जिवंत राहणार कीं नाहीं हा आजच्या घटकेचा मुख्य व जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. आणि तो प्रश्न कां उद्भवला तर भांडवलशाही राज्यकारभार पाहण्यास येथून पुढें नालायक ठरूं लागली म्हणून. आजच्या लोकशाहीच्या नांवानें चालणाऱ्या राजवटींतील सर्व दोष भांडवलशाहीचे आहेत. कारण खरी लोकशाही अत्यंत पवित्र असून; समता, स्वातंत्र्य व बंधुत्व या त्रयीवर ती अधिष्ठित झालेली आहे. अशा अबाधित तत्त्वांवर उभारलेली लोकशाही जिवंत राहील कीं नाहीं हा प्रश्न विचारणेंच मूर्खपणाचें आहे. भांडवलशाहीवर हें गंडांतर का व कसें आलें हें आपण विस्तारपूर्वक पाहिलें. आतां ती भांडवलशाही लोकशाहीचा बळि घेऊन नष्ट होणार कीं बऱ्या बोलानें लोकशाहीस निर्वेध राज्य करूं देणार एवढयाचाच काय तो विचार करणें शिल्लक राहिलें आहे.

## समाजवाद वाट चालूं लागला

समाजांत स्वातंत्र्याचें खुलें वातावरण खेळूं देणें ही गोष्ट सोपी नाहीं. भांडवलशाहींत व्यक्तिस्वातंत्र्य फक्त मालमत्ता धारण करणाऱ्या लोकानाच लाभूं शकतें. समाजांत मालमत्ता धारण करणारे लोक केव्हांहि अत्यल्प असावयाचे. बहुसंख्या-

कांची स्वातंत्र्याची कोणतीहि योजना भांडवलशाहीचा पाया खणून काढणारी व्हावयाची. समता आणि स्वातंत्र्य यांची नेहमीं जोडगोळी असते. आणि ही समतेची कल्पना धनिकांच्या मुळावर येते.

जें थोडेंबहुत स्वातंत्र्य लोकाना असतें त्याचा उपयोग लोकप्रचलित सरकाराविरुद्ध होऊं लागला कीं त्या स्वातंत्र्याची पायमल्ली होते. अशा स्वातंत्र्याच्या गळचेपींतून समाजवादाचीं तत्त्वें वाट काढीत पुढें आलीं. मजूर पक्ष समाजवादाच्या कांहीं तत्त्वाचें प्रतिपादन करूं लागला. भाडवल एकटयादुकटयाच्या मालकीहक्कांतून उठून बहुजनसमाजाच्या मालकीचें होणें हा परमेश्वरी न्याय आहे असें रस्किनसारखे लेखक म्हणूं लागले. भांडवलशाहीच्या अमदानींत समाजवाद प्रात्यक्षात उतरणें अशक्य आणि समाजवाद्यांनीं आपली सत्ता उपटलेली उघडया डोळयांनीं पाहण्याचा प्रसंग भाडवलशाही कदापिहि सहन करणार नाहीं. शिवाय पार्लमेंटरी राजवटींत सर्व गोष्टी सामोपचारानें व एकमेकाच्या विचारविनिमयानें, सोईगैरसोईनें ठरविल्या जात असल्यामुळें कोणतीहि जालीम सुधारणा अंमलांत येऊं शकत नाहीं. लोकसत्तेचें आत्यंतिक उग्र स्वरूप केव्हांहि संपत्ति व जन्म यायोगें निर्माण होणारे समाजांतील भेदभाव नष्ट करण्याचा प्रयत्न करणार हें उघड आहे. कदाचित् सामाजिक विषमतेचें उच्चाटन प्रारंभीं सवलतीच्या व सामोपचाराच्या मार्गानें झालें तरी अखेर तिचें निर्मूलन होण्याकरतां अखेर ती भयंकर स्वरूप धारण करणारच. कारण लोकसत्तेचा उत्कर्ष हा निव्वळ स्वातंत्र्याचा उत्कर्ष नसून त्याच्या जोडीस समतेचाहि उत्कर्ष आहे. याउलट भांडवलवाले समाजांतील विषमता कायम ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न करणार. मजुरांचा एकादाहि पुढारी कॉन्झर्व्हेटिव्ह प्रधानमंडळात शिरूं शकत नाहीं अशी जी एक म्हण आहे तिचें रहस्य हेंच *

## नवीन समाजरूपी अपत्य

कम्युनिझम, सोशॅलिझम वगैरे तत्त्वज्ञान जगभर प्रसृत झालें असून त्याच्या बऱ्यावाईटाची चिकित्सा प्रत्येक जण आपापल्या बुद्धीप्रमाणें व परिस्थितीप्रमाणें करीत असतो. समाजवाद व्यावहारिक करण्याच्या नवनवीन योजनेंतहि मनुष्य कल्पकतेनें रोज भर घालीत आहे. समाजवाद आज जगांत एक नवीन समाज-

* No child of a working-class parents has ever sat in a conservative Government.

घटना आणूं इच्छितो. जुन्या समाजघटना पार मोडून टाकून ही नवीन घटना आली पाहिजे असें आत्यंतिक आग्रही स्वरूपहि तो धारण करीत आहे. कोणतीहि सर्वस्वी नवीन समाजघटना जन्म घेतांना केव्हांहि दुःखदायकच असणार. कोणी म्हणतील कीं नवीन समाजघटनारूपी अपत्य जुन्या समाजाचें पोट चिरून बाहेर काढलें पाहिजे; तर कोणी म्हणतील कीं थोडा अवधि लागला व क्लेश सहन करावे लागले तरी हरकत नाहीं पण शस्त्राचा उपयोग न करता हें बाळंतपण शहाण्या दाईकडून कुशलतेनें करून घेतलें जावें हें सर्वांच्या हिताचें आहे. समाजवाद आज व्यवहारांत यावयाचा झाला तर तो दोन तऱ्हेनें येऊं शकेल. एक सामाजिक क्रांतीच्या मार्गें व दुसरा सनदशीर मार्गानें या दोन्ही पद्धतींचे गुणदोष अवलोकन करणें अपरिहार्य आहे.

## क्रांतीची शक्याशक्यता

मनुष्य जात्या क्रांतिप्रिय मुळींच नाहीं. कामकरीवर्गास तरी क्रांति कोठें हवी असते. ? नोकरीची शाश्वति आणि वाढता पगार या त्यांच्या खऱ्या मागण्या. मनुष्य नाइलाजानें आणि परिस्थितीमुळें क्रांतीसारखा जालीम मार्ग अनुसरण्यास तयार होतो. क्रांतीमुळें काय अंतिम हित होईल तें होवो पण असंख्य जनतेच्या वांटयांस परमावधीचे क्लेश व आत्यंतिक हाल नक्की येतात. यामुळें क्रांतीनंतर दुःखदायक आठवणीच्या बोंचणीनें मनुष्यास पुरा पश्चात्ताप होतो. फार काय गरिबांच्या केवळ कल्याणार्थ झालेल्या रशियन राज्यक्रांतीस प्रथम लाभलेलें अनुकूल लोकमत नंतर पालटलें. क्रांति ही गोष्ट फुकाची नाहीं. क्रांति घडवून आणणें ही एक कला आहे ( The revolution is an art: Lenin ) क्रांतीस योग्य वेळ आणि सुंदर संधि असल्याशिवाय क्रांतीचा मार्ग स्वीकारणें अत्यंत धोक्याचें असतें. भांडवलवाल्यासमाजाविरुद्ध पुकारलेलें बंड जर दुर्दैवानें अयशस्वी झालें तर ही भांडवलशाही समाजाच्या उरावर बसून लोकशाहीचा प्राण घेतल्याशिवाय राहणार नाहीं असें स्पष्ट मत प्रत्यक्ष लेनिननें दिलेलें आहे. ( १ ) राष्ट्रांतील एका पक्षाचें अगर गुप्त कटाचें बंड असतां कामा नये. ( २ ) क्रांतीची आवश्यकता सर्वांना भासली पाहिजे आणि ज्या वेळेस सरकारविरुद्ध अप्रियतेचा कळस देशांत झालेला असतो अशी वेळ साधली पाहिजे. ( ३ ) मोठी क्रांति सैन्याच्या फंदफितुरीशिवाय आजवर यशस्वी झालेली नाहीं. यशस्वी क्रांतीस आवश्यक लागणाऱ्या तीन गोष्टींचा हा आराखडा लेनिननें दिलेला आहे.

वरील सर्व गोष्टी रशियन राज्यक्रांतीच्या वेळीं एकसमुच्चयानें घडल्या म्हणून ती राज्यक्रांति यशस्वी झाली. परंतु विशिष्ट परिस्थितींत लेनिनला मिळालेलें यश इतरत्र मिळेलच असें सांगणें फार अवघड आहे. किंबहुना रशियाचें उदाहरण हें इतिहासांतील एकमेवच आहे. कारण आजवर दुसऱ्या कोणत्याहि झालेल्या राज्यक्रांतींत राज्यघटना जरी बदलली तरी सर्वच्या सर्व समाजघटना ढांसळून पडलेली नाहीं. नवीन समाजघटनेच्या आधारस्तंभावर नवीन राज्यघटनेचा डोलारा एकट्या रशियांतच उभारला गेला आहे.

एकंदरींत क्रांति ही गोष्ट सोपी नाहीं याचा निर्वाळा प्रत्यक्ष रशियन राज्य-क्रांतीच्या अध्वर्यूंनीं दिला असल्यानें सध्यां भांडवलशाहीविरुद्ध जो झगडा जगा-मध्यें चालू आहे त्याचें रूपांतर क्रांतीमध्यें होईल असें वाटत नाहीं. कारण त्या क्रांतीमुळें निव्वळ राज्यघटना बदलणार नसून प्रचलित सामाजिक व्यवस्थेंत प्रचंड फेरफार व्हावयाचे आहेत. तशीच आणिबाणीची परिस्थिति प्राप्त झाल्याविना चालू असलेल्या सामाजिक घटनेचा खून करण्यास मनुष्य सहसा तयार होत नाहीं. क्रांति जर अशक्य तर मग भांडवलशाहीच्या कचाट्यांतून लोकशाही कशी निसटणार हा मोठा पेंच आहे.

एकादा असाध्य रोग फक्त शस्त्रक्रियेनेंच साध्य असावा आणि काय वाटेल तें झालें तरी शस्त्रक्रिया करावयाची नाहीं असा पक्का निर्धार असला म्हणजे ज्याप्रमाणें मनुष्य नानातऱ्हेच्या औषधांचे प्रयोग करून पाहतो, त्याप्रमाणें समाज-घटना क्रांतीशिवाय बदलणें अशक्य, पण क्रांति तर करावयाची नाहीं, अशा वेळीं सनदशीर मार्गानें समाजघटनेंत व राज्यघटनेंत इष्ट ते फेरफार होऊं शकतील कीं काय याविषयीं सर्वांना अत्यंत आतुरता वाटते.

## सनदशीर मार्गानें समाजवाद !

राष्ट्रांत सोशॅलिस्टपक्ष स्थापून निवडणुकी लढवून कायदेमंडळांतील बहुमत काबीज करणें हा सनदशीर मार्गाचा ओनामा. या बहुमताच्या जोरावर राजकीय आणि सामाजिक घटनेंत पाहिजे ते फेरफार घडवून आणणें ही या मार्गाची फलप्राप्ति. या मार्गानें जाण्यास लोकांची सर्वांगीण सहानुभूति पाहिजे हें उघड आहे. पण भांडवलशाहीचीं पाळेंमुळें समाजाच्या बुडाशीं इतकीं खोलवर गेलीं आहेत कीं प्रचलित समाजाविरुद्ध जाणारा पक्ष निवडणुकींत यशस्वी होईल हेंच अगोदर संभवनीय दिसत नाहीं. भांडवलशाहीपासून अत्यंत मोठे दुष्परिणाम

होतात हें जरी मान्य झालें तरी त्या भांडवलशाहीनें गेल्या शेंदीडशें वर्षांत केलेल्या सर्व सुखसोई व सुधारणा टाकून, ज्या समाजवादांविषयीं कांहींच निश्चित नाहीं त्याकरतां भांडवलशाहीविरुद्ध बंड पुकारण्यास मनुष्य धजणार नाहीं. भांडवलशाहीविरुद्ध बंडाची गोष्ट बोलावयास अत्यंत सोपी आणि चुरचुरीत वाटली तरी आचरण्याला असिधाराव्रताप्रमाणें आहे. आज भांडवलशाहीच्या हातीं राष्ट्रांतील एकूण एक अधिकार, सत्ता, संपत्ति, विद्वत्ता इत्यादि सर्व साधनें आहेत हें विसरून भागणार नाहीं. प्रचलित राज्यसंस्थेचे ते सूत्रधार आहेत. लोकशिक्षणाची व्यवस्थादेखील त्यांनीं आपल्या हितसंबंधास धक्का न लागेल अशा बेतानें केलेली आहे. राजकारणांतील लोकमताचे कर्णधार वर्तमानपत्रें ( The forces of the press ) हीं त्याच्याच ताब्यांत आहेत. एकूण समाजवादाचीं तत्त्वें कितीही उदात्त आणि सत्यास धरून असलीं तरी तीं बहुजनसमाजास पटण्यासारखी आणि पटविण्यासारखी परिस्थिति आजच्या घटकेला नाहीं. म्हणून समाजवाद्यांना निवडणुकीच्या आणि कायदेमंडळातील बहुमताच्याद्वारां देशात समाजवाद प्रस्थापित करणें कठीण आहे.

इतकें असूनही समाजवाद्यांनीं कायदेमंडळांतील बहुमत काबीज केलें तर काय घडूं शकेल तें पाहूं. ( १ ) भांडवलशाही हुकूमशाहीचें स्वरूप धारण करील आणि समाजवाद्यांचा पाडाव करील. कदाचित् या झगड्यांत भांडवलशाहीच्या उग्र स्वरूपामुळें समाजवाद्यांची देशातून कायमची हकालपट्टी होण्याचा संभव आहे. ( २ ) किंवा समाजवादी अधिकारारूढ होतील व सरकारी सूत्रें हातीं घेतील. तथापि त्यांना भांडवलशाही संपूर्ण नष्ट करता येणार नाहीं. कारण राज्ययंत्रांतील प्रत्येक लहानसहान घटकांत भांडवलशाहीचें प्रस्थ माजलें असल्यानें या समाजवादी सरकारला चोंहोकडून प्रचंड विरोध होईल आणि सर्वच्या सर्व समाजवाद समाजाच्या गळीं उतरविणें अशक्य होईल. अमेरिकेसारख्या देशामध्यें कायदेमंडळांतील बहुमत आणि अध्यक्षस्थान हीं दोनहि जिंकलीं तरी समाजवाद्यांना उत्तम शह देण्यास न्यायालयें शिल्लक राहतात ( ३ ) किंवा प्रचलित सरकारच समाजवादाचीं तत्त्वें मान्य करून व अंगिकारून शांततेनें हळूंहळूं अंमलांत आणील. या रीतीनें समाजघटना बदलणें शक्य आहे असें वाटतें खरें. कारण लोकसत्तात्मक राज्यपद्धतींत सर्व गोष्टी एकमेकांच्या विचारविनिमयानें, बहुमतानें व संमतीनें ठरतात हें अत्यंत फायद्याचें असतें. यायोगें समाजांत

केलेला कोणताहि फेरफार लोकांना तडकाफडकी झाल्यासारखा वाटत नाहीं. समाजसुधारणा अमलांत येण्याच्या अगोदर लोकांमध्यें पार्श्वभूमी तयार होत राहते. कोणत्याहि रीतीनें लोकांत खळबळ उडेल व एकाद्या पक्षाला अगर वर्गाला दहशत बसेल अशी गोष्ट पार्लमेंटरी राज्यव्यवस्थेंत सहसा घडत नाहीं या तिच्या नैसर्गिक गुणांमुळें प्रातिनिधिक राजवटींत समाजवादाचीं तत्त्वें व्यवहारांत येऊं शकतील पण भांडवलशाहीला आपल्या फायद्यावर व भांडवलावर पाणी सोडून अपूर्व स्वार्थत्याग शहाणपणानें करावा लागेल या एका अटीवर.

## भांडवलशाहीचें भवितव्य

प्रत्येक देशांत सनदशीर प्रयत्नवादी समाजवाद्यांचा पक्ष आहे. प्रत्येकाचे मार्ग व साधनें भिन्न आहेत. इंग्लंड व फ्रान्समध्यें तर तो नुसता कागदी आहे. या सनदशीरवाल्यांना लोकसत्तात्मक राज्यपद्धतीचीं तत्त्वें कायम होऊन प्रचलित समाजघटना बदलतां येईल असें प्रामाणिकपणें वाटतें. * सनदशीर मार्गानें समाजवादाचीं तत्त्वें अंगिकारून व्यवहारांत आणावीं अशा प्रकारचे वारे सध्यां जगामध्यें वाहात आहेत. दुसऱ्या बाजूनें कम्यूनिझमचा बागुलबोवा भेडसावीत आहे. संघटित भांडवलशाहीच्या विराट स्वरूपांतील विश्वरूपदर्शनानें जगाची तारांबळ आणि गाळण उडाली आहे. अशा जागतिक संक्रमणावस्थेच्या काळांत तरी निदान भांडवलशाही अधिकार संन्यास घ्यायला तयार होईल काय असा सवाल आज लोकशाहीचा एकनिष्ठ उपासक भांडवलशाहीस करीत आहे. या सवालाचें उत्तर ज्या प्रमाणात भांडवलशाही शहाणपणानें, विवेकानें, सूज्ञपणानें आणि दूरदर्शीपणानें देईल त्यावरच तिचें भवितव्य अवलंबून आहे.

---

* The urgency arises for the development of a machine of Government which preserves the fundamental conceptions of democracy and freedom and at the same time enables the elected majority to carry through rapidly and without interference the drastic changes desired by the people—Sir Stafford Cripps.

[ ५ ]

# लोकशाहीचे गुणदोषविवेचन

## द्राक्ष अंजिरांच्या गर्द सांवलींत

कोणतीहि राज्यसंस्था सर्वस्वी निर्दोष असूं शकत नाहीं. त्यास लोकशाही ही अपवाद कशी ठरणार ? आज लोकशाहीप्रधान राजवटींत कांहीं दोष प्रातिनिधिक व्यवस्थेपासून निर्माण झाले आहेत आणि कांहीं दोष तिला भांडवलशाहीनें चिकटविले आहेत. प्रातिनिधिक राज्यव्यवस्थेंतील राजकारण बहुतांशीं पक्षभेदावर चालतें आणि या पक्षभेदांमुळें अनेक दुर्गुण उद्भवतात. सर्व प्रकारचे दोष पत्करूनहि माणसानें लोकशाहीचाच हट्ट कां धरावा व धरला पाहिजे याची चर्चा प्रामुख्यानें या प्रकरणात करावयाची आहे. लोकशाहीविरुद्ध पहिला आक्षेप असा आहे कीं तिची सजावट सर्वसामान्य माणसाच्या अकलेनें झालेली असते. तींत विशेष करामतीची अपेक्षा करणें चुकीचें होईल. दुसरा आक्षेप असा कीं प्रातिनिधिक संस्थेंतील राजकारणाचा धंदेवाईकांनीं आपमतलबीपणामुळें चुथडा केला आहे. तिसरा आक्षेप असा कीं प्रातिनिधिक राज्यसंस्था पुराणमतवादी बनली आहे. ब्राईस म्हणतो कीं ''सर्वसाधारण मनुष्यस्वभाव जीर्णमताला चिकटून राहणारा असतो. लोकशाहींत असले लोक राज्यकर्ते बनतात व सत्ता आणि श्रीमंती यांची लयलूट मिळाली म्हणजे त्यांत ते संतोष मानतात. द्राक्ष अंजिराच्या गर्द सावलींत वरून अचूक पडणारीं द्राक्षें अंजिरें मटकावीत व संगीताच्या गोड लकेरी ऐकण्यांत कालक्रमण करण्याचा मनुष्यस्वभाव आहे. मनुष्य फक्त विकारास

अगर भावनेस बळी पडतो. स्वार्थापलीकडे तो पाहूं इच्छित नाहीं. डोक्याला जास्त शीण देण्याची त्याला इच्छा असत नाहीं. रोजच्या प्रापंचिक व्यवसायाव्यतिरिक्त इतस्ततः पाहण्यास त्यास अगोदर फुरसत मिळत नाहीं. ती मिळाली तर एकाद्या प्रश्नाचा सांगोपांग विचार करण्याइतकी बुद्धि त्याच्यापाशीं असत नाहीं आणि ती असलीच तर सुखासीनतेमुळें ती खर्च करण्याची त्याला इच्छा असते. लोकांच्या वाढत्या नालायकीची ही शिडी. फार काय त्याला आपल्या हक्कांची जाणीवसुद्धां असूं शकत नाहीं. मग त्याची अंमलबजावणी करण्याची उत्सुकता तर दूरच राहिली. चालू युगांतील राजकीय प्रश्न अत्यंत भानगडीचे व गुंतागुंतीचे झाले आहेत. उदाहरणार्थः हिंदुस्थानांत '१८ पेन्स विरुद्ध १६ पेन्स' हा रुपयाच्या हुंडणावळीसंबंधाचा वाद किती लोकांना समजला होता? राजकीय, आर्थिक, शैक्षणिक, धार्मिक इत्यादि अत्यंत गुंतागुंतीच्या भानगडींत मतदारांना मतें देण्यास लावून निर्णय घेणें म्हणजे देवाला कौल लावण्यापैकींच एक प्रकार.

लोकशाहींत दुसरा एक दोष असा आढळतो कीं सर्व मतदारांना एकाच साच्यांत ओंतलें जातें. उच्च भूमिकेवरून विचार करणारांच्या मतांची खिसगणतींत जमा होते. एका रंगरूपाचीं व गुणधर्माचीं मतें बनविण्याच्या प्रयत्नामुळें लोकशाहींत दूरदर्शित्वाचा अभाव व जडत्व हे अवगुण उतरले. लोकशाहींत सर्व मतांना सारखीच किंमत दिली जाते. त्यापैकीं एक अधिक ज्ञान, अनुभव व जाणीव यांनीं दिलेलें असेल तर दुसरें अज्ञान, अनुभव व बेफिकीरी यांनीं घडविलेलें असेल. धान्याची रास मोजल्याप्रमाणें शाहणा व मूर्ख यांच्या मतांची मोजणी एकाच मापानें केली जाते; त्यांच्या वैयक्तिक गुणधर्माप्रमाणें वजन केलें जात नाहीं. ( Opinions are counted and not weighed ). एक ग्रंथकार म्हणतो, "गुणावगुणांचा पृथक्पणें विचार करण्यापासून नेहमीं प्रगति होते. अशी विचारशक्ति एकतंत्री राज्यसंस्थेंत असल्याकारणानें आजवर तिनें प्रगति साधली. या गुणांच्या अभावीं लोकशाही अखेर बेबंदशाहीपर्यंत निकृष्ट होऊं शकते आणि तींत मनुष्याचे अंगभूत दोष, विकार, भावना, द्वेष, मत्सर व स्वार्थ यांचा अखेर विजय होतो." *

---

* "Progress is the function of Aristocracy; for an advance in all things has come through differentiation. Democracy degenerates into function of the premitive psychology of the Crowd, observed by elementary impluse, by condition, by prejudice, by living only in and for the present."

## इतिहासांतील दाखले

मतदार स्वतः शहाणा असत नाहीं. तो शहाण्यास निवडून देण्यास अपात्र ठरतो. बहुशः मतदार आपल्यासारख्या मूर्ख व नालायक माणसास अगोदर पसंत करतो कारण तो माणूस हीन दर्जाच्या लोकांत बसूंउठूं शकतो व त्यांच्या मनाची पकड घेऊं शकतो. चांगले बुद्धिवान् व विद्वान् लोक एकांतप्रिय असतात. बहुजनसमाजाची हांजीहांजी करण्यास त्यांना वेळ असत नाहीं. समाजाशीं फटकून वागण्याच्या त्यांच्या लौकिकामुळें ते लोकांच्या विश्वासास पात्र होत नाहींत. याच्या उलट बेअकली, नालायक आणि नादान गावगुंड ती जागा पटकावतात. "लोकशाही नालायक व दळभद्र्या लोकांना उत्तेजन देऊन दिवसेंदिवस अवनतावस्थेस पोचते आणि अखेर उच्च मनुष्यजातीशीं व संस्कृतीशीं युद्धास प्रवृत्त होते." हा नित्शेचा सिद्धांत आज जर्मनीनें उराशीं धरला आहे.

देशांत पक्ष स्थापून त्यांच्या आधारानें वरील कसब कसें साधावें हें गांवगुंडांना खासें समजतें. पक्षांच्या पाठीच्या कण्याशीं नेहमीं जाडजूड धनिकवर्गाचें प्रस्थ असतें. या पक्षाकरवीं हा धनिक वर्ग आपल्या पोळीवर हवें तितकें तूप ओतून घेतो. कायद्याच्या प्रगतीस अवनत कळा, राज्यकारभारांत लांचलुचपत आणि जबाबदारीचा अगर नेतृत्त्वाचा अभाव या गोष्टी भांडवलवाल्यानीं लोकशाहीस चिकटविल्या. भांडवलवाल्यांच्या खांद्यावर चढून इतरांवर गावगुंडानीं शेखी मिरवावयाची आणि त्याची परतभेट म्हणून भांडवलवाल्यांच्या हितसंबंधाला यत्किंचितहि कात्री न लागूं देण्याबद्दल त्यांनीं दक्षता बाळगावयाची. भाडवलवाल्यानीं लोकशाहीचा कारभार अत्यंत खर्चाचा व उधळपट्टीचा केला आहे. अनिवार्य संकटाच्या वेळीं हटकून दगा देणारा म्हणून त्याचा लौकिक झाला आहे. वर निर्दिष्ट केलेल्या दोषामुळें लोकशाहीचे मारेकही म्हणून बहादुरी मिळविणारे महाभाग सध्यां दिसत आहेत. " मानवजातीचा सर्व इतिहास एकतंत्री राजवटीच्या दाखल्यांनीं भरलेला आहे. कांहीं थोडया तज्ञांच्या हातीं नियंत्रित सत्ता देणें नेहमीं हिताचें असतें, त्याहीपेक्षां अशा तज्ञांना अनियंत्रित सत्ता बहाल करणें अधिक फायद्याचें असतें आणि सर्वांत शहाणा राजा व हुकूमशाहा यांना सर्वाधिकार सुपूर्त करणें सर्वोत्कृष्ट असतें," अशी एका विद्वानानें घोषणा केली आहे. ('History is a sound aristocrat. Limited expert oligarchy is better still and unlimited expert monarchy or dictatorship

the best. " ) वादाकरतां शहाणा व निस्वार्थी हुकूमशहा राष्ट्राचा उपकर्ता मानला तथापि तो सदासर्वकाळ मनुष्यांना लाभेल काय ?

## शिस्तीच्या गाड्याचीं चक्रें

एवढे सारे अवगुण पत्करूनहि इतर कोणत्याहि राज्यव्यवस्थेपेक्षां लोकशाहीच परवडली असें आग्रहानें सांगणारांचें म्हणणें अगदींच फोल नाहीं. तात्त्विकदृष्ट्या नव्हे तर व्यावहारीकदृष्ट्याहि ती मनुष्यास अधिक हितप्रद आहे.

लोकशाही अपूर्ण आणि सदोष आहे, सबब तिचा स्वीकार करूं नये हें म्हणणें रास्त नाहीं. हे दोष जगांतील कोणत्या गोष्टींत नाहींत ? खुद्द मनुष्य तरी त्या दोषापासून अलिप्त आहे काय ? म्हणून कांहीं कोणी त्राग्यात्राग्यानें जीव देण्यास जात नाहीं. एकतंत्री राज्यसत्ता प्रथमदर्शनीं कितीहि गोंडस, सुरेख व कार्यक्षम दिसली तरी अखेर ती बाधतेच. कित्येकांना दुसऱ्याच्या अधिकाराची हेटाळणी करण्याचा हव्यास असतो. पुष्कळांना अधिकाराची हांव असते पण अंगीं शहाणपण नसतें. असे लोक स्वार्थामार्गे लागले कीं अधिकारानें फुगून जाऊन मनसोक्त हैदोस घालतात. आपण म्हणजेच राज्यसंस्था असा त्यांना भ्रम होतो. या भ्रमांत दुसऱ्याच्या बुद्धीचा ते खून करतात. शास्त्र आणि कला यांना शिस्तीच्या गाड्याच्या चक्रास बांधून फरफटत ओढीत नेऊन अखेर देशाचा घात करतात.

मनुष्य सज्ञान होतांच घरचा कारभार पाहण्यास लायक आणि प्रपंचांतील नफा-नुकसानीस जबाबदार होतो. तसेंच मतदार निरक्षर, मूर्ख व व्यसनी असला तरी देशाच्या राजकारणांत मत देण्यास नालायक कां ठरावा हें समजत नाहीं. लोक-शाहींत प्रत्येक गोष्टीची शहानिशा झाल्यावर लोकांकडून निवाडा घेतला जातो. यापेक्षां अधिक चांगली योजना दुसरी कोणती असणार ?

राज्यकारभारांत भाग घेण्याची सुसंधि मिळाली तर मनुष्याची सर्वांगीण सुधारणा होते. महत्त्वाच्या प्रसंगीं निर्णायक निवाडे देण्याच्या संधीमुळें मनुष्याच्या ज्ञानाचा दर्जा व **नैतिक दायित्व** वाढतें. लोकमत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कायदे करणारें, घडविणारें, दुरुस्त करणारें व मोडणारें असें प्रभावी अस्त्र मनुष्याच्या नित्य हातीं राहतें. यामुळें राज्यकारभारांत आपुलकी, कायद्यास मान व सुव्यवस्थे-साठीं सहकार्य या महत्त्वपूर्ण गुणांमुळें राज्यशकटास बळकटी येते. लोकशाहीच्या कारभारात थोडीशी ढिलाई दिसली तरी त्याची भरपाई या गुणांच्या वृद्धीमुळें होते.

# कोळ्याचें जाळें

धंदेवाईक मुत्सद्दी आणि भांडवलवाले हे दोन ग्रह कोणत्याहि राजवटीच्या राशीला हटकून लागतात. लोकशाहींत निदान या धंदेवाईकांना एक दिवस तरी कां होईना लोकांपुढें आपल्या कृत्यांचा झाडा द्यावा लागतो व अपराधाबद्दल जाहीर प्रायश्चित्त घ्यावें लागतें. लोकमताच्या शिडीनें तो कीर्तीरूपी हरभऱ्याच्या झाडावर चढतो, उन्मत्त होतो व एक दिवस कोसळतो. अनेक दिवस तो लोकमताला झुलवील पण सदासर्वकाळ तसें झुलविणें शक्य होणार नाहीं. लोकांच्या डोळ्यांत धूळ फेंकून अगर लोकमताला बगल देऊन तो आपला कार्यभाग साधील पण धडधडीत लोकमताविरुद्ध एकादी गोष्ट करण्यास तो धजणार नाहीं. लोकमताच्या जबरदस्त ओघापुढें त्याला मान वांकविणें भाग असतें आणि हा लोकमताचा परिणामकारक दाब त्याला नित्य शुद्धीवर ठेवतो. पण यापेक्षां भांडवलवाल्यांचें जाळें फार बारीक व त्याचे धागेहि कोळ्याच्या धाग्याप्रमाणें अदृश्य व चोहोंकडे पसरलेले. या जाळ्याचें कार्य अत्यंत शांत, गुपचूप पण अति भयंकर असतें. त्या धाग्यानीं वाटेल त्या व्यक्तीस गुरफटून आपल्या जाळ्यांत ओढतां येतें. लोकशाहींत भांडवलवाल्यांचें जाळें नेहमीं सावजें पकडण्याचा उद्योग करीत राहिल्यामुळें त्याचा नाश केल्याशिवाय लोकशाही निर्वेध होणार नाहीं अशी निर्वाणीची भाषा लोक बोलूं लागले आहेत.

लोकशाहींत आपल्या हक्कांची पुरी कल्पना व राजकारभाराचें ज्ञान नसल्यामुळें मतदारांमध्यें अनास्था उत्पन्न होते. पण ती शिक्षणानें कमी करतां येते हें विसरून भागणार नाहीं. अनुभवानें ठेंचा खाऊन शहाणपण शिकावें असें त्यास वाटत असतें. अनुभव हाच मतदाराचा खरा गुरू. प्रत्येक मनुष्यास सार्वजनिक कार्यांची आवड, हौस व उत्सुकता असते. यामुळें सर्वसाधारण माणसाचा निर्णय सहसा एकांगी असूं शकत नाहीं. तो आपापल्या बुद्धीप्रमाणें विचार करतो व मत देतो. समाजामध्यें राहणारा तो एक प्राणी असल्यानें प्रत्येक गोष्टीचा बरावाईट अनुभव त्यानें चाखलला, ऐकलेला व सोसलेला असतो. नवीन युगांतील आधुनिक ज्ञानप्रसाराच्या साधनांनीं त्याच्या ज्ञानांत प्रत्यहीं भर पडत राहते. त्याद्वारें शाहण्यासुर्त्या लोकांचीं मतें, भाषणें व वादविवाद त्यांना ऐकावयास मिळतात. लोकशाहीच्या जागृतीची ज्योत त्याच्या अंतःकरणांत कायम तेवत ठेवण्यास हीं साधनें चांगलीं उपयुक्त ठरतात. पेरी नामक ग्रंथकार म्हणतो, " लोकशाही म्हणजे वेगवेगळ्या

वाद्यांच्या गजरानें व आवाजांच्या आरडाओरडीनें व्यक्तीची बुद्धि गोंधळून टाकण्याचें नव्हे तर एकलकोंडी बुद्धि दुरुस्त करण्याचें तें एक शास्त्र आहे. महत्त्वाच्या मुद्यावरील समाजांतील खळबळीनें हा हेतू तडीस जातो."*

## मतदार हा राष्ट्राचा एक घटक

लोकशाहींत सर्वांचीं मतें सारख्या मापानें मोजलीं जातात हा काय तो मोठा आक्षेप थोडासा विचार करण्यासारखा आहे. कॉलेजमधील विद्वान प्रोफेसर व खाणींतील साक्षर मजूर यांच्या मतांची किंमत एकच का असा त्यांचा रास्त सवाल आहे. याच्या उलट प्रत्येकाच्या बुद्धीप्रमाणें, शहाणपणाप्रमाणें व विद्वत्ते-प्रमाणें मतांची वांटणी करावयाची टरली तर वरील गोष्टी मोजण्याचें यंत्र अगोदर शोधून काढावें लागेल. कॉलेजमधील विद्वान प्रोफेसर झाला तरी तो आपल्या विषयांत विशेष पारंगत असेल पण देशाच्या राजकारणांतील त्याचें ज्ञान आंवळ्या-एवढें पूज्य असेल. प्रसंगविशेषीं अशा राजकीय प्रश्नांची माहिती एकाद्या मजुरास किती तरी पटीनें अधिक असण्याचा संभव नाहीं काय ? मतांची वांटणी जर विषमतेनें करावयाची तर व्यक्तीची बुद्धि आणि विद्वत्ता याच्याबरोबर त्याची संपत्ति, सामाजिक वजन, राजकीय हितसंबंध, फार काय, त्याचें शारीरिक आकारमान हें सुद्धां लक्षांत घ्यावयास नको काय ?

राज्यक्षेत्रांत जेव्हां एकादा मनुष्य एखाद्या प्रश्नावर मत देण्यास येतो त्या वेळीं स्वतःची संपत्ति, सामाजिक दर्जा, हितसंबंध इत्यादि जुनीं उपरणीं, बंडी, धोतर घेऊन येत नाहीं. तो केवळ एक राष्ट्राचा घटक या नात्यानें मतदानाच्या ठिकाणीं येतो. ( He is a naked unit. ) आणि या दृष्टीनें सर्व घटकांना सारखा मान द्यावयास नको काय ?

## गांवगुंडांपेक्षां हुकूमशहा भयानक

लोकशाहींत मतांची गल्लत होते हें म्हणणें बरोबर नाहीं. हुकूमशाहींत जितकी गर्दी व दंगल उडवून कावा साधतां येईल व वर्तमानपत्रें, भाषणें व रेडिओ

---

* Democracy is not a method of confounding intelligence with the clamour of many voices, but a method of correcting the single intelligence by the report of whatever other intelligence may be most advantageous related to the matter of issue ........Accidents of locality cancel one another—Perry.

इत्यादींच्या द्वारें लोकांना वाईट मार्गास प्रवृत्त करितां येईल तितकें तरी लोकशाहींत खास शक्य नाहीं. याकरितां लोकशाहींतील अनेक गांवगुंडांपेक्षांहि एक हुकूमशहा अधिक भयानक असें आपण म्हणतों. गांवगुंडांना छिद्रान्वेषी प्रतिस्पर्धि निर्माण होतील व त्यांना उलथून पाडण्यास दुसरा कट उघड रीतीनें लोकशाहींत उभारतां येईल; हुकूमशाहींत त्याची आशाहि करणें वेडेपणाचें ठरेल.

तात्त्विकदृष्ट्या लोकशाहीविरुद्ध आक्षेप घेणारांचा जो एक वर्ग आहे त्यांचें असें म्हणणें कीं ठराविक मुदतीनें मतदारांनीं कौल दिला कीं जे थोडे वरिष्ठ लोक निवडून येतात ते राज्याचे सूत्रधार होतात. ते करतील त्या राज्यकारभारांत संतोष मानावा लागतो. त्यांच्याशीं मतदारांचा प्रत्यक्ष संबंध असत नाहीं. थोडक्यांत इतर शाहींप्रमाणें लोकशाहींत राज्यकारभार छोटेखानी मंडळाच्या स्वाधीन होतो. यामुळें राज्यकारभार सर्व लोकांकडून चालविला जाणें ही लोकशाहीची मध्यवर्ति कल्पना नष्ट पावते. आज जगांमध्यें स्वित्झर्लंड हा एकच छोटा देश लोकानुवर्ति आहे असें म्हणतां येईल. खरी लोकशाही प्रत्यक्षांत आणण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या रशियांतसुद्धां छोट्या मंडळाच्या हातीं राज्यसूत्रें आहेत. राज्यकारभार चालविण्याच्या दृष्टीनें असें मंडळ लोकशाहींत निर्माण होणें अपरिहार्य आहे. पण हें मंडळ जात्या ऐतिहासिक विशिष्ट वर्गाची मिरासदारी मिरविणाऱ्यांचें असत नाहीं. जन्म व संपत्ति यांच्या जोरावर सिंहासनावरील वारसा हक्क ते सांगत नाहींत. स्वतःच्या आंगच्या कर्तबगारीवर ते पुढें आलेले असतात. लोकमताच्या नाडीवर बोट ठेवून त्यांना नेहमीं सावधपणें कार्य करावें लागतें. त्यांच्या स्थानाभोंवतीं नेहमीं शेवाळें माजून निसरडें झालेलें असतें. थोड्याशा धक्क्यानें ते केव्हां निसरून पडतील याचा नियम नसतो.

## साळूप्राण्याच्या अंगचे बाण

सर्वसाधारण मतदार निष्काळजी बेफिकीर असतो हें खरें. पण जागृत होण्यासारखी परिस्थिति प्राप्त होतांच अंगातील आळस झाडून तो कार्यतत्पर बनतो असा अनुभव आहे. विशेषतः आपल्या हक्कांवर गदा आली कीं त्याला आपल्या अंगच्या सत्तेची जाणीव झाल्याविना खात्रीनें राहात नाहीं. साळू प्राण्याच्या अंगावरील बाणाप्रमाणें तो आपल्या सत्तेचे बाण आंधळेपणानें सोडतो. संकटकालीं तो त्या सत्तेचा उपयोग न करील तर तो त्याचा दोष. त्याची ती अंतिमसत्ता काढून घेऊन त्याला कायमचा दुबळा करण्यापेक्षां ती सत्ता त्याच्याकडे ठेवणें

अधिक इष्ट व श्रेयस्कर नाहीं कां ? वेळप्रसंगीं उपयोग करूं म्हटलें तर त्याचा तो उपयोग तरी करूं शकेल का ? एरवीं इच्छा होऊन तरी त्याचा काय उपयोग ? साळूपक्ष्याचे बाण उपटून काढले तर तो संरक्षण कसें करणार ? सत्तेच्या अभावीं मतदारांचें तसें होईल. मतदार सुशिक्षित होऊं लागला कीं पक्षांच्या कसरतींतून स्वतःचीं मतें निश्चितपणें सांगण्याचा आग्रह तो खास धरील.

अधिकारासाठीं योग्य व लायक अशीं माणसें मतदार निवडून देत असतो. शिवाय देशांतील वकील, वैद्य, धर्मगुरू, शेतकरी, व्यापारी, धंदेवाले, कारखानदार, मजूर, कलावंत इत्यादि आपापली संघटना करून आपापले हितसंबंध शाबूत राखतात. अशा संस्थांच्या म्हणण्याकडे सरकारला दुर्लक्ष करून भागत नाहीं. व्यक्तीची अनास्था अशा रीतीनें वरील संस्थांच्या आस्थेनें अंशतः भरून निघते. राज्यसंस्थेच्या दैनंदिन कारभारांत या संस्था आपलें मत प्रभावी करून सार्वजनिक हक्कांचें संरक्षण करण्यास मदत करतात.

## पिंजऱ्यांतील साक्षीदार.

लोकमत आपलें असें नवीन मत तयार करून देऊं शकत नाहीं; त्याच्या मताकरता आलेल्या प्रश्नावर होकारार्थी अगर नकारार्थी एवढेंच उत्तर पिंजऱ्यांतील साक्षीदारांप्रमाणें त्यानां देता येतें असा एक मतदानपद्धतींतील दोष आहे. लोकमताला नवीन सूचना करण्याचा हक्क देऊन हा दोष नाहींसा करतां येईल व कांहीं ठिकाणीं ही पद्धत अंमलांत आलेली आहे.

मतदार आपापल्या सदसद्विवेक बुद्धीप्रमाणें निर्णय देतात, योग्य पुढारी शोधून काढतात, इच्छा असेल तर त्याच्यावर चांगली देखरेखहि ठेवूं शकतात. मतदानाच्या निमित्तानें ज्या प्रमाणांत त्यांच्या शिक्षणांत, ज्ञानांत वाढ होते त्या प्रमाणांत ते वाढती जबाबदारी स्वखुषीनें आपल्या शिरावर घेऊं इच्छितात. म्हणून लोकशाही मनुष्यस्वभावास सुसंगत व पोषक अशीच आहे. तिच्यायोगें वैयक्तिक बुद्धिमत्ता व प्रतिभा याचा खून पडतो व सर्वांना निकृष्ठावस्था प्राप्त होते हें म्हणणें कितीहि अट्टाहासानें प्रतिपादन केलें तरी तें मनास पटत नाहीं, हें निःसंशय.

## प्रछन्न हुकूमशाही

कोणत्याहि देशाची राज्यघटना ही त्या देशांतील जनता व सरकार याच्या दरम्यान झालेल्या करारनाम्याप्रमाणें असते. त्यामध्यें राजधर्म व प्रजाधर्म विस्ता-

रानें सांगितलेला असतो. व्यक्तीला राजकीयदृष्ट्या गुलाम बनवावयाचें नाहीं म्हणून तिचे मूलभूत हक्क दुर्लंघ्य मानलेले आहेत व तिनें आपण होऊन कांहीं मर्यादित अधिकार व सत्ता हीं सरकारकडे सोपविलेलीं आहेत. राज्यघटना हा कांहीं एकादा अति कडक सोंवळा देव्हारा नव्हे कीं ज्यामध्यें थोडीशी सुद्धां शिवाशीव वा विटाळ चालत नाहीं. किंबहुना जसजसा समाज सुसंस्कृत होऊन प्रगति करील व त्या कालास व समाजास अनुरूप असे राजधर्म व प्रजाधर्म यांच्यामध्यें फेरफार करणें भाग पडेल तसतशी ती घटना बदलणें जरूरीचें असतें व ती बदलणें शक्यही असतें असा आजवरचा अनुभव आहे. कांहीं अनिवार्य अडचणींच्या प्रसंगीं लोकशाहीची राज्यव्यवस्था अगतिक व निष्काम बनते व राष्ट्रावरील संकटाच्या वेळीं ती अपुरी पडते व कुचकामाची ठरते; अशावेळीं ती राज्यघटना गुंडाळून ठेऊन सरकारनें सर्वसत्ताधिकारीपणाचा पेहराव चढविणें भाग असतें अशा विचारांचा लोंढा आज जगामध्यें वाहात आहे. त्या लोंढ्याच्या प्रचंड ओघाबरोबर प्रचंड झाडें मुळासकट उपटून पडावींत त्याप्रमाणें लोकशाहीप्रधान लहानमोठीं राष्ट्रें वहात चाललीं आहेत तर कांहीं बुडालींसुद्धां. या विचारप्रणालीचें विवेचन प्रस्तुत प्रकरणांत करावयाचें आहे.

## राज्यघटना हा एक कागदाचा चिटोरा !

१९३४ सालीं अमेरिकन सीनेटर बोऱ्हा यांनीं अमेरिकेंतील प्रेसिडेंट रूझवेल्टच्या राजवटीस उद्देशून काढलेले उद्गार मननीय आहेत. ते म्हणाले कीं, “ ठरलेली राज्यघटना कसल्याहि अडचणीची सबब सांगून अध्यक्षानें उल्लंघितां कामा नये. अशा सबबीवर ती उल्लंघिण्याची पाऊलवाट एकदां पडली कीं तिचा राजरस्ता होण्यास फार दिवस लागत नाहींत. शिवाय मुळांत ज्या वेळेस देशास कसलीच घटना नव्हती त्या वेळेस नवीन घटना तयार करतांना जी दुर्धर अडचण होती तितकी तरी मनुष्यावर पुन्हां खास ओढवणार नाहीं. ज्या दुर्धर प्रसंगांतून आमच्या पूर्वजांनीं सुकर मार्ग काढला ती घटना बाजूस ठेवण्याचा आम्हांस मुळीं अधिकारच नाहीं. अपरिहार्य प्रसंग काय नेहमींच यावयाचे ! म्हणून काय त्यासाठीं घटना गुंडाळून ठेवावयाची ? कसल्याहि संकटाला पुरून उरेल अशी तरतूद प्रत्येक घटनेंत आगाऊ केलेली असते. असें असतां प्रे. रूझवेल्टनीं घटनेबाहेर अधिकार वापरून अमेरिकेंत अनर्थ मांडला.”

लोकशाहींत राज्यघटना सनदशीर मार्गानें बदलण्याचा मार्ग नेहमीं उघडा व

स्वतंत्र ठेवलेला असतो. तो थोडासा सावकाश, धिमा व कंटाळवाणा वाटला तरी तो खात्रीचा, सुरक्षित व निष्कंटक असतो. इतकी तरतूद केल्यावर लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वांना हरताळ फांसून राज्यघटनेला कागदाच्या चिटोऱ्याप्रमाणें उडविण्याचा व लोकांच्या सर्वश्रेष्ठ हक्कांना रजा देण्याची जरूरी खरोखर पाहिली तर मुळींच भासूं नये. कालास अनुरूप असे इष्ट ते फेरफार लोकशाहीप्रधान राज्य घटनेंत आजवर झाले नाहींत काय ? असाधारण प्रसंगीं राज्यघटनेनें देतां येतील तेवढया सर्व सत्तेचें केंद्रीकरण लोकशाहींत होऊं शकतें. उदाहरणार्थ एका १९१४ च्या लढाईंत मुख्य मंत्री लॉइड जॉर्ज किंवा प्रे. विल्सन याना काय कमी अधिकार किंवा सत्ता होती ? पण ती असाधारण परिस्थिति संपताच त्यांनीं आपली सर्वाधिकाऱ्याचीं वस्त्रें निमूटपणें खालीं ठेविलीं व पुनः लोकसत्तेचा कारभार सुरू झाला. कांहींकाहीं ठिकाणीं राज्यघटना बदलण्याचें तंत्र मोठें अवजड, त्रासाचें व जिकीरीचें असतें. अशा ठिकाणींसुद्धां परिस्थितीस टक्कर देण्यांसाठीं राजकर्त्यांना अधिक सत्तेची कवचकुंडलें चढवितां येतात. तसें नसतें तर अमेरिकेसारख्या ताठर राज्यघटनेंत प्रे. रूझवेल्टना झोटिंगशाहीचा मासला अमेरिकन जनतेस दाखवितां आला नसता !

## कॉमन्स सभेचें प्रस्थ

लोकसत्ताक राज्यांत दुर्धर प्रसंगांना तोंड देण्याची मोटी नामी सोय असते. कारण त्यामध्यें कायदेमंडळास सर्वसाधारणपणें अमर्यादित सत्ता असते. राष्ट्रातील सार्वभौम, सर्वंकश व सर्वश्रेष्ठ अधिकाराचें तें उगमस्थान गणलें जातें. कायदेमंडळ जर केवळ मूर्खांची सभा नसेल तर वेळप्रसंग ओळखून राज्यकर्त्यांच्या हातावर अधिक सत्तेचें उदक तें चटकन् सोडूं शकतें. इंग्लंडांतील पार्लमेंट सार्वभौम सरकार आहे. त्याची सत्ता अनिर्बंध आहे. पुरुषाची स्त्री व स्त्रीचा पुरुष करण्याव्यतिरिक्त जगांतील वाटेल ती गोष्ट पार्लमेंट करूं शकते असें इंग्लिश लोक नेहमी अभिमानानें बोलतात. त्यांचा अभिमान रास्तहि पण आहे. त्यांतल्या त्यांत ' कॉमन्स ' सभेचें प्रस्थ किती मोठें आहे हें फक्त एका गोष्टीवरून दिसेल. आपल्या मांडीस मांडी लावून बसणाऱ्या व समान अधिकार गाजविणाऱ्या पुरातन अशा लॉर्डांच्या सभेलासुद्धा कॉमन्स सभा मनांत आणील तर डिच्चू देऊं शकेल. इंग्लंडच्या राजकारणांत राज्यघटना गुंडाळून ठेवण्यासारखा प्रचंड गोंधळ अद्यापपावेतो झालेला नाहीं. तरी पण हुकूमशाही पद्धतीची राजवट इंग्लंडात हवी अशी

परिस्थिति प्राप्त झाली तर हे हुकूमशाहांचे उपटसुंभ वाटेल त्या घटकेस तेथें उगवूं शकतील इतकी त्यांची राज्यघटना लवचिक आहे. १९३१ च्या आर्थिक हलाखीच्या कालांत राष्ट्रीयपक्ष या नामाभिधानाखालीं पुराणमतवादीपक्षानें थोडा काल अधिक सत्तेचें ग्रहण करून हुकूमशाही गाजविली. चालू महायुद्धांत चर्चिलसाहेबांच्या प्रधानमंडळानें काय कमी सत्ता धारण केली आहे ? इंग्लंडांतील कोणाचीहि मालमत्ता राष्ट्रीयसरक्षणाच्या नांवाखालीं विनामोबदला जप्त करण्यांत येईल हा तेथें सध्यां जारी असलेला वटहुकूम काय दर्शवितो ? " खुद्द रशियांत स्टॅलिनला तेथील खासगी मालमत्ता नष्ट करण्याचें कार्य वीस वर्षांच्या अवधींत पुरें करतां आलें नाहीं तें इंग्लंडांत अवघ्या दीड दिवसांत होऊं शकलें." हे बर्नार्ड शॉ याचे उद्गार अत्यंत अर्थपूर्ण नाहींत कां ? फ्रान्सच्या पडत्या कालांत फ्रान्स व इंग्लंड यांचें एक राष्ट्र बनविण्याची क्रांतिकारक कल्पना या अधिकाराच्या जोरावर चर्चिलसाहेबांना चुटकीसरशीं मांडतां आली. फ्रान्सनें तिला मान्यता दिली नाहीं ही गोष्ट वेगळी.

इंग्लंडांतील सर्वाधिकारित्व इतर देशांपेक्षां थोडें भिन्न आहे. इतरत्र एकच व्यक्ति हुकूमशहा असते तर इंग्लंडांत एक पक्ष असेल. फॅसिस्ट व कम्युनिस्ट दृष्टिकोन अनेक वर्षांच्या प्रचारानें इंग्लंडांत यशस्वी होऊं शकले नाहींत याचें रहस्य वरील कारणांत आहे. " इंग्लंडांतील पार्लमेंटरी पद्धत कुचकामाची व जीर्ण झाली आहे तिचा जीर्णोद्धार केला तर तो प्रगमनशील होईल. म्हणून एक पक्ष व एक अध्यक्ष यांना सर्वाधिकार दिले जावेत व त्यायोगें होणारी हुकूमशाही इतरांपेक्षां खास वेगळ्या नमुन्याची होईल, " असे फॅसिस्ट पंथाचे पुढारी ऑस्वाल्ड मोस्ले आज अनेक वर्षें प्रतिपादन करीत आले आहेत. त्यांचें कर्तृत्व, हेतू व आकांक्षा यांबद्दल इंग्लिश लोक साशंक असल्यामुळें मोस्लेंचें फॅसिस्ट तत्त्वज्ञान इंग्लिश लोकांना मानवलें नाहीं. तीच कथा दुसरे कम्युनिस्ट पुढारी मि. मॅक्स्टन यांची. इतर झोटिंगशहाप्रमाणें वरील दोघांना देशांतील उडाणटप्पू लोकांचें दल बनवून देशांतील सभा उधळण्याची गुंडगिरी करण्याव्यतिरिक्त अधिक कार्य करितां आलें नाहीं. चालू युद्धांत दोघांचें वैयक्तिक व पक्षांचें स्थान तुरुंगांत असणें अपरिहार्य आहे. लोकशाहीचीं उदात्त तत्त्वें अनेक शतकें अंगीं भिनलेल्या इंग्लिश लोकांना कधीं काळीं वरील दोघांचें तत्त्वज्ञान पटेल असें वाटत नाहीं.

# फ्रान्समध्यें आंवळ्यांची मोट

१९१४ च्या महायुद्धानंतर फ्रान्सच्या राजकारणांत पक्षोपपक्षांची बेसुमार वाढ झाली आणि या गर्दीमुळें फ्रान्समध्यें कोणताही एकच पक्ष एक वेळेस राज्य करूं शकेना. दोन तीन पक्षांची आंवळ्यांची मोट बांधावी लागे व आवळ्यांचा मोटेप्रमाणें ती वरचेवर सुटे. एका प्रधानमंडळाच्या उतरंड्या चढविल्या जात असतांना त्याच वेळेस त्या खालून कोसळायला सुरवात होत. गेल्या वीस वर्षांच्या अवधींत फ्रान्समधील कोणत्याही दीर्घायुषी प्रधानमंडळांचें आयुष्य जास्तींत जास्त सहा महिने आणि अल्पायुष्य कमींत कमी कांहीं तास असें प्रमाण आढळेल. एक विनोदी लेखक म्हणतो, " अमेरिकेंत लग्न व फारकत या गोष्टी जितक्या झटपट उरकल्या जातात त्याहीपेक्षां अधिक त्वरेनें फ्रान्समध्यें प्रधान-मंडळाच्या उलथापालथी होतात, " हें अक्षरशः खरें आहे. या कारणामुळें त्यांच्या राजकारणांत नेहमीं धांदल, घाई, अस्वस्थता व असंतोष आढळतील. या अस्थिरतेमुळेंच फ्रान्सच्या राजकारणाचा खेळखंडोबा झाला. त्यांत वरील पक्षांची उभारणी कोणत्या तरी विशिष्ट तत्त्वावर होण्याऐवजीं व्हर्सायच्या तहापासून जर्मनीचें जास्तींत जास्त रक्तशोषण कसें करता येईल, त्यास अधिक लुबाडतां कसें येईल, जर्मनी कायमचा जमीनदोस्त कसा होईल या मतभेदावर या पक्षाची उभारणी झालेली आढळेल.

यामुळें गेलीं वीस वर्षे जर्मनी अधिक जागरूक राहिला, सूडवृत्ती बळावली आणि महत्त्वाकांक्षेच्या पोटीं राष्ट्रोन्नति जन्मली. याच्या उलट फ्रान्स मॅजिनो तटबंदीच्या आंत सुरक्षित म्हणून बेफिकीर राहिला. लोक चैनी व हव्यासी बनले व महत्त्वाकांक्षेचा पुरा लोप झाला. पक्षोपपक्षांच्या गर्दीनें राजकारणाचा जो विचका उडाला, त्याचा लोकांना कंटाळा आला व त्यांत जर्मनीकडून प्रचंड पराभवाची थप्पड खातांत फ्रेंच लोकांचे डोळे खाडकन् उघडले. अगोदरपासून फ्रान्सचा अंतःस्थ कल हुकूमशाहीकडे धांव घेत होता त्यांत या पराभवाच्या कलंकानें भर घातली. जगांतील लोकशाहीच्या तीन प्रचंड खांबापैकीं पहिला मोहरा लोकशाही-वाल्यांनीं गमावला, व लोकशाहीवरील संकट अधिक गंभीर व भयानक झालें. आतां फ्रान्सच्या राजकारणांत मार्शल पेताँ यांची हुकूमशाही प्रत्यक्ष वावरतांना दिसली तर त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहींच नाहीं.

## अमेरिकेंत भांडवलशाहीची सद्दी

अमेरिका हें भांडवलशाहीचें आगर आहे. येथें डेमोक्रॅट व रिपब्लिकन अशा दोन पक्षांत अधिकारासाठीं नेहमीं रस्सीखेंच चालते. दोन्ही पक्षांना विविक्षित तत्त्वांची पार्श्वभूमी अशी नाहीं. या देशांत भांडवलशाहीची सद्दी अद्याप जोरांत आहे. स्वकष्टार्जित मिळकतीचें संरक्षण उत्तम रीतीनें होते. देशांतील खाणी, कारखाने, रेल्वे, बँका इत्यादि मोठाल्या फायद्याच्या गोष्टी धनिक वर्गाची खासगी मालमत्ता म्हणून आहेत. खासगी फायद्याकडे व्यक्तींनीं दृष्टि ठेवणें यांतच खरें राष्ट्रहित आहे असें येथें अजून समजलें जातें. औद्योगिक क्षेत्रांतील पुढारी हेच राजकीय पुढारी मानले जातात. धनिकवर्गाची प्रच्छन्न हुकूमशाही अमेरिके-इतकी अन्यत्र स्पष्टपणें दिसत नाहीं. अशी प्रच्छन्न हुकूमशाहीसुद्धां कांहींकांहीं कांहीं वेळा नग्न स्वरूप धारण करूं शकते. अमेरिकेंत अमर्यादित अधिकार व सत्तेमुळें प्रेसिडेंटला झोटिंगशाहीच्या नाटकांतील मुख्य नट बनतां येतें. याबद्दलचें आगामी भाष्य डी. टॉकेव्हेली नामक विद्वान् लेखकानें लिहून ठेवलेलें आढळतें. तो म्हणतो, " अमेरिकन शासनसंस्थेतून जुलमी एकतंत्री राजवटीची पाऊलवाट नक्की काढतां येईल. लोकसत्ताक म्हणविणारीं राष्ट्रें उद्यांच्या कालीं अशी कांहीं अरेरावी करतील कीं त्यापुढें पूर्वींच्या राजेशाह्या निश्चित फिक्या पडतील. पण त्या अरेरावीची तऱ्हा मात्र निराळी राहील. लोकांची इच्छाशक्ति अत्यंत लवचिक व लेचीपेची अशी ते करतील. निषेधपर आज्ञांच्या बारीक जाळ्यानें लोक भ्रांतिष्ट बनतील आणि अशा किंकर्तव्यमूढ जनतेंत एकादा झोटिंग हटकून निर्माण होईल. "

## राज्यघटनेचे मारेकरी

१९३१ सालीं आर्थिक हलाखीच्या झंझावातानें अखिल जग जर्जर झालें. मी मी म्हणणाऱ्या संपत्तिमान देशांना विपन्नावस्था प्राप्त झाली. भांडवलशाही नष्ट होण्याचीं दुश्चिन्हें दिसूं लागलीं. सत्तेचा अभिलाष धरणाऱ्यांना उत्तम मोका आला. १९३१ ची हलाखी स्वार्थसाधू मुत्सद्यांना इष्टापत्ति वाटली व तिचा उप-योग त्यांनीं मनमुराद करून घेतला. साधारणपणें लोकशाहीप्रधान राज्यसंस्था कांहीं विशिष्ट तत्त्वें, रूढी व सांप्रदाय यांच्या अनुरोधानें चालतात. राज्यघटना जतन करीत असतांना त्यामध्यें बेकायदेशीर व बेसनदशीर गोष्टी उघडपणें येऊं न देण्याबद्दल ते दक्ष असतात. अशा बेसनदशीर गोष्टींना चोरट्या वाटेनें गुप्त-

पणें राज्ययंत्रांत प्रवेश करून घ्यावा लागतो. अमेरिकन राज्यघटनेंत प्रे. रूझवेल्टनें ' New deal ' च्या अन्वयें असा प्रयत्न केला म्हणून त्याच्यावर आरोप आहे. रात्रींच्या भयाण अंधःकारात राज्यघटनेला मारेकरी घालण्यासाठीं त्यांनीं घुतावळ उठविली असा विरोधकाचा त्यांच्यावर ठपका आहे. त्याकडे थोडक्यांत लक्ष देऊं.

इतर कोणत्याहि राज्यघटनेपेक्षां अमेरिकन राज्यघटनेंत सत्ताविभागणीचें तत्त्व अधिक कडक व कसोशीनें पाळलें जातें. त्यांतल्या त्यांत तेथील न्यायखात्यास कायदेमंडळावर देखरेख ठेवण्याचा जो राखीव हक्क दिलेला आहे त्यामुळें राज्यकारभारावर चांगला वचक राहतो. प्रे. रूझवेल्टच्या कारकीर्दींत राज्यघटनेंत झोटिंगशाहीचे जंतू टोंचण्यासाठीं अनेक इंजेक्शनें दिलीं गेलीं. न्यायखात्याची स्वतंत्र तरतूद ह्या ठिकाणीं नसती तर कदाचित् झोटिंगशाहीचा नगानाच केव्हांच सुरूं झाला असता. प्रे. रूझवेल्टच्या प्रथम कारकीर्दींत फेडरल कायदेमंडळानें प्रसार केलेले व अध्यक्षानीं आपल्या पसंतीचा शिक्कामोर्तब ठोकलेले दहा कायदे न्याय-रद्द ठरविले. त्यांत पहिला मान N.I.R.A. कायदा ( National Industrial Recovery Act ) यांस दिला पाहिजे. हजारों पानांचा भरगच्च, सर्वव्यापी व सर्वगामी कायदा याच्याइतपत अमेरिकेंत दुसरा सांपडणार नाहीं. आत्तापर्यंतचा सर्व फेडरल कायदा एकत्र केला तरी तो या कायद्याएवढा विस्तृत होणार नाहीं. कोणतेंही गांव त्याच्या कक्षेंतून सुटूं शकलें नाहीं. या कायद्यावर प्रथम सुप्रीम कोर्टानें बोळा फिरविला. या प्रचंड कायद्याचें दुसरें एक पिल्लू A. A. A. त्यासही फांसावर लटकावलें. याबाबतींत तीन चार न्यायखात्याचे निकाल प्रसिद्ध आहेत. Humphrey Case मध्यें फेडरल सरकारच्या तैनातींतील नोकराना काढण्याचा अधिकार अध्यक्षांना नाहीं असें ठरलें. Frazier Lemke Act मध्यें राष्ट्राच्या गरजा कितीहि निकडीच्या व अत्यावश्यक असल्या, तरी त्यासाठीं एकाद्याची खासगी मालमत्ता योग्य व न्याय्य मोबदला आणि नुकसानभरपाई दिल्याशिवाय काढून घेण्याचा हक्क सरकारला नाहीं असें सुप्रीम कोर्टानें जाहीर केलें. यामुळें भांडवलशाहीला कितीतरी आधार वाटूं लागला. The Gold Clause Case मध्यें चलनाची वाढ आणि किंमत ठरविण्याची पूर्ण मुभा सरकारला आहे पण दुसऱ्याचें न्याय्य देणें चुकविण्यासाठीं त्याचा दुरुपयोग सरकारला करतां येणार नाहीं अशी दमदाटी त्यानीं सरकारला दिली. Panama

Refining Company Case मध्यें फेडरल कायदेमंडळाच्या सत्तेवर अतिक्रमण करून नवीन कायदे करण्याचा अधिकार कॉंग्रेसला अध्यक्षास देतांच येत नाहीं असें सुनावलें. Railway Retirement Act ( R. R. A. ) हा कायदा रेल्वेंतील नोकर लोकांना सक्तीनें सेवानिवृत्त करणारा व पेन्शनींत काढणारा होता. एका वर्गाच्या तोंडांतील घांस दुसऱ्याच्या तोंडांत घालण्यासाठीं काढून घेण्याचा हक्क फेडरल सरकारला नाहीं असें त्यानीं ठरविलें. याचप्रमाणें Goffey Cole Act आणि Public Utility Holding Act इत्यादि कायदे रद्द ठरविले.

## बागाईतावर कीड

अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. सर्वांचा उद्देश एकच कीं अमेरिकन राज्यघटनेंतील कायदा, अम्मलबजावणी व न्याय या त्रिदळाची स्वतंत्रता शाबूत राखून न्यायखात्यानें जुलमी कायद्यापासून पुरेसें संरक्षण दिलें व अरेरावी सत्तेस आळा घातला. अध्यक्षांना सत्तेचा कोरा चेक देतां कामा नये कारण त्यायोगें लोकांच्या इच्छांच्या प्रगटीकरणास मोकळीक व निर्भयता लाभत नाहीं. त्या प्रगटीकरणाचें योग्य पोषण व उत्तेजन सरकारनें न देतां तें दडपून ठेवणें निषेधार्ह आहे हाच सुप्रीम कोर्टाच्या साऱ्या निकालांचा मतितार्थ म्हणून सांगतां येईल.

अशा एकतंत्री राजवटीनें काय काय अनर्थ देशावर ओढवतात याचें सुंदर शब्दचित्र डेव्हिस नामक लेखकानें दिलें आहे. तो म्हणतो कीं ' एकतंत्री राज्यसंस्था बौद्धिकदृष्ट्या अत्यंत मागासलेली, लोकांना कमींत कमी जबाबदार व अत्यंत अरेरावीची असते. घोडचुका करण्यांत सराईत झालेल्या एकतंत्री सत्तेचा हस्तक्षेप एकदां एकाद्या देशांत अगर उद्योगांत झाला कीं तो विषारी जंतूंच्या योगानें त्यातील जीवनरस पुरा शोषून घेतो. किडीनें बागाईताचा जसा फडशा उडतो तशी शासनसंस्था मृतवत् होते. सरकारीसत्तेचे संघटित मक्तेदार व्यक्ति व समाज या दोघांच्या नाशास कारणीभूत होतात. मनुष्य केवळ अन्नावर जगत नाहीं त्याच्या खऱ्या जीवनास स्वतंत्रतेची मोकळी हवा लागते. " स्वतंत्रतेच्या गळचेपीनें, New Deal नें ती हवा दूषित केली म्हणून मि. डेव्हिसनें असा मर्मभेदक प्रश्न टाकला कीं " निवडून दिलेल्या जुलमी सरकाराची प्रतिष्ठापना करण्यासाठीं अमेरिकन पूर्वजांनीं रक्त सांडलें काय ? " +

+ ' An Elective Despotism was the Government we fought for '—Davis.

# राष्ट्रनौकेचें शीड, सुकाणूं व होकायंत्र

अखिल जगांत अमेरिका, इंग्लंड व फ्रान्स हे तीन मोठाले लोकशाहीचे आधारस्तंभ म्हणून आज मिरवत आहेत. त्यांपैकीं आतां फ्रान्स हा गळलाच. हे आधारस्तंभ भांडवलशाहीनें आंतून कसे पोखरले आहेत हें आपण पाहिलें. आर्थिक साम्राज्यशाहीच्या पाशांतून मुक्त झाल्याशिवाय लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांच्या स्वार्थी लालसेचा लोप होणार नाहीं. समाजांतील भांडवलशाहीचे अगर धनिकशाहीचें वर्चस्व पुष्कळशा प्रमाणांत कमी झाल्याविना आर्थिक साम्राज्यशाही निव्वळ बोलघेवडेपणानें नष्ट पावणें शक्य नाहीं. पण तोंवर प्रातिनिधिक राज्यसंस्थांनीं लोकशाहीचे जे विशिष्ट संस्कार व सांप्रदाय अनेक शतकांच्या तपःश्चर्येनें अंगिकारलेले आहेत ते कदापिहि सोडतां कामा नयेत. कारण लोकशाहीचे संस्कार व सांप्रदाय हे राष्ट्रनौकेस जुनें सुकाणूं, सद्यःकालीन शीड आणि भविष्यकालीन होकायंत्र याप्रमाणें आहेत. तुफान वादळांमुळें नौका खूप गडबडली व कोलमडूं लागली तर खरा जाणता खलाशी नौकेंतील सर्व माल समुद्रांत फेंकून देईल, पण कोणत्याहि प्रसंगीं नकाशा, शीड, होकायंत्र व सुकाणूं यांचा त्याग करणार नाहीं. तसेंच राजकीय व आर्थिक स्थैर्यासाठीं बाकी वाटेल ते राजकीय व आर्थिक फेरफार जरूर असतील ते अवश्यमेव करावेत पण लोकशाहीचा सांप्रदाय मात्र सोडून भागणार नाहीं तो एकदां सोडला कीं एक दिवस अगतिक झाल्यामुळें प्रचंड खडकावर आपटून त्या राष्ट्रनौकेचे शतशः तुकडे उडणार हें निश्चित समजावें.

[ ६ ]

# युरोपांतील पहिला हुकूमशहा

## वाळवंटांतील पाणोठा

हुकूमशाही ही एक नवीन व पूर्वी कधींही प्रयोग न केलेली राज्यघटना आहे असें मुळींच म्हणतां येत नाहीं. तुफान दर्यांतील दीपगृह हें जसें काळ्याकभिन्न अंधःकारांतील एकमेव आशेचा किरण, त्याप्रमाणें हल्लींच्या बजबजपुरींत हुकूम· शहांचें स्थान नाहीं. किंवा प्रातिनिधिक राजवटींतील बेबंदशाहीनें उजाड व उदास केलेल्या सहारा वाळवंटांतील पाणोठ्यास नेणाऱ्या वाटेप्रमाणें हुकूमशाही मनुष्यास इष्ट ध्येयाप्रत नेणारी वाटहि नव्हे.

हुकूमशाहीची मूळ कल्पना व्यक्तिगत राज्याची आहे. मग त्या राज्यसत्तेचें मूळ आनुवंशिकतेंत सांपडो वा लोकांच्या इच्छाशक्तींत असो. बहुधा वरील दोहोंची भेसळ झालेली आढळते. आनुवंशिक हुकूमशाही म्हणजे जवळ जवळ राजशाहीचा मामला. दुसऱ्या प्रकारच्या हुकूमशाहींत लोकांची खुषीची सक्ती व सक्तीची खुषी यांचें संमिश्रण झालेलें असतें. लोकसत्तेची कल्पना जसजशी स्पष्ट व निःसंदिग्ध होत गेली तसतशी राष्ट्रविषयक कल्पना वाढत गेली. आपण आणि आपला देश कोणत्याहि अंतर्गत वा बहिर्गत बंधनापासून मुक्त आहे, आपल्यावर आपल्या देशाशिवाय दुसऱ्या कोणाची सत्ता नाहीं आणि आपल्या देशाची अंतिम सत्ता

अबाधित आहे. ही जी सार्वभौमत्वाची कल्पना एकोणिसाव्या शतकांत पुढें आली, तिच्यावर हल्लींच्या राजाविरहित हुकूमशहांचें अधिष्ठान आहे.

## सार्वभौमत्वाचा जनक

आधुनिक सार्वभौमत्वाचा जनक म्हणून इ. स. १५७५ तील जीन बॉडीन याच्याकडे बोट दाखवितां येईल. राष्ट्र ही निरंतर व निरंकुश संस्था असून राष्ट्रपति उर्फ राजा हाहि निरंकुश व अनियंत्रित आहे. प्रजेनें राजाकरतां प्रत्यक्ष प्राणाचें बलिदान केलें पाहिजे. राजाच्या इभ्रतीस धक्का बसेल असें कोणतेंहि कृत्य करतां कामा नये. लोकांच्या अंतिम कल्याणासाठीं लोकांच्या इच्छेविरुद्ध कायदा लादण्याचा हक्क राजाला आहे इत्यादि इत्यादि कल्पना प्रथम जीन बॉडीननें पुढें मांडल्या. या कल्पनांचा उदय होण्यापूर्वी समाजांत धर्मगुरूंचें प्रस्थ फार मोठें होतें. पण या नवीन गोष्टीमुळें राजाच्या प्रभावापुढें धर्मगुरू फिके पडण्याचा काळ आला. धर्मसत्तेतील दैवी अंश संपुष्टांत आला. परमेश्वर व देश यांमधील धर्मसंस्थेचा दुवा तुटण्याच्या बेतांत आला. परमेश्वराच्या इच्छेचें साक्षात् प्रतीक म्हणजे देश आणि त्या देशाचा राजा हें त्या प्रतीकाचें चालतेंबोलतें प्रतिबिंब अशा कल्पना स्थिर होऊं लागल्या. व्यक्तिगत राजसत्ता अनियंत्रित असून भागणार नाहीं, ती अविभाज्यही असली पाहिजे आणि प्रजेच्या शाश्वत हितासाठीं व सुरक्षिततेसाठीं असा सर्वाधिकार शक्य तर आनुवंशिक राजा असलेला अधिक चांगला व उपयुक्त असें बॉडिननें प्रतिपादिलें.

या राजानामक प्राण्याच्या नवीन व्याख्येविरुद्ध प्रथम नेदर्लेंडसनें बंड पुकारलें, राजसत्तेच्या ठिकाणीं लोकसत्ता आली पाहिजे असा आग्रह धरला व तो तडीस नेला. राजा व प्रजा यांच्या दरम्यान सत्तेच्या अदलाबदलीचा जो संधिकाल आला त्याला अनुरूप असें राजकीय तत्त्वज्ञान शोधण्याकडे राजकारणपटूंनीं आपली बुद्धि खर्चली. अशा सुपीक मेंदूतून राजा व प्रजा याच्या दरम्यान सत्तेच्या देवघेवीच्या करारमदारांची ( Contract theories ) उत्पत्ति झालेली आहे. अशा करारांचे उत्पादक लॉक्, हॉब्ज आणि रूसो या त्रिमूर्ती प्रसिद्ध आहेत. यापैकीं प्रत्येकानें कराराची आपआपली उपपत्ति विस्तारानें मांडली. पण या उपपत्तींच्या जंजाळात न शिरणेंच बरें असेंच शेवटीं कोणत्याहि अभ्यासकाला वाटेल. याचें कारण त्या करारांच्या कल्पनांना ऐतिहासिक वा सत्याची अशी कोणतीहि पार्श्वभूमी नाहीं. एवढें खास कीं या करारांच्या उत्पत्तीमुळें राजांचा

राजेपणा संपुष्टांत आला. यापूर्वी राजेलोक आपल्या आनुवंशिक दैवीपणाचा डांगोरा पिटीत. या नवीन कराराच्या आधारावर ते लोकांकडून सत्ता मिळवितात आणि गाजवितात अशी समजूत दृढमूल झाल्यामुळें राजाच्या दैवीपणाचें ढोलकें फुटलें. वरील करार नैसर्गिक, निर्भीड व स्पष्ट असल्यानें त्यांनां गुंडाळून ठेवून मनसोक्त वागणारा राजा जुलमी ठरला. अर्थात् अशा जुलमी राजाची उचलबांगडी करण्याचा अधिकार प्रजेला आपोआप मिळाला. या कराराच्या उत्पत्तीपासून मिळालेला हा एक महान् फायदा. राजाकडून लोकांकडे सत्ता येण्याच्या मार्गाची यापेक्षां दुसरी सुबोध उपपत्ति लावणें मनुष्यबुद्धीला शक्य नव्हतें.

## इंग्लंडांत क्रॉमवेल

इंग्लंडमधें पहिल्या चार्लसच्या शिरच्छेदानंतर झालेल्या क्रांतीनें आवश्यक ती परिस्थिति जरी निर्माण झाली नाहीं तरी राजाविषयींच्या जुन्या कल्पनांचा मात्र चुराडा झाला. या क्रॉमवेलकडे इंग्लंडातील पहिला हुकूमशहा म्हणून खात्रीनें बोट दाखवितां येईल. त्याच्या कारकीर्दीत इंग्लिश लोकांना प्रातिनिधिक राजवट दिसली नाहीं पण त्यानें जुन्या राजेपणाचा बागुलबोवा पुरा गाडला. क्रॉमवेलचें राज्य केवळ व्यक्तिनिष्ठ होतें, त्यानें आपल्या पाठीमागें आनुवंशिकत्वाचा परावर्तक लावलेला नव्हता, त्यानें आपली सत्ता वटहुकूमानें दृढमूल केली होती हीं सारी हुकूमशाहीचींच लक्षणें होत. ‘परमेश्वराची इच्छा व प्रजेची संमति या दोहोंवर माझी सत्ता आधारलेली आहे. दोघांच्या खडतर विरोधाशिवाय मी अंगिकारलेल्या सत्तेचा त्याग करणार नाहीं;’ हें ऑलिव्हर क्रॉमवेलचे उद्गार अत्यंत महत्त्वाचे आहेत.

## लोकमताचा भक्कम बंधारा

यानंतर अठराव्या शतकातील लोककल्याणाच्या नांवावर आधारलेल्या हुकूमशाहीचा काळ आला. एका व्यक्तीनें राज्य हांकावें ही गोष्ट निसर्गास धरून आहे. राजसत्ता विभागण्यानें ती दुबळी बनते सबब समाजांतील व्यक्तीमध्यें जो श्रेष्ठतम असेल त्याला सर्वाधिकार देणें श्रेयस्कर. असा सर्वाधिकारी राष्ट्राचा एकमेव सार्वभौम सरकार बनणें भाग आहे. ( The Sovereign authority should be unique and superior to all individuals in society ). असा सार्वभौम व सर्वश्रेष्ठ अधिकारी स्थानभ्रष्ट करण्याचा व होण्याचा एकच मार्ग त्यांनीं ठेवला. देवांतील देवपण नष्ट झाल्यावर ज्याप्रमाणें मनुष्य त्याचें विसर्जन करतो

तद्वत् राजा अन्यायी व जुलमी झाला आणि लोकांच्या डोक्यावर मिरें वाटूं लागला कीं त्याचें राजेपणच मुळीं संपतें. मग रस्त्यावरील एकादें कुत्रें हाकलल्या-प्रमाणें त्या राजाची हकालपट्टी एखाद्या शेंबड्या पोरानें करावी. या फिजिओ-क्रॅट्सच्या शिकवणीपासून लोकांच्या सत्तेला अधिकाधिक मान मिळण्याचे दिवस आले. राजेलोकांवरील दैवी अंशाचें आवरण फाडून लोकांनीं त्याच्या चिंध्या केल्या. देशांतील अंतिम व सर्वश्रेष्ठ सत्तेचे अधिकारी स्वतः लोक झाले अर्थात् या नवीन कालांत राजाला स्वतः हुकूमशहा व्हावयाचें झाल्यास लोकांची मनधरणी केल्यावाचून गत्यंतर राहिलें नाहीं.

पण या आपल्या अनियंत्रित सार्वभौमसत्तेवरील बंधनें मनुष्यास प्रथमतः दिसलीं नाहींत पण नंतर तीं हळूंहळूं उमजूं लागलीं. मनुष्यजातीनें स्वसंरक्षणार्थ एकजूट करण्यासाठीं राष्ट्राची कल्पना शोधून काढली. यामुळें लोकांच्या इच्छा-शक्तींत राष्ट्र जन्मास आलें. राजा व प्रजा यांच्या दरम्यानच्या कल्पित करारांच्या योगानें राष्ट्रांचा अंतिम आधार लोकमत ठरला. व्यक्तिवादाची ही अतिव्याप्ति परमोच्च कोटीस पोंचली. पण या व्यक्तिवादावर समाजवादाचीं व राष्ट्रवादाचीं नियंत्रणें बसणार असें उघड दिसूं लागलें. अंतर्गत व बहिर्गत आक्रमणांपासून संरक्षण व्हावें म्हणून लोकांनीं आपआपसांत करार करून कांहीं विविक्षित अधि-कारांचें सुकाणूं राजाच्या हवालीं केलें. लोकगंगेच्या प्रवाहांत सुकाणूं फिरवून राष्ट्नौका पैलतीराला नेण्याची कामगिरी त्यांनीं राजावर सोंपविली. या हॉब्जच्या सिद्धांतामुळें त्याला आधुनिक राजकीय सिद्धांताचा जनक असें म्हटलें जातें. त्यानें लोकांच्या हक्कांची उभारणी निसर्ग अगर देव यांच्या उसन्या आधारावर केली नाहीं कांहीं विशिष्ट राजकीय तत्त्वावर केली. राष्ट्राचा पाया लोकमताच्या भक्कम बांधाऱ्यावर त्यांनीं बसविला. हें हॉब्जच्या तत्त्वज्ञानाचें वैशिष्ट्य.

राष्ट्रांना जीवपिंडाची उपमा देणारांनीं राष्ट्रीय सिद्धांत अधिक स्फोटक बन-विला. मनुष्याचे व्यवहार बुद्धीपेक्षां भावनेवर चालतात तसेंच राष्ट्रांचें आहे. म्हणून माणसांप्रमाणें राष्ट्रें एकमेकांचे शत्रू होऊं शकतात आणि आपसांतील वैमनस्यामुळें मारामारी उर्फ महायुद्धें त्यांना करावीं लागतात.

## राजमुकुटाचा बेगड

याहीपुढें जाणाऱ्या बहाद्दरांनीं अकलेचे तारे तोडले. त्यांच्यामतें एकादा राजा मेला म्हणजे त्याचा मुलगा राज्याचा वारस होतो ही कल्पनाच मुळीं चुकीची.

कायद्याचा आधार आणि राष्ट्राचा आधारस्तंभ म्हणून सर्व प्रदेशावर राजा मालकी गाजवितो. सर्व गोष्टींचा उगम राष्ट्रामध्यें होतो; राजा व राष्ट्र यांना निराळें अस्तित्व नाहीं. यामुळें एक राजा मेला कीं त्याबरोबर तें राष्ट्रहि मरतें. कांहीं काळ तें राष्ट्र मृतावस्थेंत राहणें भाग असतें. एकादा राजा मेल्यावर त्याची सत्ता लोकांकडे आपण होऊन चालून येते. राजाच्या मुलास त्याचा वारस म्हणून नव्हे तर लोकांची इच्छा म्हणून ती राज्यसत्ता मिळते. या राजेपणाच्या चिवडाचिवडीनें राजमुकुटाला डकविलेला बेगड मात्र निघाला. यापेक्षा दुसरा तादृश फायदा झाला नाहीं.

वरील अनिर्बंध सार्वभौम सत्तेस स्पिनोझानें अविभाज्य ठरविलें आणि पुढील पायरी गांठली. विस्कळित व्यक्ति–व्यक्तींचा समूह परस्परभयानें व स्वार्थानें एक होतो. ती एकी सार्वभौमसत्ता कायम राखते. आत्म्याविना शरीर जसें मृतवत् होतें तसेंच सार्वभौमसत्तेच्या अभावीं समाजात बेदिली व बेबंदशाही माजेल असें स्पिनोझा म्हणतो. सर्व श्रेष्ठांची इच्छा म्हणजे राष्ट्र (State is simple, unitary, soverign will) असें तत्त्व रूसोनें मांडून आधुनिक राष्ट्रकल्पनेस जन्म दिला. यानंतर लवकरच झालेल्या फ्रेंच राज्यक्रांतीनें लोकांच्या सार्वभौम सत्तेस खरी चालना दिली. इ. स. १७८९ त सायेनें ( Sieyes ) "सर्व गोष्टींचा उगम राष्ट्रांत आहे. राष्ट्राची इच्छा हाच सर्व श्रेष्ठ कायदा" असें शिकविलें. एकूण या कालीं लोकसत्ता निर्वंध होण्यासाठीं राजाचीं शिरें फांसावर लटकलीं पण दुर्दैवानें त्या राजांच्या रक्तांतच पुढील झोटिंगशाहीचीं बीजें रुजलीं.* स्वातंत्र्याच्या नांवानें पुकारलेल्या फ्रेंच राज्यक्रांतीनें अल्पकाळची झोटिंगशाही निर्माण केली.

फ्रान्समध्यें इ. स. १७९९ पासून स्वराज्याची घोषणा चालू झाली. त्या स्वराज्यांत राजाला स्थान होतें पण तें अंमलबजावणी करणारा एक वरिष्ठ अंमलदार एवढेंच होतें. लोकांना आपल्या व्यक्तिस्वातंत्र्याबरोबर आपल्या अंतिम हक्कांची जाणीव झालेली होती. म्हणूनच सत्ताविभागणीच्या तत्त्वावर राज्यकारभार सुधारणें आणि समाजांतील विशिष्ट हक्कदाराचें निर्मूलन करणें हेंच राज्यक्रांतीचे

---

* When the king's head fell under the guillotine, it was thought to be the last step necessary to achieve the rule of the people, but the blood of the kings proved the seed of tyranny—Cobban.

दोन प्रधान हेतू ठरले. या क्रांतीनंतर लोकप्रतिनिधींना मिळालेली सत्ता स्वार्थानें सोडवेना. यामुळें मंत्र्यांना सत्ता नसलेल्या गरीब कारकुनांचें स्थान प्राप्त झालें. लोकनायकांनीं सत्ता बळकाविल्यामुळें सर्व जनतेची फसवणूक झाली. त्यांच्या बेशिस्त कारभारांमुळें चोहोंकडे अस्वस्थता व असंतोष निर्माण झाला. अर्थात् जनता पूर्ववळणावर गेली. एका सुलतानाच्या हांतून हिसकावून घेतलेली सत्ता दुसऱ्या सुलतानांस अर्पण करण्यापर्यंत जनतेची मजल गेली. पण हा नवीन सुलतान वंशपरंपरागत हक्कानें गादीवर आला नाहीं. स्वसामर्थ्याच्या बळावर त्यानें सर्व सत्ता एकत्र आणली.

## नेपोलिअन बोनापार्ट

या दृष्टीनें नेपोलिअन बोनापार्ट हा युरोपांतील पहिला हुकूमशहा असें संबोधण्यास हरकत नाहीं. आधुनिक हुकूमशहांचे सर्व गूण त्यानें दाखविले व उधळलेहि. स्वातंत्र्याच्या नावानें लोकांचें स्वातंत्र्य नष्ट केलें. लोकप्रतिनिधिसभेस गुंडाळून ठेवून वटहुकूम जारी केले. म्युनिसिपालिटी, स्थानिक स्वराज्य, पंचायती इत्यादींतील सर्व निवडणुकी बेमुदत बंद करून त्या ठिकाणीं आपल्या ताटाखालचीं मांजरें नेमलीं. फार काय आधुनिक हिटलरप्रमाणें अखिल फ्रेंच राष्ट्राची एकच इच्छा घडविण्याची त्यानें शिकस्त केली. नेपोलिअनच्या कारकीर्दीचा एक विद्वान स्तुतिपाठक म्हणतो, " कडक व कठोर राजसत्ता जुलमी असते हें म्हणणें चूक आहे. सर्वांना निःपक्षपाती न्याय मिळावा म्हणून ते कठोरता धारण करतात. खुद्द क्रांतीमध्यें माजलेल्या बजबजपुरींत सर्वाधिकारी पाहिजेच पण क्रांतीनंतरसुद्धां लोकांची सत्ता, ऐक्य व संघटना यांच्या संरक्षणार्थ एखादा सर्वाधिकारी नायक हवा असतो."

क्रांतीनंतर तात्पुरती घटना म्हणून फ्रेंच लोकांनीं हुकूमशाही स्वीकारली. सत्ताधिकाऱ्यांना सत्तेचा संन्यास सहजासहजीं करवत नाहीं या जगप्रसिद्ध अनुभवाची प्रचीति त्यांना आली. ज्या असंतोषाच्या पोटीं क्रांति व सर्वाधिकारी यांचा जन्म होतो त्याच असंतोषाच्या धगधगणाऱ्या खाईंत त्यांचा मृत्यू ओढवतो. हुकूमशहांच्या पाडावांचा अन्वय कित्येक असा लावतात कीं हुकूमशहा जुलमी व अरेरावी झाल्यामुळें नाश पावत नाहींत; देशकालपरत्वें ते पुरेसे जुलमी बनूं शकत नाहींत म्हणून ते नाश पावतात. अशा कांहींशा कारणानें नेपोलिअनची सत्ता विसकटली.

पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतींतील राजकीय मीमांसेच्या दृष्टीनें दोनतीन वैशिष्ट्यें सांगतां येतील. क्रांतीच्या जळत्या खाईंत राजमुकुटाचा दैवी अंश वितळून निघाला. राजकारणांतील धर्म व रूढी यांचें प्रस्थ जाऊन, बुद्धि व उपयुक्तता यांना महत्त्व प्राप्त झालें. जनतेंत स्वातंत्र्याबरोबर समानतेची ओरड सुरूं झाली. बलाढ्य राष्ट्र म्हणून फ्रान्स युरोपांत वावरूं लागलें. हा सारा फ्रान्सचा उद्धार केवळ राष्ट्रीयत्वामुळें झाला. राष्ट्रीयत्वाचा पाया विचारापेक्षां विकारांत असतो आणि त्याची शिकवण स्वार्थापेक्षां स्वार्थत्यागाकडे अधिक असते. या न्यायानें फ्रेंच राष्ट्रीयत्व सत्ता आणि वैभव यांच्या नादीं लागलें. आणि यांमध्येंच आधुनिक जगातील पहिल्या हुकूमशहाचा तोल गेला.

नेपोलिअनच्या पाडावानंतर फ्रेंच सिंहासनावर " पुनःश्च हरिः ओम् " प्रमाणें राजा बसला. पण तो फारच थोडा वेळ. राजशाहीचा जुना मामला आणि बेशिस्तीचा कारभार फ्रान्समध्यें पुन्हां सुरूं झाला. प्रांतिक व मध्यवर्ती कारभारांत बेबंदशाही माजली. सर्वत्र खोटया लुटपुटीच्या निवडणुकी सुरूं झाल्या. चलन घसरलें, बजेट आंतबट्ट्याचें झालें व परराष्ट्रीय धोरणांत धरबंध नाहींसा झाला. सैन्याकरवीं नवीन मुलूखगिरी करवून पैसा लुटून आणल्याविना राज्य चालविणें अशक्य झालें. लढाईवर उपजीविका करणाऱ्या धंदेवाईकांची चंगळ उडाली, सैन्यांतील बेशिस्त कायम राहिली व लोक हवालदिल झाले.

## लुई नेपोलिअन

प्रत्येक राष्ट्राची तरुण पिढी ही मोठी संपत्ति व सामर्थ्य असतें. त्या पिढीस लष्करी शिस्तीचें बाळकडू पाजलें म्हणजे त्यांचा खरा प्रभाव दिसतो. लष्करी वृत्तीच्या तरुणांना पार्लमेंट नको असतें नेता हवा असतो. त्यांना राजकारण समजत नाहीं फक्त आज्ञापालन समजतें. अशा तरुणांचा पुढाकार फ्रान्समध्यें लुई नेपोलिअननें घेतला. तरुणांच्या सळसळणाऱ्या रक्ताची खुमखुमी भागावी म्हणून त्यानें प्रांतवृद्धीकरणाची योजना पुढें चालू ठेविली. तरुणांच्या डोळ्यांपुढें कांहीं क्रांतिकारक तत्त्वांचें मृगजळवत् ध्येय म्हणून ठेविलें याचें ऋण फ्रेंच तरुणानीं लुई नेपोलिअनला आपल्या स्वातंत्र्याचा सर्वश्रेष्ठ संरक्षक बनवून फेडलें. मात्र ही नवीन फ्रेंच साम्राज्यशाही क्रांतिकारक तत्त्वज्ञानांच्या फाटक्यातुटक्या कपड्यालत्त्यांनीं सजविलेली होती.

पहिल्या नेपोलिअनच्या पाडावानंतर लोकांना आपल्या राजकीय हक्कांची

जाणीव झाल्यामुळें फ्रान्समध्यें पुन: सर्वसत्ताधिकारी येणें मुष्कील होतें. यासाठीं लोकांची सार्वभौमसत्ता व राष्ट्रीयत्व यांची वळून एकजुडी बनवून पेटविण्यांत आली. आणि राष्ट्रीय वैभवाच्या प्रकाशानें लुई नेपोलिअननें लोकांचे डोळे दिपविले. लोकशाही आणि लोकांचें स्वातंत्र्य याच्या रक्षणाच्या बुरख्याखालीं तो सर्वाधिकारी होऊं शकला. त्याला खरें पाठबळ देशांतील पैसेवाल्यांचें, व्यापाऱ्यांचें व धनिकांचें मिळालें. जॅकोबाईट बंडाच्या बागुलबुवाची जाहिरात करून त्यानें आपल्या सत्तेस लोकांची संमति व धर्माचा पाठिंबा हीं मिळविलीं.

लुई नेपोलिअनला जुलमी अत्याचाराचे फारसें प्रदर्शन करावें लागलें नाहीं. कारण तो गादीवर येण्याच्या पूर्वीच समाजांतील सर्व कांटेरी झुडपें झोडपून काढलीं गेलीं होतीं. लुई नेपोलिअनबद्दल प्रौधान म्हणतो कीं “लोकांचा आवाज हा प्रति परमेश्वराचा आवाज. या परमेश्वराच्या तोंडानें लुईचा पुकारा झाल्यामुळें तो राज्याचा कायदेशीर मालक झाला!” शिवाय लुईला ‘नेपोलिअन’ या शब्दाचा, नांवाचा व रूढीचा आयता फायदा मिळाला. इतर हुकूमशहां-प्रमाणें आपल्याविषयीं अद्भुत कथा निर्माण करून लोकांत प्रसृत कराव्या लागल्या नाहींत. लुईच्या अलौकिक बुद्धिमत्तेबद्दल व अद्भुत विचारशक्तीबद्दल लोक भलती समजूत करून घेऊन कांहींकाळ मंत्रमुग्ध झाले. यामुळें लुईनें कांहीं प्रसंगीं अनैतिक वर्तन केलें तरी तें लोकांनीं क्षम्य मानलें. “जुन्या राजेलोकां-पेक्षां त्याची स्थिति सर्वस्वी भिन्न होती. राजांना किल्ल्याच्या तटबंदींत ऐषआरा-माच्या आयुष्यात दंग होतां आलें पण लुईला सदासर्वकाळ चोवीस तास आपल्याविषयीं जागरूक रहावें लागलें. राजाच्या औरसपणाबद्दल कोणी कधीं वाद घालीत नाहीं, त्याला सिंहासनावरून पदच्युत करण्याची भावना लोकांच्या मनांत सहसा येत नाहीं. पण लुईसारख्या सर्वाधिकाऱ्याला आपल्या उचलबांगडीचें नित्य भय असतें;” हे फिशरचे लुईविषयींचे उद्गार अगदीं यथार्थ आहेत. लुईच्या कारकीर्दींत त्याच्याविषयींच्या भक्तिभावास ओहोटी लागण्याऐवजीं दिवसेंदिवस भरती येऊं लागली. या सर्वांची परिणति म्हणजे लुई नेपोलिअनला प्रतिपरमेश्वर बनविण्यापर्यंत लोकांची मजल गेली. अशा अधिदैवताच्या उच्चाटनास नेहमीं बाहेरच्या परक्या सैन्याची जरुरी लागते. लुईचाहि पाडाव परक्या सैन्यानेंच केला.

## नेपोलिअनांचा पाडाव कां झाला?

क्रांतीच्या मृत्युपत्राचा अंमल करण्यांत नेहमीं सर्वाधिकारी लागतो. मार्क्स

म्हणतो कीं लुई हा प्रथमतः गरिबांचा बादशहा होता. लुई जरी राष्ट्राध्यक्षाच्या खुर्चीवर आरूढ झालेला होता तरी सिंहासनाच्या सर्व रूढी पाळून त्यानें तें आसन राजाच्या प्रस्थापनेसाठीं नेहमीं उबदार ठेविलेलें होतें. सैन्यांत शिस्त, मजुरांची सुस्थिति, व्यापाऱ्यांना चलती, मोठाली राष्ट्रीय व औद्योगिक कार्यें आणि प्रदर्शनें, व्यापारी तह, शेतकी व सहकारी पतपेढया यांना प्रोत्साहन, विमा कंपन्यांना ऊर्जितावस्था इत्यादि गोष्टी त्यानें आपल्या कारकीर्दींत घडवून आणल्या. पण अखेर त्यालासुद्धां सत्तेचा मद आला. विशेषतः प्रांतिक बंडाळ्या मोडतांना दाखविलेलें क्रौर्य व पॅरिसमध्यें बाराशें लोकांची निर्दयपणें केलेली कत्तल हीं शेवटीं त्याच्या अंगलट आलीं. याशिवाय विरोधीपक्षाचा छळ, कत्तल, अंधार कोठडी, मारहाण, तुरुंगवास, दहा हजार लोकांना दूर वसाहतीसाठीं सक्तीचें देशांतर, निवडणुकींत हातचलाखी, पार्लमेंटांत मुस्कटदाबी, छापखाने व व्याख्यानें यांवर सक्त नियंत्रण इत्यादि गोष्टींनीं त्याच्या उच्चाटणाची पार्श्वभूमि अगोदर तयार झाली होती. तसें पाहिलें तर लुई फारसा चढाईखोर व आढयताखोर नव्हता. अंतःकलहाविरुद्ध त्याला नेहमीं झगडावें लागलें. दुसरे प्रदेश पादाक्रांत करण्यांत युरोपचा एक संयुक्त देश बनविण्याची त्यांची आत्यंतिक मनीषा होती.

कांहींही झालें तरी 'नेपोलिअन' ही युरोपच्या इतिहासांतील एक अत्यंत संस्मरणीय बाब म्हणून गणली जाईल यांत शंका नाहीं. त्यांनीं आपला प्रभाव युरोपला दोनदां दाखविला पण प्रत्येक वेळेस त्यांना हार खावी लागली. त्यांचा निःपात होण्यास लष्करी पराजय व अंतर्गत बंडाळी ही नैमित्तिक कारणें म्हणून सागतां येतील. दोघेहि नेपोलिअन अंगच्या पराक्रमानें सर्वाधिकारी झाले. पण एकदां सर्वाधिकारीपणा पत्करल्यावर ते आपले अधिकार व जबाबदारी पूर्णपणें विसरले. राजाची मिजास मिळविण्याच्या मागें ते लागले. लोकांकडून एखाद्या राजाला मिळण्याच्या व्यक्तिगत राजनिष्ठेची हांव त्यानीं धरली. नेपोलिअनच्या नांवाच्या मागें राजनिष्ठेचें पालुपद जोडण्याच्या लालसेंत त्यांना अपयश आलें. त्यानीं आपल्या राजवटींना व्यक्तिमहात्म्यापेक्षां तत्त्वांची पार्श्वभूमी ठेवावयास हवी होती. अशा तत्त्वाच्या निशेवर त्यानीं लोकाना भुलविलें असतें तर त्यांच्या विरुद्ध लोकांचीं मनें कलुषित झालीं नसतीं व लोकांनीं त्याचें उच्चाटण केलें नसतें.

पण एकोणिसाव्या शतकांतील हुकूमशहांची चूक विसाव्या शतकांत दुरुस्त व्हावयाची विधिघटना लिहिलेली होती त्यास ते नेपोलिअन काय करणार ?

[ ७ ]

# अर्वाचीन हुकूमशहा

## युरोपांत मुसळें

भारतीय युद्धाच्या समाप्तीनंतर भगवान् श्रीकृष्णासह सर्व यादवांचा संहार एका मुसळानें केला अशी कथा पुराणांत आहे. सद्यःकालीन युरोपांत हुकूमशहारूपी दोन तीन मुसळें निर्माण झाल्यामुळें असाच काळ येऊन ठेपलेला दिसेल. पूर्वी यादवांच्या नाशास ऋषींचा शाप बाधला; हल्लींच्या युरोपिअन लोकांच्या संहारास आधुनिक शस्त्रास्त्रांचा शाप बाधणार. तत्त्वाच्या आवरणाखालीं राष्ट्रांचे राक्षसी व्यूह आढळून येतील. फॅसिझम् आणि कम्यूनिझम् या दोन्हीं तत्त्वांची खरूज व नायटा हीं नाहींशी होण्यास युरोपखंड समुद्राच्या खाऱ्या पाण्यानें धुऊन गेला तर बरें होईल. एरवीं त्याची बाधा सर्व जगाला होईल असें आज प्रत्येकास वाटतें. युरोपांतील प्रमुख तीन हुकूमशहांचें स्वरूप या प्रकरणांत आपण पाहूं.

## ( १ ) स्टॅलिन

१९१७ च्या रशियन राज्यक्रांतीनंतर समाजवादाचा पुरस्कार करणारें श्रमजीवि वर्गाचें अधिराज्य ( Proletarion dictatorship ) स्टॅलिननें स्थापिलें. विसाव्या शतकांतील तिघांहि हुकूमशहांनीं समाजवादाचा कोणत्याहि स्वरूपांत कां होईना

उसना आधार घेऊन आपल्या राजवटींच्या तत्त्वज्ञानाची रंगरंगोटी केली आणि बिचाऱ्या प्रातिनिधिक राजवटीवर सूड उगविला असें दिसेल.

## स्टॅलिन विरुद्ध ट्रॉट्स्की

रशियांत कार्ल मार्क्सच्या विचारसरणीचे जाहीरनामे कम्युनिस्टांनीं फडकविले. प्रातिनिधिक राजवटींना त्यांनीं वर्गीय सत्ता असें म्हणून दूषण दिलें. त्यांतील बहुजनसमाजाला गुलामगिरींत खितपत ठेवणाऱ्या अल्पसंख्याक भांडवलवाल्यांचें कारस्थान त्यांनीं उजेडांत आणलें. राजकीय सत्तेच्या गाडीचा कणा म्हणजे आर्थिक सत्ता राजकारणांतील व समाजांतील या सत्तेच्या जोरावर भांडवलवाले गोरगरिबांची पिळणूक करतात सबब पाशवी शक्तीवर आधारलेलें यंत्र पाशवी-शक्तीच्या जबरदस्तीनेंच मोडून टाकलें पाहिजे आणि त्या ठिकाणीं श्रमजीवी वर्गाचें अधिराज्य प्रस्थापित केलें पाहिजे हा कार्ल मार्क्सचा मुख्य सिद्धांत. आतां राजसत्तेंत खांदेपालट होण्यासाठीं करावी लागणारी क्रांति सर्व जनताजनार्दनानें सामुदायिकरीत्या करावी का क्रांतिशास्त्रांत प्रवीण असलेल्या अल्पसंख्यांकांनीं करावी या वादाच्या मुद्यावर रशियांत स्टॅलिन व ट्रॉट्स्की यांच्या पक्षांमध्यें रणें माजलीं. कांहीं काल कां होईना क्रांतीच्या नांवाखालीं अल्पसंख्याकांनीं सर्व सत्ताधिकारी होणें अनिष्ट आहे; ती सत्ता त्यांना एक दिवस इटकून बिघडवील व मिळालेली सत्ता त्यांना सोडवणार नाहीं असें ट्रॉट्स्कीचें प्रामाणिक मत आहे. स्टॅलिनच्या मतें बहुजनसमाज मूर्ख व अज्ञ असतो. त्यांना क्रांतीची पुरी कल्पना नसते. क्रांतीस आवश्यक असणारी धडाडी व नैपुण्य याचा फैलाव अनुयायांच्या लहान गटांत जितका करतां येईल तितका बहुजनसमाजांत करणें शक्य नसतें. अशा लहानशा गटाला तो कम्युनिस्ट पक्ष म्हणून संबोधितो. त्याच्या आधारावर देशांतील सत्ता काबीज करून समाजांत इष्ट ते फेरफार अगोदर केले पाहिजेत असें स्टॅलिनला वाटतें. दुर्दैवानें आज ट्रॉट्स्कीचे उद्गार खरे ठरले. ट्रॉट्स्कीच्या निर्घृण हत्येनें ट्रॉट्स्कीच्या पक्षास जरी जबरदस्त धक्का बसला तथापि त्यानें वर काढलेल्या शब्दास किंचितहि बाध येत नाहीं. ते शब्द अमोलिक व अमर आहेत.

स्टॅलिनकृत श्रमजीवि अधिराज्य रशियांत जारी आहे. गोरगरिबांचें हितसंरक्षण व मार्गदर्शन हें कम्युनिस्ट पक्षाचें मुख्य कर्तव्य स्टॅलिननें मानलें आहे. ट्रॉट्स्की व स्टॅलिन या दोघांचें अंतिम उद्दिष्ट एकच. दोघेही लेलिनकृत बायबलचे आधार भडाभड देतात. संघटित लोकाचें राजकीय नेतृत्व ही त्यांची हुकूमशाहीची

अभिनव कल्पना पूर्वीपेक्षां फक्त निराळी आहे, त्यामध्यें हुकूमशाहीचे सर्व गुणावगुण—जुलूम, सक्ती, वटहुकूम, अत्याचार—आहेत. पण स्टॅलिनच्या मतें असें पक्षयुक्त अधिराज्य सदासर्वकाळ प्रभावी नसतें व नाहीं. देशांतील भांडवलशाहीचा पुरा बींमोड होईतों ही तात्पुरती योजना असून अखेर कम्युनिस्ट लोकशाहीची प्रस्थापना करणें हें खरें अंतिम उद्दिष्ट आहे. या उद्दिष्टाच्या रोखानें मार्ग चालूं लागलें कीं हुकूमशाहीचे गुणावगुण आपोआप वितळत जातील. तोंपर्यंत अंतर्गत व बहिर्गत संकटांपासून निवारण होण्याकरतां प्रचंड खडें सैन्य व मुबलक आधुनिक शस्त्रसंभार पोसणें रशियास भाग आहे असे स्टॅलिनचे विचार आहेत.

## राष्ट्रवादाचा गजर ठणठणला

पण ह्याच्या अनुभवाची प्रचीति मात्र उलटी आली. अल्पसंख्य पक्षांकडून बहुजन गोरगरीबांकडे सत्ता जाण्याचें " देहली तो बहोत दूर है " या म्हणीप्रमाणें लांबच राहिलें. दिवसोंदिवस बहुजन गरीब जनता राजकारणांत संदिग्ध व पुसट होऊं लागली. पक्षयुक्त अधिराज्याचा खुंटा रशियांत वरचेवर हालवल्यामुळें बळकट झाला. रशियांत हुकूमशहाच्या जाचांपासून समाज मुक्त होण्याऐवजीं तेथील हुकूमशहा कम्युनिस्ट पक्षाच्या बंधनांतूनसुद्धां मुक्त झाला. कार्ल मार्क्सच्या कल्पनेचा पुरा विध्वंस झाला. भांडवलशाहीच्या नाशाबरोबर देशांतील राष्ट्रवाद वितळत जावा ही त्याची कल्पना फोल ठरून तो राष्ट्रवाद सर्वभक्षक व प्रबळ ठरला. राज्ययंत्रादि घड्याळांत राष्ट्रवादाचा गजर ठणठणूं लागतांच रशिया देशभक्तीचे व साम्राज्यवादाचे गोडवे गाऊं लागला.

## झारचा वारस स्टॅलिन

क्रांतीनंतर सत्ता बळकावून बसलेला वर्ग सत्ता सोडण्यास नाखूश झाला. त्या सर्वांवर देखरेख करणारा वरिष्ठ अधिकारी स्टॅलिन बनला. आनुवंशिक नसला तरी एका दृष्टीनें तो झारचा वारसच ठरला. म्हणूनच स्टॅलिनला " Soviet Bonapartism " ही संज्ञा ट्रॉट्स्कीनें दिली आहे. बहुजनसमाजाच्या नांवाखालीं झालेली जगांतील तिसरी अपूर्व राज्यक्रांति रशियांत झाली पण ती फुकट गेली असें म्हणणें भाग पडतें. लोकांच्या माथ्यावर मिरें वाटणारा व त्राही भगवान् करून सोडणारा सुलतान लोकांना क्रांतीचा वरप्रसाद म्हणून स्वीकारावा लागला. कम्युनिस्ट विरोधकांच्या नांवावर कितीतरी हजारों लोकांच्या आहुती स्टॅलिननें

हत्याकांडांत टाकल्या. आजचें रशियाचें आंतरराष्ट्रीय धोरण कोणाला कळण्यासारखें नाहीं असें कोणी म्हणतील पण त्यांत न कळण्यासारखें असें मुळींच कांहीं नाहीं. साम्राज्यशाहीच्या नांवानें खडे फोडण्यांत ज्यानें गेलीं वीस वर्षें घालविलीं त्यालाच आतां साम्राज्यलोभ सुटावा ना ? पण साम्राज्यलोभानें पछाडलेल्या राष्ट्रांच्या संगतींत राहूनही रशिया त्यापासून इतके दिवस अलिप्त राहिला याबद्दल त्याचें कौतुकच केलें पाहिजे. संन्यास घेऊन अनेक वर्षें झाल्यानंतर लंगोटी, छडी, कमंडलू, दंड फेंकून देऊन पुनःश्च संसारांत शिरणाऱ्या लुच्चा व कांगावखोर संन्याशाची उपमा रशियास खाशी शोभते. एरवी रशियन अस्वलानें निरुपद्रवी फिनलंडचा प्राण गुदगुल्या करीत कां घेतला असतां ?

एकूण प्रत्येक क्रांति कांहीं विशिष्ट तत्त्वांच्या स्थापनेकरितां म्हणून झाली तरी शेवटीं त्या तत्त्वांची होळी पेटते असें म्हणावें लागतें. तीं तत्त्वें आचरणांत आलीं पाहिजेत असा आग्रह धरणाराचा अखेर फजितवाडा होतो.

राक्षसाचे दात पेरणारानें कोणतें पीक आपणांस कापावें लागेल ह्यांचा विचार ते पेरतांनाच नको कां करावयास ?

## ( २ ) मुसोलिनी

### सोरेलची शिकवण

कम्युनिस्टांची अधिकार बळकावण्याचीं सर्व तंत्रें अस्सलबरहुकूम इटॅलियन फॅसिझमनें उचललीं. युरोपांत समाजवादी विचारांचा झंझावात फों फों म्हणून वाहत होता यासाठीं अराजक संघवादाचा ( Syndicalism ) त्यानीं आश्रय घेतला. सन १९१४ पूर्वी फ्रान्स व इटलींत सिंडिकॅलिझमचा जोर होता. १९०८ सालीं सोरेल नामक तत्त्ववेत्ता या वादाचा पुरस्कर्ता होता. राजकारणांत विचारापेक्षां भावनांना अधिक प्राधान्य मिळालें पाहिजे असा याचा आग्रह. लोकशाहीचे पुरस्कर्ते मनुष्यास " राजकीय प्राणी " असें संबोधतांना त्याच्या बुद्धीवर भर देतात. पण मनुष्यानें पूर्वीच्या अनुभवानें शहाणें होऊन स्वार्थ व स्वहित जपण्यास शिकलें पाहिजे. फारतर त्याच्या जोडीस थोडीशी पराहितदक्षता व माणुसकी त्यानें बाळगावी. निवळ पराहितदक्षतेच्या पुरांत स्वतः वाहून जाणें इष्ट नाहीं अशी शिकवण सिंडिकॅलिस्टांना सोरेलनें दिली.

या दृष्टीनें भांडवलशाहीचीं गुरें समाजवादाच्या गोठ्यांत हांकून नेत असतां वाटेंत सार्वत्रिक संपासारख्या वावटळीनीं त्यांना बुजविणें योग्य नाहीं, असें

म्हणून त्यांनीं कामगारांच्या जन्मसिद्ध हक्कावर गदा आणली. देशांतील मध्यवर्ती सरकार सर्व उद्योगधंद्यांचे संयुक्त हितसंरक्षक बनून सर्वांगपूर्ण सत्ताधारी (Corporate State) झाल्याविना देशोद्धार होणें शक्य नाहीं असें म्हणत म्हणत त्यांनीं भांडवलवाल्यांना गुलाम केलें. सार्वत्रिक पण क्रांतिकारक संपांच्या लाटेंतून इटलींत सिंडिकॅलिझमूचा उदय झाला.

## पाशवी शक्ति हा युगधर्म

प्रथमतः इटलींत सिंडिकॅलिझमला "कामगारांचा साम्राज्यवाद" असें नामाभिधान मिळालें. अर्थात् या सिंडिकॅलिझममध्यें भांडवलवाल्या साम्राज्यशाहीचा उत्साह, उन्माद, विजिगीषा हे गुण आपोआप आले. उच्च आंतरराष्ट्रीय विचार फेंकून देऊन ते कट्टर राष्ट्रवादी झाले. साम्राज्यहीन इटलीला बाळसें आणावयाला याशिवाय दुसरें बालामृतच नाहीं असें ते म्हणूं लागले. "पाशवी शक्ति हा युगधर्म, समाजाचें स्थैर्य व त्याचा उत्कर्ष यांच्या स्वातंत्र्यासाठीं शक्तीचा उपयोग करणें अपरिहार्य आहे." हें फॅसिझमचें मुख्य तत्त्व तरुण समाजवादी पुढारी बेनिटो मुसोलिनी या 'झमूचा' पुरस्कर्ता झाला. राष्ट्रांना मृतवत् होऊं न देतां नेहमीं जिवंत ठेवणारी साम्राज्यवादाची संजीवनी त्यानें इटालिअन लोकांना पाजली. आंतरराष्ट्रीय कला, वाङ्मय, ऑलिंपिक सामने इत्यादींप्रमाणें राजकारण ही एक यथास्थित व टाकठीक असलेल्या भांडवलवाल्यांच्या चैनीची व करमणुकीची गोष्ट आहे असें मुसोलिनीचें आवडतें मत आहे.

१९१४ च्या महायुद्धानंतर इटलींत फॅसिझमला खरी चालना मिळाली. प्रथमतः इटलींत क्रांतिकारक समाजवादाचा जोर होता. अराजक व कट्टर समाजवाद्यांचा १९२० सालीं पाडाव झाल्यावर फॅसिस्ट पुढें सरसावले. आपला कार्यभाग साधण्यासाठीं पार्लमेंटरी पद्धतीच्या नांवानें त्यांनीं शिमगा चालू ठेविला. दोस्तांच्या बरोबरीनें महायुद्धांत विजयी होऊनहि पराजितांपेक्षां अधिक दुःख, दुष्काळ आणि मानहानि त्यांना पत्करावी लागली. दोस्त राष्ट्रांनीं वचनभंग करून इटलीला तोंडघशीं पाडलें. प्रांताच्या लुटींत त्याला हिस्सा न दिल्याकारणानें तो अत्यंत नाराज झाला. देशांतील आर्थिक हलाखी, लोकांचा कंगालपणा आणि कामगारांचे सार्वत्रिक संप यामुळें लोक त्रस्त झाले. कम्यूनिझमच्या प्रसारास यापेक्षां नामी संधि कोणती असणार? दोन वाईट गोष्टींपैकीं कमी वाईट गोष्ट

स्वीकारावयाची हा मनुष्यधर्म आहे. त्याला अनुसरून कम्युनिझमपेक्षां फॅसिझम बरा म्हणून इटलीनें स्वीकारला.

इटलींतील फॅसिझम आणि रशियांतील बोल्शेव्हिझम, दोन्ही लष्करी पराजय आणि अंतःस्थ बजबजपुरी यामुळें उगम पावले. दोन्हींहीं संयुक्त, संघटित व शिस्त पाळणाऱ्या पक्षाच्या फांद्याच्या आधारानें वर चढून शेवटीं त्या पक्षाच्या माथ्यावर जाऊन बसले. फॅसिस्टांनीं कम्युनिझमचा फडशा पाडला आणि प्रातिनिधिक राजवटींची कच्च्या चुन्याची इमारत गाडली. देशांत निवडणुकीऐवजीं स्वतःचे हस्तक, कायद्याच्या राज्याऐवजीं वटहुकूमाचें राज्य आणि जेथें निवडणूक अपरिहार्य तेथें लॉटरीप्रमाणें हमखास बहुमत त्यांनीं मिळविलें. आपल्या पक्षांत सर्व राष्ट्र समाविष्ट करून त्यांनीं पक्षविरोधकांना खडे चारले.

## वृत्तपत्रीय राज्ययंत्र.

बेनिटो मुसोलीनी प्रथमतः एका वृत्तपत्राचा संपादक होता आणि त्या पत्राद्वारें त्यानें आपल्या पक्षाचा प्रसार केला. शिवाय मुसोलिनीच्या कारकीर्दीत राष्ट्रीयत्वाचा फैलाव करणाऱ्या उत्तेजक वक्तृत्वाला ऊत आला. प्रचारखात्याला प्रचंड महत्त्व आलें. या सर्व गोष्टींमुळें फॅसिझमला "वृत्तपत्रीय राज्ययंत्र" ( Government by journalism ) अशी संज्ञा मिळाली.

समाजवाद आणि सिंडिकॅलिझम् यांमधील फरक बरेचसे तात्त्विक आहेत. कदाचित् प्रत्यक्षांत कांहींकांहीं गोष्टींमध्यें दोघांत साधर्म्य आढळेल. देशांतील घडामोडीस व परिस्थितीस अनुसरून फॅसिझमनें आपल्या डोक्यावरील तत्त्वांच्या पगड्या अनेकदां फिरविल्या. स्वार्थासाठीं त्यांनीं तत्त्वांना बटीक केलें. सर्वांचा हेतू राष्ट्राधिपतींची सत्ता व सामर्थ्य अद्वितीय होईल असें करणें हा होता. हादरलेल्या भांडवलवाल्यांच्या अंतःकरणाला थोडासा आधार दिला. भांडवलवाल्यांची मनधरणी करणाऱ्या फॅसिझमनें राज्ययंत्रांतील सर्व सत्ता काबीज केल्यावर दूध पाजलेल्या सर्पाप्रमाणें त्यांच्यावर उलटून त्यांचा चावा घेतला. राष्ट्राच्या नांवावर जबरदस्त कर भांडवलवाल्यांवर लादून त्यांनीं त्यांच्या उपकाराचे पाग फेडले. यावर भांडवलवाले जागे झाले. पण—

## लोकांच्या मनगटीं अग्निकंकण

बहुजनसमाजास झुलविण्यासाठीं त्यांनीं निरनिराळ्या क्लृप्त्या योजिल्या. गरिबांच्या साठीं नवीन सार्वजनिक उद्योगधंदे सुरू करून त्यांच्या भाकरीची विवंचना

थोडी दूर केली. कामगारांच्या सुखसोयींसाठीं फुकट करमणुकी, फुकट प्रवास, खेळण्याच्या जागा, बागा, त्यांनीं पुरविल्या. याचा मोबदला मात्र त्यांनीं जबरदस्त घेतला. कामगारवर्गाच्या हातांतील संपासारखें अमोघ हत्यार त्यांनीं हिसकावून घेतलें.

देशांतील गुप्त क्लब, मंडळें व संस्था यांच्यावर वरवंटा फिरला. विरोधी लोकांच्या वाट्यांस हद्दपारी, तुरुंग व कत्तल आली. छापखाना व वक्तृत्व यांवर नियंत्रण बसलें. वाङ्मयांत व विश्वविद्यालयांतून फॅसिझमची शिकवण सक्तीची झाली. इटलींतील बाल-बालकांना भावी उज्वल इतिहासाचें शिक्षण आणि इटलीच्या उद्धारक पवित्र मुसोलिनी याच्यावर अढळ निष्ठा यांचें बाळकडू सक्तीनें पाजण्यात आलें.

उदारमत प्रतिपादन करणाऱ्या अर्थशास्त्राची हकालपट्टी फॅसिस्टांनीं केली. राष्ट्रवैभव व ऐश्वर्य वाढविण्यासाठीं राष्ट्रदेवतेची एकनिष्ठ उपासना करण्याचें अग्निकंकण त्यांनीं लोकांच्या मनगटांत बांधलें. मोठमोठाले उद्योगधंदे, सार्वजनिक कार्यें, शेतकीची सुधारणा, शस्त्रास्त्रांची प्रचंड निपज इत्यादि अवास्तव खर्चाच्या बाबी त्यांच्या शिरावर चढविल्या. जगांत इटलीची इभ्रत व दरारा वाढविण्यासाठीं, लष्करी, नाविक व वैमानिक सामर्थ्याची भरमसाट वाढ करण्यांत आली आणि या सर्वांचें क्रमप्राप्त धोरण म्हणून महायुद्धाचा पुरस्कार मुक्त कंठानें त्यांना करावा लागला.

## शिकंदर बादशहाची आवृत्ति

'भांडवल' या रूढ अर्थानें इटली भांडवलवाला देश नाहीं असें ते म्हणवून घेतात. सर्व उद्योगधंदे, व्यापार इत्यादि मंडळाच्या संयुक्त घटनात्मक संस्था म्हणजेच साक्षात् मुसोलिनीचा इटली असें ते समजतात. मार्क्सच्या समाजवादानें रशियात स्टॅलिन, माणुसकीच्या वादानें ( Humanitarian ) फ्रान्समध्यें नेपोलिअन आणि सिंडिकॅलिस्टाच्या राष्ट्रवादानें इटलींत मुसोलिनी असे झोटिंगशहा निर्माण झालेले आढळतील. ॲबिसीनिया, स्पेन आणि अल्बानिया हे देश गिळंकृत करण्याच्या निमित्तानें मुसोलिनीनें राष्ट्राच्या सर्व नाड्या आपल्या हातीं घेतल्या. याच सत्तेनें मदांध झालेला मुसोलिनी जगांत कूच करीत पुढें चालला. पण शिकंदर बादशहाप्रमाणें जगांत नवीन प्रदेश जिंकण्यास सुलभ व शिल्लक नाहींत म्हणून कांहीं काळ अश्रू ढाळीतहि बसला. पण हिटलरनें केलेल्या फ्रान्सच्या

पाडावानें मुसोलिनीच्या गिधाडी वृत्तीला मृत फ्रेंच साम्राज्याचे लचके तोडण्यास उत्तम संधि मिळाली.

## ( ३ ) हिटलर

हिटलरनें समाजवादाशीं नातें जोडण्यासाठीं जर्मनींत राष्ट्रीय समाजवादी पक्ष स्थापिला. राष्ट्रीय समाजवाद हे दोन शब्द इतके परस्पर विसंगत व विरोधी आहेत कीं त्यांच्या एकीकरणानें कसलाहि अर्थबोध निर्माण होऊं शकत नाहीं. निव्वळ समाजवाद या शब्दाच्या उपयोगाकरितां ही अर्थहीन शब्दद्वयाची क्लृप्ति हिटलरनें काढली असावी. युरोपांतील प्रसिद्ध तीन हुकूमशहांत हिटलर प्रमुख व प्रबळ असा आहे. त्याचें तत्त्वज्ञान अत्यंत जाज्वल्य आहे. आणि सर्व जगाला गवसणी घालण्याचा त्याचा उद्देश दिसत असल्यामुळें त्याच्याविषयीं सांगोपांग विवेचन करणें भाग आहे.

## जर्मनीची हलाखी

जर्मनींत लोकसत्ताक राजनीतीचीं उदार व उदात्त तत्त्वें केव्हांहि प्रिय होऊं शकलीं नाहींत. जर्मन लोकांना मार्गदर्शक पुढारी हवा असतो; मग त्याच्या हुकुमाचें जूं ते आपल्या मानेवर मोठया आनंदानें घेतात. बिस्मार्कच्या राजवटीनें जर्मनीचा केवळ राजकीय व लष्करी वेषपालट झाला नाहीं तर धार्मिक व आर्थिक बाबींतहि जर्मनीचा पुनरुद्धार झाला. गेल्या महायुद्धानंतर युरोपांत उचंबळलेल्या समाजवादी तुफानांत जर्मन नौका डळमळूं लागली. त्यांत त्या तुफानाचा उत्प्रेरक रशिया जर्मनीच्या पाठीशीं बिलगून होता. १९२९ नंतर आर्थिक हलाखीच्या वावटळींत जर्मनी सांपडला. खुद्द देशांतील आणि बाहेरच्या जगांतील बाजारपेठा दुसऱ्या राष्ट्रांनीं लाटल्यामुळें बाहेरून संपत्ति लुटून आणण्याचा मार्ग बंद झाला. उद्योग, धंदे, व्यापार यांना खोट बसली, दिवाळीं निघालीं. अर्थात् बेकारीचा भस्मासूर जर्मनींत उठला. दोस्तांचीं कर्जें फेडतां फेडतां देशांत सुवर्णाचा खडखडाट झाला. जर्मनीची पत म्हणून कसली ती उरली नाहीं. दर्जा व मान या गोष्टी जर्मनीस केव्हांच सोडून गेल्या होत्या. लोक उपासमारीच्या अवस्थेस पोंचले होते. १९३० च्या सुमारास जर्मनींत राष्ट्रीयसमाजवाद व कम्यूनिझम यांची जणूं शर्यत लागली होती. ती अखेर पहिल्यानें दुसऱ्याला मागें टाकून जिंकली.

## हुकूमशहारूपी गर्भपिंडाची धारणा

१९१९ च्या नवीन लोकसत्ताक राज्यसंस्थेंत राजाच्या ऐवजीं अध्यक्ष आला. पाठीशीं बिलगलेल्या रशियन लाल संकटापासून निवारण होण्यासाठीं राजकर्त्यांना स्वतंत्र व बलवान करणें जरूरीचें भासूं लागलें. लोकसत्ताक राजवटींत लोकांच्या हातांतून सत्ता हिसकावून घेणें हें काम अति दुर्घट असतें. राष्ट्रीय आपत्तीच्या प्रसंगीं फ्रान्सप्रमाणें अनेक पक्षोपपक्षांची आवळ्यांची मोट बांधून सर्व जगाला आपल्या कमकुवतपणाचें प्रदर्शन करणेंहि बरें नसतें. जर्मन राज्यघटनेंत सर्वश्रेष्ठ सर्वाधिकारी निर्माण होण्याची तरतूद जणूं हें जाणून अगोदरच केली होती. जर्मनींतील अध्यक्ष फ्रान्सप्रमाणें कायदेमंडळांतून न निवडल्याकारणानें कळसूत्री बाहुल्याप्रमाणें नसतो. अमेरिकेप्रमाणें लोकांकडून स्वतंत्ररीत्या तो निवडलेला असल्याकारणानें त्यास राज्यघटनेंत स्वतंत्र स्थान व सत्ता आहे. त्या सत्तेच्या जोरावर प्रसंगविशेषीं तो कायदेमंडळास धाब्यावर बसवूं शकतो. या विशिष्ट घटनेंतच भावी हुकूमशहाचा गर्भपिंड धारणा धरूं शकतो असें अनुभवास आलें आहे. " ज्यावेळीं प्रचलित राज्यघटनेला अनुसरून कारभार चालविणें अशक्य होईल तेव्हां तो लष्कराच्या साहाय्यानें अध्यक्षानें हांकावा. राष्ट्राच्या स्वास्थ्यासाठीं आणि लोकांच्या सुरक्षिततेसाठीं जरूर ती सर्व तांतडीची उपाययोजना प्रसंग-विशेषीं नागरिकांच्या स्वातंत्र्यावर बंधन घालूनसुद्धां करावी" इत्यादि राज्यघटनेंतील कलमांनीं अध्यक्षांना जर्मनींत एकप्रकारचा आदेश मिळाला होता. सत्ताविभागणीची काटेकोर अंमलबजावणी करणाऱ्या आणि न्यायखात्याच्या हातांत चाबूक देणाऱ्या अमेरिकन राज्यघटनेंत प्रेसिडेंट रूझवेल्ट कांहीं काळ कां होईना हुकूमशाही गाजवूं शकले. पुढें त्या बेफाम तट्टूला न्यायखात्यानें चाबकाच्या तडाख्यानीं वळणावर आणलें हें निराळें. पण अशी योजना जर्मनींत नसल्यामुळें अध्यक्षाच्या बेफाम वर्तनावर कसलाच वचक राहिला नाहीं. जर्मन राज्यघटनेंत हिटलरच्या उदयापूर्वी अध्यक्षानें जादा अधिकार १९२५–३० दरम्यान एकोणीस वेळ, पुढें १९३१ मध्यें ४२ वेळ आणि १९३२ मध्यें ५९ वेळ वापरला असे दाखले आहेत. शेवटीं हिटलरनें अध्यक्ष व चॅन्सलर या दोन जागा एक करून जादा अधिकार वापरण्याचे वरचेवर येणारे प्रसंग कायमचे टाळले.

## गॉडफ्रिड फिडरचा जाहीरनामा

१९२० सालीं गॉडफ्रिड फिडर नामक एंजीनिअरनें हिटलरच्या पक्षास पंच-

वीस कलमी जाहीरनामा प्रथम तयार करून दिला. त्यांत जर्मनीस समानता असली पाहिजे ही मागणी, व्हर्साय तह फेंटाळणें, वाढत्या प्रजेस वाढत्या भूमीची जरूरी इत्यादि गोष्टी आढळतात. कॅ. र्‍होमनें या लहान पक्षाला शिस्त लावण्यासाठीं स्वयंसेवक दल काढलें, संघटना केली आणि प्रसारासाठीं तन, मन, धन वेंचलें. या संघटनेमुळेंच १९२८ साल रिशस्टॅगमध्यें या पक्षाला बारा प्रतिनिधी धाडतां आले.

येथपासून राष्ट्रीय समाजवादाचा प्रसार जर्मनींत वणव्याप्रमाणें झाला. हिटलर-सारखी अभूतपूर्व व्यक्ति त्याला नेता म्हणून लाभली हें त्याच्या प्रसारास मुख्य कारण. नेपोलिअनसारखी तीव्र व विशाल लष्करी दृष्टि, आवेशयुक्त नाटकी भाषणाची लकब आणि लोकांना वक्तृत्वाच्या योगें मंत्रमुग्ध करण्याची अपूर्व शैली यामुळें हें हिटलरला साध्य झालें. " प्रचारशास्त्र हें शास्त्र नसून एक कला आहे. " असें तो यासाठीं म्हणतो. बहुजनसमाजाच्या भावनेची खुंटी पिरगाळून त्यांच्या आकांक्षा उद्दीपित करण्यास त्यानें या कलेचा मनमुराद उपयोग केला.

वेगवेगळ्या कारणास्तव जर्मन लोकांनीं हिटलरला पाठिंबा दिला. कम्यूनिझमसाठीं होणाऱ्या जागतिक क्रांतीनंतर भावी समाज स्थितीचें सुखस्वप्न लोकांनीं झिडकारून नाझीझमच्या राष्ट्रोद्धाराच्या सत्यसृष्टींतील योजना लोकांनीं स्वीकारल्या. कम्यु-निझमऐवजीं नाझिझमला यासाठीं कामगार वर्गानें उचलून धरलें. महायुद्धांतील हानि, अवाढव्य खर्च आणि चलनांची भरमसाट वाढ यामुळें जर्मनींतील मध्यम लोकाचा खरा नायनाट झाला. साहजिकपणें श्रमजीविवर्गास महत्त्व प्राप्त झालें. आणि स्वार्थासाठीं ते एक क्रांति करतील असें धनिकांना वाटूं लागलें. ती क्रांति दूर ठेवण्याचें—नव्हे गाडण्याचें—अभिवचन देऊन धनिकांचा पाठिंबा नाझींनीं मिळविला. खासगी भांडवल शाबूत राहिलें पण तें राष्ट्राच्या इच्छेवर अतएव हिटलरच्या इच्छेवर अवलंबून जर्मन लष्करात जुनें शिस्तीचें, संघट-नेचें व कौशल्याचें वळण कायम होतें. उलट निशःस्त्रीकरणाच्या निलाजरेपणानें लोकांना चेव आला होता. लष्कराची पुनः संघटना व शस्त्रास्त्रांची वाढ या धोरणामुळें हिटलर फार लोकप्रिय झाला. ज्यूंचा निःपात आणि उत्कट जातीय-त्वाचा पुरस्कार यामुळें जर्मन रक्त सळसळूं लागलें. देशांतील बेकारी जवळ जवळ नाहींशी झाली. जर्मन राष्ट्रीयत्व पवित्र व शुद्ध करण्याच्या नादांत ते मग्न झाले. जर्मनींत राष्ट्रवाद व समाजवाद एकमेकांच्या पाठीला पाठ लावून आलेलीं जुळीं भावंडें आहेत हा गैरसमज हिटलरनें जर्मनींत पसरूं दिला.

## जर्मनीचें बायबल

हिटलरचें आत्मचरित्र (Mein kamp) म्हणजे जर्मनीचा पवित्र धर्मग्रंथ. एका हातांत बायबल आणि दुसऱ्या हातांत तलवार अशा आवेशानें रणगर्जना करीत सर्व यूरोपखंड पादाक्रांत करीत तो पुढें चालला आहे. सैतानालासुद्धां स्वतःच्या राक्षसी कृत्याच्या समर्थनार्थ पवित्र धर्मग्रंथांतील वाक्यांची धूळफेक करावी लागते. देशभक्तीच्या उमाळ्यानें जर्मन लोक पिसाळले. ही कामगिरी या आत्मचरित्रानें बजावली.

## रोझेनबर्गचें विषारी तत्त्वज्ञान

जर्मन लोक शुद्ध आर्य जातीचे एकमेव अवशेष ही रक्तमीमांसा त्यानें रोझेनबर्गपासून उचलली. त्याच्या भरतीस जुनें परंपरागत प्रशियन तत्त्वज्ञान घालून हिटलरनें आपलें तत्त्वज्ञान सजविलें. रोझेनबर्गकृत विषारी तत्त्वज्ञान " The myths of the twentieth century " या पुस्तकांत सांठविलेलें आहे. स्वस्तिक झेंडा सर्व जगावर फडकविणें हे त्या साऱ्या तत्त्वज्ञानाचें ध्येय. हिटलरच्या प्राथमिक अवस्थेंत प्रस्तुत पुस्तक हिटलरला रोझेनबर्गनें अर्पण केलें आणि त्यावर हिटलरनें आपल्या पसंतीचें शिक्कामोर्तब केलें. तेथपासून त्याच्या ११० आवृत्त्या निघाल्या असून सुमारें सहा लाख प्रती खपल्या. हिटलरच्या आत्मचरित्रानंतर या पुस्तका· इतका खप दुसऱ्या कोणत्याहि पुस्तकाचा झाला नाहीं. जर्मन माणसाच्या नित्याच्या आयुष्यक्रमांत या पुस्तकास महत्त्वाचें स्थान आहे. रोझेनबर्गच्या पुस्तकाचें साद्यंत भाषांतर अद्याप अन्य भाषेंत झालेलें नाहीं. तें अस्सल पुस्तक वाचणाऱ्याच्या अंगावर रोमाच उठतात असें म्हणतात.

कम्युनिझमचा नायनाट करून जगांत एका शुद्ध जातीय व वंशीय लोकांचें साम्राज्य निर्माण करणें हा त्याचा आशावाद आहे, शुद्ध व सुंदर कलासुद्धां शुद्ध रक्ताची जात निर्माण करूं शकते असें खुळचट विधानहि त्यांत आहे. युरोपखंडांत एक प्रेमानें अगर दुसरें प्रतिष्ठेनें असें राज्य् करितां येईल. ख्रिश्चन धर्मानें प्रेमाचें साम्राज्य स्थापण्याचा प्रयत्न करून अपयश घेतलें. आतां युरोपला जोरदार मनगटाच्या जोरावर प्रतिष्ठा राखणारें स्वामित्व हवें आहे त्याशिवाय युरोपला स्वाभिमानानें व प्रतिष्ठेनें जगतां येणार नाहीं. स्वातंत्र्य समता आणि बंधुत्व या तीन वेडगळ तत्त्वानीं जग मारलें व लोकशाहीकृत दुबळीं राज्ययंत्रें आलीं. तसें करण्यांत मनुष्यानें निसर्गाचा नियम झुगारला. निसर्गांत पुढाऱ्याचें प्राबल्य आणि

अनुयायांत शिस्त आणि आज्ञाधारकपणा या गोष्टी दिसून येतात. अखेर मानव-जातीस याच गोष्टी उपकृत ठरतील. मुलांमुलींकरितां निव्वळ ज्ञानाची पाणपोई उघडून भागणार नाहीं. त्यांच्या स्वभावास व आचरणास वळण देण्यासाठीं त्यांच्या-मध्यें शिस्तीचें पालन व आज्ञाधारकपणा हे गुण प्रामुख्यानें यावयास हवेत.

ज्यू ही जात अगर वंश नसून शुद्ध जातीच्या रक्तशोषणावर जगणारी जळू आहे. सर्व रक्तांच्या भेसळीपासून उत्पन्न झालेली अति गलिच्छ अशी ही जात असल्यामुळें तिचा बींमोड प्रथम केला पाहिजे.

राष्ट्राभिमान हा श्रेष्ठ दर्जाचा सद्गुण असून तो प्रत्यक्ष धर्महि आहे. त्यापुढें ख्रिश्चन धर्माचीसुद्धां मातबरी नाहीं. शुद्ध जर्मन जातीचें साम्राज्य युरोपखंडावर प्रस्थापित होणें युरोपच्या अंतिम हिताचें आहे. समशेरीनें जर्मन शत्रूंची कापाकापी करून, जिंकलेल्या निर्जन प्रांतांत प्रतिष्ठा व जर्मन स्वातंत्र्य यांचा नांगर जर्मनीनें फिरविला पाहिजे. फ्रान्सनें आपलें राष्ट्र व संस्कृति यांचें रक्षण करीत आपल्या ठिकाणीं स्वस्थ बसावें. युरोपांत लुडबुड करण्याचें त्यांस कारण नाहीं. रशियानें आपले हातपाय आशियांत पसरावेत. युरोपांतील शुद्ध जातींच्या लोकांत त्यांना मुळींच स्थान नाहीं. मोठमोठालीं शहरें कामगारवर्गाच्या प्राबल्यामुळें कम्युनिस्टांचे गड्डे बनतात ते उखडून काढण्यास कामगारांना परत शेतावर धाडणें आणि खेडे-गांवचें जीवन सुखमय करणें भाग आहे.

## रशियाचें राष्ट्रकार्य

ज्या गोष्टीमुळें जर्मनीचें वर्चस्व व प्रतिष्ठा कायम राहील तेवढयाच गोष्टी जर्मन लोकांनीं जाणल्या पाहिजेत. व्यक्तिस्वातंत्र्य हा फक्त शुद्ध आर्यजाती-करतां परमेश्वरानें दिलेला वर आणि तोही केवळ पुरुषांनाच. कारण राष्ट्र म्हणजे पुरुषांचा समाज त्यांत स्त्रियांना स्थान नाहीं. देशाच्या राजकारणांत स्त्रियांचें प्राबल्य झालें कीं राष्ट्राच्या अभिमानास प्रारंभ होतो. पुरुषजात तेवढीच राज्य-यंत्र हांकण्यास लायक मतदानाचा नेहमीं दुरुपयोगच झालेला दिसतो. विशेषतः त्यामुळें देशांत दुफळी माजते. त्यांतल्यात्यांत तो अधिकार स्त्रियांना देणें म्हणजे पोराच्या हातीं कोलीत देण्यासारखें आहे. स्त्रियाना मतदानाचा हक्क मुळींच असूं नये. चूल व मूल हें स्त्रियांचें खरें कार्यक्षेत्र. स्वतःचें सौंदर्यरक्षण हें त्यांचें नित्य कर्तव्य. लालित्याच्या अंगणांत नाचून बागडून पुरुष वर्गाची घटकाभर करमणूक करावी आणि सुदृढ प्रजोत्पत्तीच्या राष्ट्रकार्यांत निमग्न असावें यापेक्षां अधिक

स्वातंत्र्य त्यांना निसर्गानें दिलेलें नाहीं. तें एखाद्या राष्ट्रानें देणें म्हणजे आत्मघात करण्यासारखें आहे.

## प्रशियन वाघिणीचें दूध

तर्कशास्त्राचा खून पाडून केलेलें वरील रोझेनबर्गचें विवेचन विचारवंत माणसांस खचित स्तंभित करील. जर्मनीच्या आसुरी वृत्तीच्या पार्श्वभूमीवर यायोगें चांगला प्रकाश पडतो. गाढ अज्ञानाच्या अतिरेकावर आधारलेल्या राक्षसी, रानटी व निखालस कठोर अशा रोझेनबर्गच्या अपूर्व तर्कशास्त्राचा कोणीहि शतशः धिक्कारच करील. हेंच तत्त्वज्ञान जर्मनी आज उराशीं कवटाळून बसला आहे. जणूं तें अपुरें वाटलें म्हणूनच कीं काय ती मात्रा जुन्या प्रशियन वाघिणीच्या दुधांत उगाळून आजच्या जर्मन लोकांना देण्यांत आली आहे. रोझेनबर्गच्या तत्त्वज्ञानाची जुन्या प्रशियन नीतितत्त्वाशीं सांगड घातली कीं त्यापासून कोणता जळजळीत पदार्थ निर्माण होतो हें वाचकांनीं आपल्या मनाशीं ठरवावें. युद्ध म्हणजे व्यापार, त्यामध्यें कोणीं कसलीहि फसवेगिरी करावी. फसवेगिरीस संभावित भाषेंत मुत्सद्देगिरी असें म्हणतात. फ्रान्सची कटकट कायमची भागविण्यास तो देश युरोपच्या नकाशांतून पुसला पाहिजे. हॉलंड, बेलजियम सारख्या छोटया राष्ट्रांना स्वतंत्रावस्थेंत जगण्याचा मुळीं हक्कच नाहीं. ब्रिटिशापासून जगाचें स्वामित्व हिसकावून आपलें अभूतपूर्व साम्राज्य स्थापिलें पाहिजे इत्यादि प्रशियन तत्त्वज्ञानाचे मासले म्हणून सांगतां येतील.

## सुईच्या नाकांतून उंट

वरील दोहोंपासून हिटलरनें आपल्या कुटिल नीतितत्त्वांचा कडुचिराईताचा काढा काढला आहे. लोकसत्ताक राजवटीवर त्यानें निर्घृण हल्ला चढविला. लोकसत्ताक व्यवस्थेंतील कायदेमंडळ हे मेंदू नसलेल्या मेंढयांचें संमेलन. त्यांतील बहुमत म्हणजे मूर्खांचा कळप. तेथें नेहमीं जबाबदारीचा अभाव असल्यामुळें ती राजवट दुर्बल, नादान व मूर्ख असते. राज्ययंत्र हांकावयाला नेहमीं नियोजक नेता हवा असतो. ज्याप्रमाणें शंभर भेकड एका शूर माणसाची बरोबरी करूं शकत नाहींत त्याप्रमाणें शंभर बिनडोक्याचीं माणसें एका शहाण्या व बुद्धिवान माणसाची बरोबरी करूं शकत नाहींत. सुईच्या नाकांतून उंट जाणें जितकें अशक्य तितकेंच निवडणुकींतून खरा पुढारी बाहेर येणें हें अशक्य. खऱ्या जन्मजात पुढाऱ्यास निवडणुकीचा तमाशा लागत नाहीं. तो पुढारी परमेश्वरी

असल्यामुळें तो जन्मावा लागतो. लोकांची मनधरणी करणारा का पुढारी बनत असतो ? उलट लोकांनीं त्याची मनधरणी सतत केली पाहिजे. बहुजन-समाजास अलौकिक वक्तृत्ववल्लीनें मन मुग्ध करणाराच राज्य हांकण्यास खरा लायक असतो इत्यादि आवडतीं मतें हिटलरनें आत्मचरित्रांत जर्मन लोकांना कथन केलीं आहेत. या दृष्टीनें चालू युगांत हिटलर हा एक अपूर्व वक्ता आहे हें निर्विवाद आहे. शब्दसामर्थ्याच्या जादुगिरीनें लोकांना मोहित करणारा त्याच्या-सारखा नेता आज अलम् दुनियेंत दुसरा कोणी नाहीं.

जर्मन प्रतिभा आणि प्रतिष्ठा यांच्या बुडाशीं मार्क्सवादानें सुरुंग लावला. मजुरांच्या असतोषाचा फायदा घेऊन आपल्या पोळीवर भरपूर तूप भाई लोकांनीं ओढून घेतलें. कम्युनिझमचा नाश झाल्याविना युरोप सुखासमाधानानें जगूं शकणार नाहीं. कम्युनिस्टांशीं संगनमत केल्याचा दोषारोप ज्यूंवर त्यानें तर केलाच आणि गेल्या महायुद्धांत जर्मनीच्या पाठींत खंजीर खुपसून खून केल्याचा दुसरा आरोपहि त्यांच्यावर त्यानें केला. जिवंत माणसाच्या कातड्याचे तुकडे चघळणारे उंदीर म्हणून ज्यूंना हिटलरनें हिणविलें.

## जर्मन नागरिकाचें स्थान

शास्त्र, कला, वाङ्मय संस्कृति इत्यादि उच्च दर्जाच्या गोष्टींचा मक्ता फक्त एकट्या आर्यजातीकडे आहे असें त्यानें ठरविलें. जर्मन राष्ट्रीयत्व ही एक बाष्कळ बोलण्यांतील फुशारकीची गोष्ट नसून रक्ताच्या पावित्र्याची खूण आहे. युरोपांत विखुरलेले जर्मन अवशेष एकत्रित करून एकजिनसी व एकवंशीय साम्राज्य स्थापणें हें त्या जातीचें पवित्र कर्तव्य नाहीं काय असा हिटलरनें जर्मनीला सवाल टाकला. आणि सर्व जर्मन जनतेनें हात वर करून होकारार्थी रणगर्जना ठोकली.

जर्मनींत लोकांचे जे तीन वर्ग पाडण्यांत आले ते नागरिक, प्रजा व परदेशी होत. नागरिकास जन्म, रक्त व वंश यांचा पुरावा सरकारांत हजर करावा लागतो. जर्मन नागरिक ही संज्ञा इतर राष्ट्रांतील राजापेक्षां अधिक भाग्याची व मोलाची आहे असें हिटलर म्हणतो. लष्करी शिक्षण, सैन्यांतील सक्तीची नोकरी, सहा महिने मोफत सक्तीची हमाली इत्यादि कार्यक्रमांतून गेल्यावर मग जर्मन नागरिकांस लग्नाचा परवाना मिळतो. नागरिकांशिवाय बाकी सर्व लोक संरक्षित प्रजा या सदरांत मोडते.

प्रत्येक गोष्टीचा न्यायान्याय अखेर सामर्थ्याच्या कसोटीनें ठरतो. म्हणून आपले

न्याय्य हक्क व आकांक्षा शक्तीच्या बळावर जगाला पटविल्या पाहिजेत असें जर्मनीला वाटतें. " आम्ही आमच्या गरीब देशाचें संरक्षणकर्ते पोलीस नसून उद्धारकर्ते लढवय्ये आहोंत" ही जर्मन लोकांची घोषणा हेंच दर्शवीत नाहीं काय? याचसाठीं आज हिटलरच्या इच्छाशक्तींत जर्मन राष्ट्राचा संपूर्ण कायदा समाविष्ट झालेला आहे हे गोअरिंगचे बिनदिक्कत उद्गार आज वस्तुस्थितिनिदर्शक नाहींत काय?

## प्रशियन राजनीतींचें भूत

कैसर, हिटलर सारखे अनेक सुलतान निर्माण होवोत आणि कालाच्या उदरांत गडप होवोत. जोंवर कुटिल प्रशियन राजनीतींचें जागतें भूत जर्मनीस घेरणार तोंवर जर्मनी जगभर धिंगाणा घालणार. जगांत शांतता प्रस्थापित होणें शक्य नाहीं आणि लोकांची द्वेष व छळ यांतून सुटका होण्याची आशा नाहीं. प्रशिअन आसुरी राजनीतींचें परिणत स्वरूप उर्फ चालतेंबोलतें भूत म्हणजे हिटलर. ( Hitler is true Holy Ghost ) त्या राजनीतीविरुद्ध बंड पुकारणारे महात्मे उदय पावून जर्मनी जोंवर बदलूं शकत नाहींत तोंवर जर्मनीचा स्वभाव-धर्म पालटणें शक्य नाहीं. जर्मन मनुष्यजात्या आपल्या राष्ट्राच्या उज्ज्वल स्वप्नात रंगणारा आहे. जर्मन रक्तांतच युद्धाची खरी खुमखुमी आहे. युयुत्सू वृत्तीमुळें जर्मनी फार काळ स्वस्थ बसत नाहीं. हुकूम मानण्याची प्रवृत्ति जर्मन माणसांच्या हाडांत आहे. यामुळें मतनोंदणीसारख्या मूलभूत हक्क बजावणीपेक्षां, खाकी पोषाक चढवून सैनिक बनून वरिष्ठांना लष्करी सलामी देण्यांत कृतकृत्यता मानणारा प्राणी जर्मन आहे. शिस्त पाळावी. म्हणून कनिष्ठांना गोळ्या घालणें ही त्यांची सोपी व सौम्य शिक्षा. म्हणूनच हिटलर म्हणूं शकतो कीं " मला लोकांना गोळी घालण्याचें व्यसनच आहे मुळीं. चुकून एखादे वेळेस निरपराधी माणसांना त्या गोळ्या घातल्या गेल्या, तरी त्या अचूक घातल्याचा आनंद ( राक्षसी ) मी लुटतों." निरपराध्यांना अचूक गोळ्या घालणारा व तसें उघड उघड बोलणारा आज एका प्रचंड व प्रबल राष्ट्राचा राज्यकर्ता म्हणून राहूं शकतो, यावरूनसुद्धां जर्मन स्वभा-वाची खरी परीक्षा करतां येईल.

## आधुनिक अश्वत्थामा

लोकांचें व्यक्तिस्वातंत्र्य हिरावून घेऊन त्यानें लोकांना गुलाम बनविलें. जर्मनींत कोणाचेंही जीवित व मालमत्ता सुरक्षित नाहीं. त्यावर केव्हां धाड येईल हें

सांगतां येणार नाहीं. त्याबद्दल वेळप्रसंग पाहून स्वतःची जीभ आवरून संयमन करण्याची अपूर्व वृत्ति जर्मन लोकांजवळ आहे म्हणून आज डांगोरा पिटला जात आहे. चौकशीविना अनेक तरुण कायमचे तुरुंगांत डांबलेले आहेत. किती तरी लोक अनन्वित छळाची करुण कहाणी अंगाला आक्रोश करून सांगत आहेत. अनेकांना फंदफितुरीच्या आरोपावरून राजरोस गोळ्या घातल्या जात आहेत. या तडाख्यांतून प्रत्यक्ष हिटलरच्या मित्राचीसुद्धां सुटका नाहीं. हिटलरच्या उत्कर्षास अहोरात्र झटणाऱ्या कॅ. होमला जर्मन पार्लमेंट उडवून देण्याच्या कटांत सामील झाल्याच्या संशयावरून पकडण्यांत आलें. पण तो आरोप पुराव्यानें शाबीत होईना. म्हणून नाझी विरुद्ध कट केल्याच्या संशयावरून एका रात्रींत हिटलरनें बाराशें लोकांना गोळ्या घातल्या त्यांत त्यानें ऱ्होमचाहि बळी घेतला. भारतीय महायुद्धानंतर एका रात्रींत अश्वत्थाम्यानें खून चढून जशी भयंकर हत्या केली व अक्राळ विक्राळ स्वरूप प्रगट केलें तसेंच हिटलरनें केलें. आपला दरारा बसावा म्हणून ही स्मशानशांतता त्यानें निर्माण केली. ऱ्होमच्या मृत्यूमुळें लोकमत प्रक्षुब्ध होईल म्हणून त्याच्याविरुद्ध अनैसर्गिक संभोगाचे अनेक आरोप जाहीर करण्यांत आले. ज्या गृहस्थाशीं निदान १०।१५ वर्षें जीवश्चकंठश्च स्नेह ठेवण्यास हिटलरला कांहींहि वाटलें नाहीं त्याचीच त्याच्या मरणानंतर बदनामी करण्यासहि तो कचरला नाहीं.

या तत्त्वानीं हिटलरनें यक्षिणीच्या कांडी फिरवून जर्मन लोकांना भारून टाकलें. महायुद्धाचा आग्यावेताळ उठवून प्रचंड नरमेध यज्ञ चालवितां आला. गेल्या पांच वर्षांत त्यानें ऑस्ट्रिया, झेकोस्लाव्हिया, पोलंड, नॉर्वे, डेन्मार्क, हॉलंड बेलजियम, लक्झेंबर्ग इतक्या छोट्या राष्ट्रांवर अन्यायानें आक्रमण करून ते प्रदेश जर्मन साम्राज्याच्या घशांत घातले. एवढेंच नव्हे तर फ्रान्ससारख्या भूमी-वरील जबरदस्त शक्तीस नामोहरम करून आज जगांत हिटलर आपल्या साम-र्थ्याची घमेंड व फुशारकी मारीत आहे.

पण हिटलरची गांठ आतां सामर्थ्यवान ग्रेट ब्रिटनशीं आहे. हाच सामना खरा निर्णायक ठरणार. जोंपर्यंत इंग्लंडची जबरदस्त शक्तीचा शह कायम आहे, तोंपर्यंत हिटलरचें साम्राज्य सुरक्षित नाहीं. पत्त्याच्या बंगल्याप्रमाणें तें केव्हां कोसळेल तें समजावयाचेंसुद्धां नाहीं.

[ ८ ]

# राष्ट्रीयत्वाचें थैमान

## प्रयोग शाळेंतील वनस्पतींचे नमुने

## राष्ट्र आणि राज्य

आधुनिक राष्ट्र शास्त्रीय परिमाणाप्रमाणें एक ठराविक माप नव्हे किंवा एकादें ऐतिहासिक फळहि नव्हे. प्रयोगशाळेंत वनस्पतींचे नमुने वेगवेगळ्या कांचेच्या नळ्यांतून ठेवतात त्याप्रमाणें भिन्नभिन्न राष्ट्रें परमेश्वरानें निर्माण केलेलीं नाहींत. ' आधुनिक राष्ट्र ' या कल्पनेच्या बुडाशीं लोकांच्या ठिकाणीं वसत असलेली अंतिम सत्ता उर्फ सार्वभौमत्व आहे हें आपणास दिसलें. यानंतर राष्ट्र म्हणजे काय ? अशी विचारणा केली तर उत्तर देण्यास मोठी पंचाईत येईल. राज्यशास्त्रज्ञांनीं राष्ट्र आणि देश यांमधील फरकाचे कापसाचे धागे काढून दाखविले आहेत ते असे. एका ठराविक प्रदेशांत कुटुंबाप्रमाणें नित्य राहणाऱ्या व्यक्तिसमूहांचा संघ म्हणजे देश. देशाहून राष्ट्राची कल्पना बरीचशी मर्यादित व संकुचित स्वरूपाची आहे. राष्ट्रीयत्वाच्या नात्यांनीं जखडलेल्या व्यक्तिसमूहास राष्ट्र असें म्हणतात. आतां प्रश्न असा कीं राष्ट्रीयत्वाची व्याख्या काय ? एका व्याख्येच्या संकटांतून सुटावें तर दुसऱ्या व्याख्येचें संकट पुढें दत्त म्हणून उभें !

डॉ. कूच्छनें राष्ट्रीयत्वाची व्याख्या बनविण्याचा थोडाबहुत प्रयत्न केला आहे, तो असा " एक मनुष्यसमुदाय एका होडींतून बसून पाण्यांतून चालला आहे अशी कल्पना घटकाभर करा. त्या होडींत असेतोंपर्यंत प्रत्येक जण आपल्या बरोबर सर्वांच्या नशिबांचा मुखत्यार व भागीदार अनुक्रमें असतो. समान नशिबाचे भागीदार ते असले तरी त्यांना स्वतःच्या नशिबाबद्दल पूर्ण सत्ता आहे. अशा वेळीं एका विशिष्ट भावनेनें निश्चयानें आणि सावधपणानें प्रत्येक जण वागतो. राष्ट्रनौकेंत बसणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस अशी भावना, निश्चय व सावधपणा बाळगावा लागतो, यालाच राष्ट्रीयत्व म्हणतात. थोडक्यांत सामुदायिक आयुष्यक्रम घालवूं इच्छिणाऱ्या समान नाशिबाच्या लोकांचा तो एक दृढ निश्चय. " * राष्ट्र नेहमीं विस्तार पावून उत्क्रांतीच्या योगें मोठा देश होण्याचा प्रयत्न करतें आणि ज्या देशामध्यें राष्ट्राची पूर्णावस्था आढळते त्यास आपण उत्तम राज्य असें म्हणतो. थोडक्यांत एका देशामध्यें अनेक राष्ट्रें व राष्ट्रीयत्वें यांचा समावेश होऊं शकतो. ( The nation is a State in a process of growth, the State is a nation that has realized itself.—Vergene.)

## जर्मन राष्ट्रियत्वाचा जनक

आधुनिक राष्ट्रीयत्वाची कल्पना थोडी स्पष्ट होण्यासाठीं आपण त्याचा मागला इतिहास जरासा चाळूं. ग्रीक व रोमन साम्राज्यांच्या वेळीं एकाद्या शहरास राष्ट्राचें स्वरूप असे ( City State ). त्याचेंच मोठें स्वरूप म्हणजे एकदम साम्राज्य. शहर आणि साम्राज्य या दोघांना जोडणारा राष्ट्रीयत्वाचा दुवा दरम्यान नव्हता. १८ व्या शतकापर्यंत लोक राजाचे एकनिष्ठ उपासक असल्यामुळें राष्ट्रीयत्वाची कल्पना उगम पावूं शकली नाहीं. राजसत्ता आपल्या पायानें लोकांच्याकडे चालून येऊं लागली त्यावेळेस जॅकोबीन्सचा अनुयायी फिट्शे यानें राष्ट्रीयत्वाच्या बारीक धाग्याचा शोध प्रथम लावला. " व्यक्तीला समाजाव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व नाहीं, समाजांत त्याचा पुरा लोप होतो. समाजानें प्रत्येकाच्या व्यक्तिमत्वास मान

---

* Nationalism denotes the resolve of a group of human beings to share their fortunes and to exercises exclusive control over their actions, when such a conseious determination exists, there should be a state and there will be no abiding place, until there is a State.

दिला पाहिजे " अशा सिद्धांतापासून त्यानें प्रारंभ करून " वरील व्यक्तिसमूहाच्या राष्ट्रानें आपल्या उत्कृष्ट गुणांचा प्रसार करून अखिल मानवजातीस सुसंस्कृत केलें पाहिजे " अशी त्यानें शिकवण दिली. १९१४ च्या महायुद्धानंतर फिट्शेच्या तत्त्वज्ञानाचा जर्मनींत भलताच प्रसार झाला. मिचेव्हिलीचे " कुटिल राजनीति, राष्ट्राचें व्यक्तीवरील प्रभुत्व, कायदेमंडळ व न्यायखातें यांवर सत्ताधाऱ्याचें आक्रमण, व्यक्तीला राष्ट्रसेवेची दीक्षा, स्वयंपूर्णता " इत्यादि सर्व तत्त्वें फिट्शेच्या तत्त्वज्ञानांत सांपडतील. फक्त त्यात अभिनव जर्मन जात व रक्त यांच्या उत्कट अभिमानाचे सत्त्व तेवढें नाहीं.

## कॅव्हूर आणि बिस्मार्क

राष्ट्रीयत्वाच्या विचारात महत्त्वाची भर घालणारा दुसरा महाभाग मॅझिनी होय. देशातील सर्व व्यक्तिमात्राचें आत्मिक ऐक्य साधण्याची दीक्षा त्यानें राष्ट्रास दिली. फीट्शेच्या उद्दीपक विचारसरणीपेक्षां मॅझिनीची विचारसरणी वेगळ्या स्वरूपाची आहे. प्रत्येक मनुष्यानें आपल्या मातृभूमीच्या अभिमानाबरोबर सर्व जग व मानवजात यांच्या हिताहिताचा विचार केला पाहिजे या अध्यात्मिक विचारप्रणालीनें मॅझिनी मार्गे पडला. नाहीं तर आज इटलींत त्याचा उदो उदो झालेला दिसला असता. याचमुळें मुसोलिनीला मॅझिनीशीं आपलें नातें जोडतां येईना. इटलींत कॅव्हूर आणि जर्मनींत बिस्मार्क यांनीं या राष्ट्रीयत्वास अनिष्ट वळण दिलें.

राष्ट्र व देश हे दोन्ही एकरूप होण्याकडे नैसर्गिक प्रवृत्ति आहे अशी प्रस्तावना करून, फिट्शेनें राष्ट्रीयत्वाचा सुंदर समाचार घेतला. चालू प्रकरणाच्या आरंभीं उद्धृत केलली प्रयोगशाळेतील वनस्पतींची उपमा याचीच आहे. भावी इतिहासात राष्ट्रीयत्वाची कल्पना कशी बदलेल हें आजच्या घटकेस कोणींहि सांगू शकणार नाहीं. कारण राष्ट्रीयत्व ही गोष्टच मुळांत ठराविक व नित्य नाहीं. केवळ एक जात, रक्त आणि भाषा यांच्या उत्कट अभिमानानें मातृभूमीचा जितका उत्कर्ष साधता येईल त्यापेक्षा सर्व प्रकारच्या जाती, रक्त आणि भाषा यांचे हितसंबंध शाबूत राखणाऱ्या देशाची भरभराट किती तरी पटीनें अधिक होईल.

## मॅझिनीचें सुखस्वप्न

१९१४ पूर्वी प्रशियन साम्राज्यानें जर्मन राष्ट्राचें ऐक्य व पुनर्घटना साधण्याचे प्रयत्न केले. हिटलरनें तर राष्ट्रीयत्वाची कल्पना, निव्वळ जर्मन रक्त व भूमि

( Blood and Soil ) यांच्या सांगडींत बसवली. रौद्ररूप धारण केलेल्या राष्ट्रीयत्वाच्या थैमानांमुळें, भागीदारीच्या तत्त्वावर अखिल जगाचें संयुक्त स्वरूप हें मॅझिनीचें सुखस्वप्न अखेर स्वप्नच ठरलें. या बाबतींत ॲक्टनचे उद्गार मोठे मननीय आहेत. तो म्हणतो कीं, " जर्मनींत आणि इटलींत राष्ट्रीयत्वाची प्रचंड ज्योत भडकली; मिचेव्हिलीच्या कुटिल राजनीतीचीं दुष्ट फळें आज रासरोस सुष्ट ठरलीं. मानवजात व तिची संस्कृति यांवर अखेर निसर्गानें विजय मिळविला. सर्व देशांचें ऐक्य व संघटना यांऐवजीं त्यांच्यामध्यें जगाच्या अंतापर्यंत न संपणारी झुंज हीच साऱ्या इतिहासाची शिकवण काय ? हेंच साऱ्या इतिहासाचें सार व सौंदर्य काय ? जगांमध्यें प्रत्येक गोष्टीचा न्याय अखेर शक्तीच्या सामन्यानेंच लावावयाचा काय ? जगांतील कोणतींही नैतिक बंधनें राष्ट्रीयत्वावर नाहींत असें मानावयाचें काय ? नागड्या शक्तीला इतकें मोकाट सोडल्यावर, त्याच्या पाशवी अत्याचारानें जग त्रस्त झालें तर त्यांत काय आश्चर्य ? "

ऑस्ट्रिया—हंगेरी साम्राज्याच्या शकलापासून गेल्या महायुद्धानंतर युरोपांत राष्ट्रांची खिचडी झाली. यासाठीं युरोपांतील प्रत्येक जातीस आपली बुरसलेली संस्कृति घांसून झकपक करावी लागली. आपली जात, रूढी, भाषा इत्यादींच्या पुनरुद्धारास राष्ट्र निर्माण करण्याची आकांक्षा फलद्रूप होण्याचा समय आला. यामुळें युरोपांत मेणाच्या बाहुल्याप्रमाणें मऊ व लिबलिबीत राष्ट्रमालिका निर्माण झाली. म्हणूनच गेल्या महायुद्धानंतरची युरोपची पुनर्रचना अवघ्या वीस वर्षांत ढासळली. विशेषत: बाल्टिक, स्कँडिनेव्हिअन आणि बाल्कन राष्ट्रांच्या उतरंड्या जमीनदोस्त होण्याच्या मार्गास लागल्या.

## सजीव राष्ट्र

देशभक्ति शिकविण्याची शाळा म्हणजे इतिहास. इतिहास, वंश, भाषा, रूढी, व संस्कृति या पांच खांबावर आधुनिक राष्ट्रकल्पना उभारलेली आढळते. मानवजातीच्या दृष्टीनें अनुपयुक्त गोष्टींना प्राधान्य मिळाल्यामुळें राष्ट्रवादास उग्र व क्रांतिकारक स्वरूप आलें. राष्ट्राचें सामर्थ्य, वैभव, इभ्रत आणि दरारा या चार गोष्टींतच लोकांचें खरें हित आहे या खोट्या कल्पनांचा प्रसार झाला. अनियंत्रितपणा आणि रानटी वर्तन एकटा राजाच करूं शकतो असें नाहीं. राष्ट्रीयत्वानें भारलेले व स्वत:ला सार्वभौम समजणारे उन्मत्त व बेफाम लोकहि तसे वागूं शकतात याचा दाखला पटला. राष्ट्राच्या नांवावर विकण्याचा आणि राष्ट्रांतील

सर्व राजकीय व आर्थिक सत्ता वापरण्याचा हुकूमशहांचा कावा यामुळें साधला.

लोकशाहीप्रधान देशांत व्यक्तिमत्त्वाच्या विकासास मुबलक जागा दिली जाते. हुकूमशाहींत व्यक्तिमत्त्वास राष्ट्रोपयोगी एक निर्जीव वस्तू यापेक्षां त्याला अधिक महत्त्व नाहीं. ब्लंट्शी म्हणतो, "राष्ट्रें इतर जीव पिंडाप्रमाणें असल्यामुळें, ती निसर्गाच्या नियमापासून अलिप्त नाहींत. राष्ट्राचा इतिहास जीवमानाच्या इतिहासाप्रमाणें झगडयांतून विकास पावतो." हे ब्लंट्शेचे उद्गार आज खरे ठरले. थोडक्यांत त्याच्या मतें राज्याला राष्ट्र ही संज्ञा प्राप्त होण्यास लोकांत जळजळीत राष्ट्रीयत्वाची भावना जागृत झाली पाहिजे. राष्ट्रांना सजीव राज्याचें स्वरूप प्राप्त होण्यास त्यांनीं आत्मा, अहंकार, भावना आणि स्वभाव हीं धारण केलीं पाहिजेत. राष्ट्रांशिवाय इतर राज्यें हीं निर्जीव व कृत्रिम होत.

मानव जातीचें हित आणि व्यक्तीची सद्सद्विवेकबुद्धि हा नीतीचा खरा पाया. या नीतितत्त्वांवर आधुनिक राष्ट्राची उभारणी झालेली नाहीं हें आपण पाहिलें. नीतीच्याऐवजीं शास्त्रें हाच नवयुगाचा धर्म ठरला. निसर्गाचा नियम राष्ट्रांना लावल्यामुळें नीतीची उचलबांगडी झाली.

रक्तामांसानें न्हालेल्या निसर्गाचा प्रताप दिसावा हें उचितच आहे. तसेंच पाहिलें तर राष्ट्र ही बरीचशी ऐतिहासिक घटना आहे. त्यामध्यें काल्पनिकहि थोडासा भाग आहे. अशा घटकास जीवपिंडाचे आचारविचार लावणें चुकीचें आहे.

## जंगलांतील न्याय

हिटलरनें जर्मन लोकांना आर्य जात व रक्त यांचे जगांतील एकमेव अवशेष ठरवून त्यांना एकच एक अमूल्य मानव ठेवा म्हणून गौरविलें. सर्व सद्गुणांचा मक्ता त्यानीं आपल्या हातांनीं आपल्या जातीकडे घेतला. जर्मन जातीची आणि रक्ताची भेसळ युरोपांत इतकी झाली आहे कीं त्यांतून जर्मन रक्ताचे शुद्ध अवशेष एका बाजूस काढणें मानवी श्रमांच्या बाहेरचें काम आहे. ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. कोणतेहि जातीयत्वाचे सिद्धांत शास्त्रीय निकषावर घांसले कीं त्यांतील पितळ तात्काळ बाहेर येते. पण जातीयत्वाला शास्त्रीय सत्याची कसोटी केव्हांहि लावावयाची नाहीं असा त्यांचा अट्टाहास असतो.

राष्ट्रांना जीवपिंडाची उपमा दिल्यामुळें आज बेकायदा रानटी अवस्थेचा मासला मनुष्याच्या नशिबीं आला. जंगलांतील, वाघ, सिंह, अस्वलें, लांडगे इत्यादि हिंस्र जनावरांत ज्याप्रमाणें एकोपा नसतो, नीति नसते आणि स्वार्थ-

लोलुपता केवढी भरपूर असते त्याप्रमाणें नीतिनियम झुगारणारीं राष्ट्रें आज रानटी व बेफाम झालीं.

हिटलर मुसोलिनींच्या फॅसिस्ट राष्ट्रविषयक कल्पना पुढीलप्रमाणें आहेत. मुसोलिनी म्हणतो, "राष्ट्र सर्वगामी व सर्वव्यापी आहे. त्याच्या कक्षेबाहेर कोणतीच ऐहिक वा पारमार्थिक वस्तू नाहीं. राष्ट्रोद्धारक फॅसिझम सर्वंकष व सर्वांगपूर्ण आहे. फॅसिस्ट राष्ट्र सर्व व्यक्तींचें केवळ ऐक्य व संघटना करून थांबत नाहीं तर तें सर्वांच्या जीवितांचें साफल्य, विकास, उन्नति व इतिकर्तव्यता हीं साधते." नाझीझमचा धर्मगुरू हिटलर म्हणतो, "मानव जातीचें आरोग्य कायम राखून प्रतिकाराचें सामर्थ्य वाढण्यास तिच्या जीवितांत रस्सिखेंच सारखी होत रहाणें अत्यंत जरूर आहे. किंबहुना प्रगतीस लागणारी ती एक आवश्यक बाब आहे." *

## सत्ता आणि संपत्ति

कोणत्याहि प्रकारच्या सत्तेला आपल्या शक्तीची घमेंड असावी व तिचें प्रदर्शन व्हावें हा तिचा स्वभाव आहे. समाजाची घडी विसकटूं नये अगर कर्तव्यदक्षतेंत प्रमाद घडूं नये म्हणून सत्ताधारी कांहींकांहीं गोष्टी तांतडीनें अमलांत आणतो. व्यवहारांत जें पैशास स्थान, तेंच नेमकें शक्तीला समाजजीवनांत स्थान. तसेंच पाहिलें तर संपत्तीप्रमाणें शक्ति, अकर्मक ( Neutral ) व निर्भेळ आहे. तिचा चांगुलपणा वा वाईटपणा तिचा उपयोग करणाराच्या बुद्धीवर अवलंबून राहतो. एवढें मात्र खरें कीं पैशाप्रमाणें शक्तीचा दुरुपयोग करण्याची अभिलाषा उत्पन्न करण्याचा तिचा स्वभावधर्म आहे. या अभिलाषानेंच आजवर चांगुलपणा मिळवणाऱ्या राजसत्ता बिघडल्या आणि मानवी शापानें दग्ध झाल्या.

---

* The Fascist conception of the State is all-embracing; outside it no human or spiritual values can exist, much less have value. Thus understood, Fascism is totalitarian and the Fascist State—a synthesis and unit inclusive of all values—interprets, develops, and potentiates the whole life of the people.—Mussolini.

Strife is always the means of developing the health and power of resistence of the species and is consequently a primary condition of progress.—Hitler.

## ब्रह्मा, विष्णु, महेशाची त्रिमूर्ती.

हा नित्याचा प्रसंग टळावा म्हणून सत्ताधाऱ्यांवर पूर्णपणें विसंबून असावयाचें नाहीं असें मनुष्यानें अनुभवानें ठरविलें. यांत्रिक युगात जशी श्रमविभागणी उपयुक्त झाली तसेंच सत्तेमध्यें ब्रह्मा, विष्णु, महेश या त्रिमूर्तीप्रमाणें कायदे करणें, अम्मलबजावणी करणे व न्यायनिवाडा देणें असे तीन विभाग पाडून त्यांची एकमेकापासून फारकत करण्यांत आली. वरील देवादिकाच्या त्रिमूर्तीमध्यें द्वेषाच्या भाडणाच्या कथा पुराणांत प्रसिद्ध आहेत. तसें या अधिकारविभागणीच्या बाबतींतहि मानलें जातें. सत्तेच्या या तीन विभागांच्या समन्वयाशिवाय राजशकट हालूं शकत नाहीं हें जितकें खरें तितकेंच या तिघांना एकमेकांपासून दूर ठेवल्यावांचून मनुष्यप्राणी सुरक्षित राहूं शकत नाहीं.

राज्यसत्तेची केवळ विभागणी करून मनुष्यप्राणी थांबला नाहीं. राज्यसत्तेच्या निरंकुशतेवर त्यानें बंधनें लादलीं. प्रचंड सत्ताधारी गजेंद्र माजानें धुंद होऊन आपल्यावर हल्ला करूं नये म्हणून त्याच्या पायांत खोडा अडकवितात त्याचप्रमाणें अनुल्लंघनीय बंधनें प्रत्येक लिखित वा अलिखित राज्यघटनेंत मुद्दाम ठेवलेलीं असतात. प्रसंगविशेषीं त्या खोड्यास न जुमानता तो गजेंद्र अविचारानें वागेल म्हणून त्याच्या गंडस्थळावर मारा करण्यासाठीं मनुष्य आपल्या हातीं अंकुश ठेवतो. अगदीं याचप्रमाणे मनुष्यानें आपले मूलभूत हक्क आपल्या हातीं राज्यघटनेंत शाबूत ठेवले आहेत. सत्तेच्या पायांत खोडा अडकविणें व अंकुश मिळविणें यासाठीं मनुष्यानें अनेक शतकें राजशाहीशीं झगडून अपूर्व स्वार्थत्याग केला आहे. त्यापायीं अनेक पिढ्यानीं आपलें रक्त सांडलें आहे. काळ असा विचित्र व उलटा आला कीं वरील सर्व बंधनें चुटकीसरशीं झुगारून देणारे सत्ताधारी सुलतान अवतरले. त्यांचें राजकीय स्वरूप आपणांस पहावयाचें आहे.

## हुकूमशाहींत कायद्याचा अर्थ

प्रातिनिधिक राज्यव्यवस्था पक्ष, विशिष्ट तत्त्वें, व पुढारी या तीन गोष्टींवर चालते. बहुमताच्या जोरावर कायदा करणें व अंमलबजावणी करणें हीं दोन खातीं पक्ष हातीं घेतो. हाच कित्ता पुढें गिरवून हुकूमशहानीं कायदा करणाऱ्या संस्थेस आपली बटीक बनविली. देशांत कायद्याचें राज्य असावें म्हणून न्यायखातें स्वतंत्र राखलें जाई कांहींशीं पूर्वानुभवाच्या रोखानें कायदा वाट चाले पण

हिटलरच्या जर्मनीनें आपल्या रक्तांकितवंशीय दृष्टीनें त्याकडे पाहण्यास सुरवात केली. कायद्यांच्या हेतूंत क्रांति झाल्यामुळें त्यावरील धर्म, नीति, रूढी, इत्यादि सर्व बंधनें जर्मनीला झुगारून देतां आलीं. जर्मन रक्ताच्या व जातीच्या शाश्वत अस्तित्वाचा विचार हा जर्मनींत कायद्याचा प्रधान हेतू मानला जातो.

रशियन राज्यक्रांतींत कायदा व न्याय हीं भांडवलवाल्यांचीं हत्यारें असें म्हणून हिसकावून घेण्यांत आलीं. राज्यकर्त्यांचे हितसंबंध सुरक्षित राखणारे व सामाजिक संबंध शाबूत ठेवणारे नियम असा रशियांतील कायद्याचा अर्थ आहे. मात्र त्या नियमांना बहुजनसमाजाच्या संयुक्त इच्छेचा आधार असणें जरूर आहे. कायद्याच्या मृत शरीराची चिरफाड करून त्यांना फक्त राज्यकर्त्यांचें हित पाहण्याचें स्वार्थी कार्य देण्यांत आलें. हें झालें रशियांत. इटलींतहि कायद्याचा विपरीत अर्थ केला गेला आहे. " न्यायाचा खरा भोक्ता निव्वळ न्यायान्यायाची निवडानिवड करणारा उपयोगी नाहीं. आजच्या घटकेस न्याय्य वाटणारी बाब उद्यां अन्यायाची होऊं शकते. न्यायान्यायांत व्यर्थ डोकें शिणविण्यापेक्षां उद्यांच्या संग्रामाकरतां सज्ज राहणें अधिक श्रेयस्कर नाहीं काय ? " असा फॅसिस्टांचा सवाल आहे. जर्मनींत क्रांतिकारकांचा बींमोड करावयाला पाहिजे या सबबीवर गुप्त कोर्टें स्थापून वाटेल त्या सजा फर्मावण्याचे अधिकार त्यांना देण्यांत आले आहेत. जर्मनींत नाझी पक्ष सत्तारूढ झाल्यावर नाझींच्या हितसंबंधांना पोषक असे अनेक वटहुकूम निघाले. एवढेंच नव्हे, तर प्रचलित कायद्यांचा अर्थसुद्धां त्यांच्या मूळ हेतूप्रमाणें न करतां, नाझी तत्त्वज्ञानाशीं सुसंगत व जुळेल अशा रीतीनें अर्थ काढण्याचें फर्मान हिटलरनें काढलें. या सर्वांचें रहस्य सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. त्यांच्या मतें फॅसिस्ट सरकार प्रत्यक्ष देवाप्रमाणें आहे, व त्याची सत्ता अमर्यादित आहे. शरिरांतील एकादा रक्तबिंदु जसा वेगळा ठेवून चालणार नाहीं तसेंच व्यक्तीला राष्ट्राबाहेर अस्तित्वच नाहीं. राष्ट्रीय राजसत्ता प्रबळ ठेवणें हेंच साध्य व साधन. फॅसिस्ट सरकार कोणत्याहि एका व्यक्तीपेक्षा मोठें आहेच आहे पण तें सर्व लोकसमुदायापेक्षांहि मोठें आहे.

## अवतारी पुरुष-फ्यूरर आणि ड्यूचे

राज्याच्या दैनंदिन कारभाराचा गाडा हांकणें हें भारवाहकाचें कार्य हुकूमशहांचें मुख्य कर्तव्य नव्हे. समाजाची घडी विसकटली असता अवनत कालीं समाजाला तारण्यासाठीं अवतीर्ण झालेले ते अवतारी पुरुष होत अशी कल्पना फ्यूरर अगर

डयूचे या शब्दांमध्यें व्यक्त होते. समाजाच्या संकटकालीं पुढाऱ्याशिवाय त्याला दुसरा कोणी तारूं शकत नाहीं असा निर्वाळा मानसशास्त्रवेत्त्यांनीं दिला आहे. कार्लाईल म्हणतो, "देशातील विद्यमान मनुष्यांतील अजब कर्तृत्वसंपन्न मनुष्य शोधून काढा आणि त्याला उच्चासनाचा मान व सत्ता अर्पण करा; तुम्हांस उत्कृष्ट राज्यसंस्था व सुख मिळालेंच पाहिजे. मतें टाकण्याच्या पेट्या, पार्लमेंट-मधील तर्कशुद्ध वादविवाद व आवेशयुक्त वक्तृत्व, मतदान, घटनासमिति अगर अन्य कोणतीहि गोष्ट तुमची परिस्थिति सुधारूं शकणार नाहीं. मात्र वरील कर्तृत्त्वशाली इसम विश्वासू, न्यायी, व कनवाळू अंतःकरणाचा हवा. पण तो शोधायचा कसा ? शोधायचा नाहींच मुळीं ! अवतारी पुरुष शोधून का मिळत असतो ? तो जन्मावा लागतो !"

पार्लमेंटरी राज्यसंस्था ही अव्यक्तिक ( impersonal ) असते. तिचें खरें सामर्थ्य मनुष्याच्या भाविक आज्ञापालनांत असतें. मनुष्यांत रुजलेल्या या गुणांच्या जोरावर हुकूमशहा सत्तारूढ झाले आणि आपल्या पक्षाच्या व अखिल राष्ट्राच्या डोक्यावर मिरें वाटूं लागले.

## समाजवादाचे पहिले बोल

औद्योगिक क्रांतीनें जगामध्यें यांत्रिक सुधारणा झाल्या. त्यांचे सर्वात मोठे फायदे, वेळची व खर्चाची काटकसर आणि विस्तृत प्रमाणांवर उत्पादन हे होत. भांडवलवाल्याच्या कर्तृत्वास सर्व जग मोकळें झालें. श्रमजीवि वर्गच आपल्या रक्ताचें पाणी करीत असतां काटकसरीच्या नांवाखालीं भांडवलवाल्यांनीं त्यांची उपासमार केली. यांत्रिक सुधारणापूर्वी जगांत महायुद्धें थोडीं होत व तीं अल्प खर्चाची असत. खुद्द राज्ययंत्र चालविण्यास पैसारूपी पेट्रोलहि थोडें लागे.

१९ व्या शतकांत ही स्थिति पालटली. औद्योगिक क्षेत्रांत भांडवलवाल्यांच्या बरोबरीनें धंदेवाईक तज्ञांना भाव आला. मजूरवर्गाच्या मनांत आपण किती प्रचंड धन उत्पादितों व त्यातील किती अल्प आपल्या वाटयास येतें याच्याबद्दल जाणीव उत्पन्न होऊन त्यांच्या गाऱ्हाण्यांना तोंड फुटलें. यांतूनच सुसंबद्ध समाजवादाचे पहिले बोल जगानें ऐकले. यांत्रिक युगांत मनुष्याच्या हातीं बेसुमार सत्ता आली. जगांत एका दृष्टीनें सुबत्ता निर्माण झाली. दुष्काळामुळें लोक अन्नपाण्याविना तडफडण्याचे दिवस नाहींसे झाले. वाहतुकीच्या साधनांनीं जगाचे सर्व विभाग व खंडें एक-मेकांजवळ आलीं. साहजिकच परस्परावलंबन वाटलें. पण मनुष्य आपल्या जीव-

नांतील यंत्रांचें स्थान मात्र विसरला. यंत्राला गुलाम बनवून राबविण्याऐवजीं त्यानें आपण होऊन यंत्राचें दास्यत्व पत्करिलें. सुबत्तेच्या काळांतहि कोट्यावधि लोकांना अर्धपोटीं व अर्धनग्न राहण्याचा प्रसंग यावा ना ? यांत्रिक युगांत समाजांतील आर्थिक विषमता कळसास पोंचली. गरिबांची हलाखी व दैना वाढती राहिली. पिपासू भांडवलवाल्यानीं धनाच्या राशी पळविल्या. समाजाच्या अंगावरील आर्थिक विषमतेची टेंगळें लोकांना दुःसह झालीं. राजसत्तेच्या जोरावर भांडवलवाल्यांनीं कामगारांच्या नवीन चळवळी, संघटना, कल्पना, मारण्याचा प्रयत्न केला. यामुळें समाजांतील वर्गकलह व मालकमजुरांमधील तंटेबखेडे निकरावर आले. समाजवादाच्या वाढत्या प्रसारामुळें लोकांना आपलें दुःख निवारण व्हावें म्हणून हक्क व सत्ता मिळविली पाहिजे असें वाटूं लागलें. विसाव्या शतकांतील समाजवादाच्या विचारप्रवाहामुळें फॅसिस्ट हुकूमशहांनासुद्धां समाजवादाचा उसना व खोटा आधार घ्यावा लागला. हिटलरनें नाझी पक्षास राष्ट्रीय समाजवादाचा पुरस्कर्ता बनविलें आहे. शेळीच्या गळ्यांतील आंचळाप्रमाणें राष्ट्रीय समाजवाद या शब्दप्रयोगातील समाजवाद हा शब्द निरर्थक व निरुपयोगी आहे. पण गोरगरिबांची मर्जी संपादण्यासाठीं समाजवादाच्या ढोंगीपणाचा बुरखा हुकूमशहांना घ्यावा लागला पण त्यामुळें कामगारांची पगारवाढीची मागणी, समाजांतील आर्थिक समता, चलती व हलाखी या रहाटगाडग्यापासून देशाची सुटका या गोष्टी हुकूमशहांच्या आवाक्याबाहेरच्या असल्यानें त्यांत ते कांहींच करूं शकले नाहींत.

* * *

एकंदरींत सध्यां देशभक्ति म्हणजे युद्धांतील लष्करी वृत्ति मानली जात आहे. शांततेच्या काळीं देशभक्ति ही मिळमिळीत फिक्की व खुरटलेली ठरली. तें बदलावयास नको काय ? जळजळीत राष्ट्रीयत्वाच्या तत्त्वावर अखिल जगताचा एकच एक विश्वव्यापक संयुक्त देश बनविण्याची कल्पना सोडणें भाग आहे. त्या कल्पनेचा त्याग करणें म्हणजे मनुष्यानें आपल्या जीविताचा खेळ करून चिरकाल निसर्गाशीं झुंज खेळण्यास सिद्ध राहणें.

याच्या उलट प्रत्येक राष्ट्रानें आपल्या संस्कृतीच्या आधारें आपला उद्धार करून बंधुभावानें व त्यागबुद्धीनें एकमेकांशीं वागून सर्वांच्या उन्नतीसाठीं

निःस्वार्थीभावानें एक झालें पाहिजे ही कल्पना राष्ट्रीयत्वांत आली कीं तिचें स्वरूप तावडतोब पालटेल. राष्ट्रीयत्वाची कल्पना देशांतील लोकांची एकजूट घडवून आणून आपल्यावरील परकीय आक्रमणास प्रतिकार करण्यास जागरूक रहाण्यास चांगलें शिकविणें व त्यासाठीं ती पाहिजेच पाहिजे. पण राष्ट्रीयत्वानें पिसळून जाऊन दुसऱ्याच्या प्रांतावर दिवसाढवळ्या दरवडे घालण्यास शिकविणें हा त्याचा मोठा दुरुपयोग आहे. म्हणूनच आपण असें म्हणूं कीं खरें राष्ट्रीयत्व लोकसत्ता-प्रधानच असावयास हवें.

[ ९ ]

# मानवी संस्कृतीवर गंडांतर

असें म्हणतात कीं वैद्याच्या हाताला गुण येईनासा झाला कीं वैद्य बदलावा, वकील बोलतांना अडखळूं लागला कीं दुसरा वकील पहावा आणि चप्पल पायास लागूं लागली कीं चर्मकारास रजा द्यावी. याप्रमाणें चालू युगांत मनुष्य वरचेवर ठेंचा खाऊन अडखळूं लागल्यामुळें प्रचलित संस्कृति दूषित आहे; तिचा त्याग मनुष्यानें केला पाहिजे असा जोराचा विचार प्रचारप्रवाह सध्यां जगांत वाहात आहे.

१९१४ च्या महायुद्धानंतर उत्पन्न झालेलें वैराग्य अखेर स्मशानवैराग्य ठरलें. राष्ट्रसंघाची अभिनव कल्पना शस्त्रास्त्रांच्या खणखणाटास आळा घालील ही समजूत वेडेपणाची ठरली. सहकार्याच्या तत्त्वावर सर्व जगाची पुनर्रचना झालेली पाहण्याचें सद्भाग्य चालू तरुण पिढीच्या नशिबीं तरी खास नाहीं. अनिवार्यपणें जग व मानवजात कड्यावरुन कोसळणार हें भयंकर दृश्य डोळ्यापुढें येत चालल्यानें "मनुष्यजीवन जगण्याच्या योग्यतेचें नाहीं व संस्कृतीचा विनाशकाल समीप आला" असें निराशाजनक आत्मघातासारखे विचार थैमान घालूं लागले आहेत.

मानवी संस्कृतीच्या विनाशाचीं दुश्चिन्हें दृग्गोचर होण्यास अनेक गोष्टी कारणीभूत आहेत. मुख्यतः गेल्या शतकादीडशतकांतील समाजशिक्षणाची दिशासर्वस्वी चुकलेली दिसून येईल. त्याकडे अगोदर लक्ष पुरवून नंतर इतर कारणांचा विचार करूं.

एकोणिसाव्या शतकांत दोन गोष्टींनीं आधुनिक शिक्षणाची दिशा ठरविली. सामाजिक जीवनांत व्यक्तीला स्वातंत्र्य किती असावें ही त्यापैकीं एक गोष्ट आणि तें अबाधितपणें उपभोगण्यास आवश्यक अशी व्यक्तीची मानसिक, बौद्धिक व नैतिक प्रगति व्हावयास काय करणें जरूर आहे याचा विचार ही दुसरी. एकंदरींत मनुष्याची सांस्कृतिक सुधारणा होण्याच्या दृष्टीनें शिक्षणक्रम बनविणें प्राप्त या भावनेनें सर्व मानवी प्रयत्न झाले. त्यांत शिक्षणशास्त्रांतील अभिनव शोधांनीं शैक्षणिक वाढ व प्रगति होण्यास एकप्रकारें मदत झाली. पण या सर्वांस अनुरूप असें राजकीय व बौद्धिक स्वातंत्र्य मनुष्याला मिळालें नाहीं असें नाइलाजानें म्हणणें भाग आहे. आणि या दृष्टीनें मनुष्याच्या कपाळीं हुकूमशाहीरूपी धोंडा आला तेंहि बरोबरच आहे असें म्हणावें लागतें.

एकोणिसाव्या शतकांत राजकीय स्वातंत्र्य व लोकशाही यांच्या प्रतिष्ठापनेस लोकांची विवक्षित शैक्षणिक वाढ व्हावयास पाहिजे अशी सर्वांची प्रामाणिक समजूत होती. आधुनिक राष्ट्रसंघाप्रमाणेंच आकाशाला गवसणी घालण्याच्या विश्वव्यापक कल्पना व योजना या समजुतींत उगम पावल्या. सार्वत्रिक शिक्षणाची जोपासना, प्रसार व सुधारणा यांची तरतूद करणें हें शैक्षणिक सुधारणांचें मुख्य गमक ठरलें. थोडक्यांत, लोकशाही लोकप्रिय होण्यास समाज देशभक्तीची चटक व कळकळ सर्वांना लागली पाहिजे व अशी चटक लागण्यास सर्वांना शिक्षणामृत पाजलें गेलें पाहिजे असें सर्वांना मनापासून वाटत होतें.

या सार्वत्रिक शिक्षणाच्या लाटेंत जर्मनींत एकोणिसाव्या शतकांत फीटझ् नामक संशोधकानें राष्ट्रैक्याची एक नवीन टूम काढून लोकापुढें ठेवली. ती ही. राष्ट्रैक्याची नवीन व अभिनव दृष्टि अखिल देशांतील मुलामुलींना प्राप्त होईतों त्यांना आईबापांच्या जुनाट पुराणमतवादी राष्ट्रघातक शिकवणीपासून दूर ठेवण्यासाठीं राष्ट्रानें त्यांचा ताबा आपल्याकडे घेतला पाहिजे आणि अशा राष्ट्रीय शिक्षणांत देशांतलि एक उभी पिढी तरबेज झाल्याविना देशाचा तरणोपाय नाहीं असें त्याचें म्हणणें होतें. १८०६ सालीं फ्रेंचाकडून जो जर्मनीचा प्रचंड पराभव झाला आणि मानहानि व हेटाळणी यांचा कलंक सबंध राष्ट्राला लागला तो धुवून टाकण्याची जबर महत्त्वाकांक्षा त्या पोटीं होती. म्हणून शिक्षण म्हणजे शिस्त व आज्ञापालन आणि शिस्त हेंच देशाचें लष्करी सामर्थ्य ही फिटझ्नें घालून दिलेली समस्या. शिस्तीच्या शिक्षणाच्या अभावीं राष्ट्रोन्नतीस लोकांची पुरी बौद्धिक व

कायिक मदत होऊं शकत नाहीं, राष्ट्रास सजीवता येत नाहीं आणि खऱ्या राष्ट्रीयत्वाचा बाणा लोकांच्या अंगीं भिनत नाहीं असें त्याचे म्हणणें होतें. या हेतूनें जर्मनींत सार्वत्रिक शिक्षणक्रमांत लष्करी शिस्त व कवाईत यांचें शिक्षण समाविष्ट करण्यांत आलें. राष्ट्राचा भावी आधारस्तंभ नागरिक हा स्वतःच्या देशाचें संरक्षण करण्यास कार्यक्षम बनला पाहिजे व देशांतील तरुणवर्ग जोमदार सशक्त, शस्त्रधारी, हत्यार चालविण्यांत व हत्या करण्यांत कुशल आणि देशापायीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार असला पाहिजे अशी ओरड सुरू झाली.

## चोहोंकडे गुडघाभर पाणी

एकोणिसाव्या शतकांत व्यक्तींचें स्वातंत्र्य राज्यसंस्थेकडून पायदळीं तुडविलें जाऊं नये म्हणून जागरूक राहण्याचें शिक्षण व्यक्तीला दिलें जाई. तर या नवीन शिक्षणकल्पनेप्रमाणें राष्ट्रवैभव वाढविणारा खरा राष्ट्रसेवक व आज्ञाधारक अनुयायी तयार करण्याचें शिक्षण त्याजागीं आलें. जर्मन शिक्षणाच्या पुरस्कर्त्यांनीं स्वराष्ट्रहितार्थ काढलेली टूम रास्त होती पण तिचा विपरित परिणाम मात्र अखिल जगास सहन करावा लागला. अनुभवांतीं इतकें स्पष्ट दिसलें कीं, सार्वत्रिक शिक्षणदानानें राजसत्ता बळकट झाल्या, शिक्षणाचा प्रसार देशाच्या कोनाकोपऱ्यांत होऊन लोकांमधील साक्षरता वाढली. पण लोकाचें अज्ञान पूर्ववत् कायमच राहिलें. याचें कारण बहुसंख्य लोकांना उच्च शिक्षण मिळूं शकलें नाहीं. उच्च शिक्षणानें सुसंस्कृत बनलेलीं मनें लोकशाही उत्तम रीतीनें राबवूं शकते. साक्षरतेच्या वाढीमुळें लोकांना लिहायला वाचायला येऊं लागलें तरी पण त्यांच्या ज्ञानांत भर पडूं शकली नाहीं. या सार्वत्रिक शिक्षणदानाची कल्पना प्रसृत होण्यापूर्वी कांहीं थोडे बुद्धिमान हुशार लोक शिकलेले असत व त्याच्या हातीं राज्यसूत्रें असत. लोकांच्या संस्कृतीची आबाळ होऊं नये याबद्दल त्यांना फार आस्था वाटे. सार्वत्रिक शिक्षणाबरोबर सार्वत्रिक मतदानहि सर्वांना लाभलें. मताशिवाय मनुष्य नाहीं व बहुमतानें निवडल्याशिवाय अधिकारी नाहीं असा हा मतदारी पद्धतीचा अतिरेक अखेर भोंवला. या विभिन्न घटनेमुळेंच निव्वळ साक्षर उमेदवाराकडे राज्यसूत्रें लोकशाहींत येऊं शकलीं. ज्ञानाच्या दृष्टीनें चोहोंकडे गुडघाभर पाणी झालें. पूर्वीसारख्या बुद्धिमान व कर्तबगार लोकांची निपज होईना असें नाहीं; पण या अर्धवट सुशिक्षित——नव्हे साक्षरताच्या रेटारेटींत त्यांना पुढें येण्यास वांव मिळेना. राजशकट हांकण्यास गांढवें जुंपून भागत नाहीं. त्यास

उत्तमोत्तम शिक्षित घोडे लागतात. पण घोड्यांना लाथा मारून गाढवांनीं सुकाळ केल्यामुळें, हल्लीं राजकारणांत विशेष शिक्षण घेतलेल्या, अनुभवी व मुरब्बी मुत्सद्यांचा अभाव झाला.

## आधुनिक ॲडम आणि ईव्ह

सार्वत्रिक शिक्षणप्रसार भराभर झाला तरी त्यांतून एकहि बुद्धिमान, हुषार, पक्का सुशिक्षित निपजणें अशक्य आहे. सार्वत्रिक शिक्षण व मत प्रसाराच्या कालांत अशा बुद्धिमान कल्पक लोकांनीं आपला एक निराळाच वर्ग बनविला; त्यांना आपण शास्त्रीय संशोधक वा तज्ञ असें संबोधूं. मूळ सत्ताधारी अज्ञानी, अनुभवी व मूर्ख झाल्यानें या तज्ञांना त्यांचें गुलाम व्हावें लागलें. मूर्खांची चाकरी शहाण्यानें करूं नये ही म्हण झाली पण या नवीन कालांत तसा प्रसंग शहाण्यावर आला खरा. बरें या शहाण्याकडे राज्यकारभार सोंपवावा म्हटलें तर तिकडूनहि मनुष्याच्या नशिबीं निराळ्या मूर्खांचेंच राज्य येणार. कारण हे अतिशहाणे तज्ञ निव्वळ आपल्या शास्त्रीय शोधानें वेडावलेले असतात. जगापासून फटकून वागल्यानें जगाचें ज्ञान तज्ञाना नसतें; व्यवहार ज्ञानाची पुसट ओळखहि त्यांना असत नाहीं म्हणून एका लेखकानें यांना ख्रिश्चन धर्मातील मनुष्यजातीच्या आद्य रानटी ॲडम व ईव्हची उपमा दिली आहे व ती खाशी उपयोगी पडते. वरील रानटी मनुष्याप्रमाणें हे तज्ञ चांगलें वाईट याबद्दल पूर्णपणें बेफिकीर व अज्ञानी असतात. त्यांचें शहाणपण व संशोधन हें नागडें उघडें व लाजलज्जाविरहित असतें. ते आपल्या शास्त्रांत पूर्ण वाकबगार व कुशल असले तरी आपल्या शोधांचा व ज्ञानाचा जगावर मानवावर व संस्कृतीवर प्राय परिणाम होतील याबद्दलचे विचार त्यांच्या मनाला चुकूनसुद्धां शिवत नाहींत. अशा तज्ञांच्या विभूतिपूजेंतच हुकूमशाहीचीं पहिलीं बीजें पेरलीं गेलीं असें एक विद्वान ग्रंथकार म्हणतो तें अक्षरशः खरें. * तज्ञांचें ज्ञान, त्यांची माहिती, त्यांचा सल्ला व त्यांचें संशोधन हीं सारीं उपयुक्त असतात खरीं पण त्याचा उपयोग करणारांना तारतम्य व व्यवहारज्ञान हवें ना ! राज्यशकटास जुंपलेल्या मूर्खांच्या ठिकाणीं या संशोधकांच्या शास्त्रीय ज्ञानास व्यावहारिक उपयुक्ततेचा लगामहि घालतां येत नाहीं यामुळें हे संशोधक शास्त्रीय शोध कांखोटीस मारून चौखोर उधळतात.

* "Fach mann (Expert)—idolatory is one of the first germs of the disease from which Dictatorships come."—Sforza.

या शास्त्रीय शोधांनीं मनुष्याच्या हातीं अमर्यादित सत्ता दिली पण त्यावर सुशिक्षित व सांस्कृतिक मनाचा ताबा असावयास नको का ? म्हणूनच आपण असें म्हणूं कीं या अभिनव शिक्षणक्रमानें युरोपिअन संस्कृतींत घोंटाळा व दंगल उडवून दिली. हिटलरमुसोलिनीसारखे येनकेन प्रकारेण निव्वळ आपल्या राष्ट्राचा स्वार्थ साधणारे स्वार्थलोलुप राज्यकर्ते निर्माण झाले. राष्ट्रांतील बुद्धिमान व कल्पक संशोधकांनीं सर्व जगाला स्तंभित करतील, मानवी जीवन व संस्कृति यांचा चुरगळा होईल असे शोध व अशीं साधनें त्यांना पुरविलीं आणि त्याच जोरावर निरपराधी माणसांचे नरमेधयज्ञ अशा राज्यकर्त्यांना उघडतां आले. मनुष्यजातीच्या दुर्दैवानें अशी विधिघटना जुळून आली खरी.

## राज्यशास्त्रांतील तत्त्वांची पुरचुंडी

पूर्वी इंग्लंडासारख्या देशांत मुत्सद्यांची म्हणून एक निराळीच जात असे व त्यांचा एक सांप्रदायहि बनलेला होता. अशा जातींत वा सांप्रदायांत जन्मणारांना अक्कल, शिक्षण व ज्ञान वंशपरंपरागत वतनाप्रमाणें मिळतें असें नाहीं; तरी पण तत्सदृश बुद्धि तरी आनुवंशिक मिळते. या सार्वत्रिक मतदानाच्या मामल्यांत तो वर्ग मागें पडला. राज्यशास्त्र ही निव्वळ शास्त्रीय तत्त्वांची पुरचुंडी नव्हे कीं जिच्या आधारावर एखादा सर्वसामान्य मनुष्य राज्यसंस्था योग्य दिशेनें हांकील. अध्यात्मवादाप्रमाणेंच राजकारणांतहि कांहीं गूढगुंजनें व अज्ञेय प्रमेयें असतात. त्यांतून मार्ग काढणें हें कष्टसाध्य असलें तरी वरील प्रकारच्या आनुवंशिक बुद्धीचे व प्रतिभेचे लोक तीं कोडीं उलगडण्यांत अधिक तरबेज असतात. एकहि आनुवंशिक गुण अंगीं नसणाऱ्या अननुभवी लोकांचा काळ आल्यावर सांप्रतची बेबंदशाही माजणें हें नैसर्गिक आहे. ती माजली नसती तरच आश्चर्य असें म्हणावें लागेल.

## अध्यात्मिकदृष्ट्या दिवाळखोर

“ शास्त्राच्या वाढीनें व संशोधनांनीं मनुष्यास अफाट सत्ता मिळाली. शिक्षणाचा विस्तृतप्रमाणावर प्रसार झाला. मुबलक साधनें हातीं आलीं. पण ज्ञान, सत्ता व शिक्षण यांच्या वाढीनें अगर प्रसारानें जगाच्या चालचलणुकींत कांहींहि फरक पडूं शकला नाहीं. पूर्वी ज्याप्रमाणें जग वाईट तऱ्हेनें वागत होतें तसेंच तें या सुधारलेल्या काळांतहि वागत आहे. जुन्या समजुती, रूढी आणि विश्वास यांचा

पुरा बीमोड होऊन मनुष्यानें आपल्या ऐहिक सत्तेंत व संपत्तींत भर टाकली. पण जुनें अंधविश्वासाचें युग होतें तेंच बरें होतें असें म्हणण्याची पाळी माणसावर आली. जुन्या समजुती, रूढी व विश्वास यायोगें निदान माणसास मानसिक समाधान व शांति तरी मिळत होती. पण आतां तीहि नाहींशीं झालीं. मनुष्याच्या ऐहिक सुखांत भरपूर वाढ होऊनहि त्याची गरिबी व असमाधान कायमच राहिलें. आधुनिक कालांत अर्धवट शिक्षणाची दारू प्यालेल्या पण अध्यात्मिकदृष्ट्या पूर्णपणें दिवाळखोर बनलेल्या लोकांच्या नशिबीं असमाधान नाहीं तर दुसरें काय येणार ? " जुन्या अंधश्रद्धेवरील विश्वास साफ उडाला, नवीन बौद्धिक दृष्टीवर त्याचा पुरा विश्वास बसेना म्हणून त्याची स्थिति मोठी भांबावल्यासारखी झाली. " हे एका विद्वानाचे उद्गार मननीय वाटत नाहींत का ?

## बालेकिल्ल्यांत फंदफितुरी

लहान अल्पवयस्क बालबालिकांच्या शिक्षणक्रमांत विद्यार्जनास लागणारें विशुद्ध वातावरण ठेवण्याऐवजीं त्यांच्यामध्यें युयुत्सुवृत्तीच्या मुर्दाड देशभक्तीचा संचार करणें म्हणजेच मनुष्याच्या बौद्धिक व नैतिक बालेकिल्ल्यांत फंदफितुरी करण्यासारखें आहे. तरुणांच्या सहज भावनाशील वृत्ती मुळांतच अशा विपारी गोष्टीनें बिघडवून ठेवल्यामुळें त्यांच्या पुढील आयुष्यक्रमांत त्याचा वणवा पेटलेला दिसावा यात कांहींच नवल नाहीं. निव्वळ शिक्षणदानाच्या बाबतींत समान संधींनीं हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. शिक्षणाच्या पद्धती व मूल्यें यामध्यें आमूलाग्र बदल करण्याची वेळ सांप्रत येऊन ठेपलेली आहे.

एका बाजूनें सार्वत्रिक शिक्षणप्रसार आणि दुसऱ्या बाजूनें तज्ञांचा कट या रस्सीखेंचींत हुकूमशहांचें साधलें. कदाचित पुनः अंधःश्रद्धेचें युग अवतरेल. पण त्याचा डोलारा जुनी संस्कृति, तत्त्वज्ञान, उच्चतम सद्गुण, धर्मसंस्था, संत इत्यादि खांबावर उभारला जाईल कीं नाहीं याबद्दल मात्र मनास शंका वाटते. जग असेंच वहात जाणार काय असा प्रश्न उभा राहून मन बेचैन होतें खरें.

## आत्मनाशाचीं साधनें

एकूण जुन्या गुलामांनीं ज्याप्रमाणें स्वतःचीं प्रेतें पुरण्यासाठीं स्वतःच्या हातांनीं खड्डे खणले तद्वत् या व्यवहारशून्य बेअकली शास्त्रज्ञांनीं आत्मनाशार्थ ही शस्त्रास्त्रें व साधनें शोधून काढून मूर्खांच्या हवालीं केलीं. ज्या वैचारिक स्वातंत्र्याच्या

अमदानींत या शास्त्रांनीं वाढ व प्रगति झाली त्या स्वातंत्र्याच्या नरडीस नख लावण्याचें कृत्य खाल्ल्या घरचे वांसे मोजणाऱ्या शास्त्रांनीं करण्यास तयार व्हावें हा दैवदुर्विलास नव्हे का? ज्या राजकीय, आर्थिक व सामाजिक तत्त्वांच्या जोरावर अखिल जगाची व मानवजातीची सुधारणा झाली त्या तत्त्वांचीच होळी पेटल्यावर मानवजात होरपळून निघणार यांत काय आश्चर्य?

—परत रानटी अवस्थेप्रत जाण्याची पाश्चात्यांची ही सिद्धता तर नसेल ना!

## धर्माची व समाजघटनेची दोस्ती आणि भागीदारी

लोकमत वहात्या गंगेप्रमाणें असतें. दुर्बल व भेकड राज्ययंत्र वहात्या अदृश्य लोकमताच्या प्रवाहांत वहात जातें. खंबीर राज्ययंत्र लोकमतरूपी प्रवाहाचा तळ गांठतें. लोकमत, लोकमत असें जें वरचेवर म्हटलें जातें तो एकप्रकारें एकाद्या गोष्टीविषयीं लोकाचा विश्वास होय. विसाव्या शतकात राष्ट्रीयत्वानें लोकांच्या विश्वासाची पकड घेतली. आपल्या सर्व कृत्यांना लोकांचें नैतिक व आत्मिक सहकार्य लाभावें म्हणून हुकूमशहांनीं राष्ट्रीयत्वाचा उपयोग प्रत्यक्ष धर्माप्रमाणें करून घेतला.

यासाठीं विद्यमान धर्माची उचलबांगडी होणें भाग होतें. गेलीं दोनतीन शतकें पाश्चात्य देशांत धर्म, धर्मगुरू आणि धर्मपीठें यावरील संक्रांत हळूंहळूं आपलें कार्य करीत होती. पण तिघांचाहि अंत अपेक्षेपेक्षां लवकर १९१७ च्या रशियन राज्यक्रांतीनें केला. धर्माची आणि समाजघटनेची सहसा दोस्ती व भागिदारी असते. पण रशियांत प्रत्यक्ष समाजघटना मोडण्यातोडण्यास सिद्ध झालेले धर्माची पर्वा काय म्हणून करतील? रशियांत समाजवाद हा केवळ राजकीय पक्षाचा तात्त्विक भाग नसून त्यास लोकविश्वासाचें स्थान देण्याचा त्यांचा अट्टाहास होता. बरट्रँड रसेल म्हणतो कीं "भांडवलवाले आपला स्वभावधर्म न सोडतील आणि भाई लोक धर्मखुळे होऊन पिसाट बनतील तर भाई खात्रीनें जिंकतील." पण बरट्रँड रसेलच्या दोन्ही कल्पना जशाच्या तशा प्रत्यक्षांत उतरणें शक्य आहे काय? रशियातील पंचवार्षिक नियोजनाची कार्यनिष्पत्ति म्हणजे जणूं नव्या उगवत्या धर्माचें एक गोंडस फूल असें ते म्हणतात. धर्मखुळयांच्या बडबडीचा हा एक मामला झाला.

## फॅसिझम हा नवीन युगाचा धर्म

कम्यूनिझमला धर्माचें स्वरूप दिल्या कारणानें, तिच्या विरोधकांना निराळ्या

गोष्टींना स्थान देणें भाग पडलें. हिटलर व मुसोलिनी यांनीं राष्ट्रीयत्वास धर्माची जागा दिली ती या कारणासाठीं. फॅसिझम हा एक कृत्रिम धर्म झाला. फॅसिस्ट पक्षांतील बडीं धेंडें साधुसंत ठरलीं. फॅसिस्ट धर्माचीं आद्यतत्वें, पुराणें, वैभव, समारंभ मंत्र-तंत्र या सर्व आवश्यक जादूटोण्याची तयारी फॅसिस्टांना काढावी लागली. फार काय इटलींतील कॅथॉलिक चर्चेना व जर्मनींतील प्रॉटेस्टंट चर्चेना राष्ट्रीयत्वाचा मुलामा देण्यात आला. रशियन राष्ट्रीयत्वाचें पर्यवसान आंतरराष्ट्रीयत्वात करण्याची मूळ कल्पना जेथें विराम पावली तेथें फॅसिस्टाचा काय पाड ? फॅसिस्टांच्या पुढें असलें भव्य व उदात्त ध्येयच मुळीं नव्हतें. म्हणून हुकूमशहांना आपली सत्ता प्रस्थापित करतांना धर्माशीं दोन हात करावे लागले. मार्टिन ल्यूथर या प्रॉटेस्टंट धर्माच्या उत्पादकानें धर्मसंस्थेस राष्ट्रीय जीवनाशीं सहकार करण्याची दीक्षा प्रथम दिली. आज हिटलरशाहींत केव्हां केव्हां मार्टिन ल्यूथरचा जयजयकार ऐकूं येतो तो या कारणास्तव. या नवमतवाद्यानें धर्मसंस्थेस दिलेल्या नवीन स्वरूपाच्या आधारावर पूर्वीच्या राजाप्रमाणें आजच्या हुकूमशाहांनीं धर्मांतील उर्फ राष्ट्रीयत्वातील सर्वश्रेष्ठ स्थान बळकावलें आहे.

## जागतिक नीतिमत्ता वारांगना बनली

युरोपियन संस्कृतींत हुकूमशाहीची लाट कांहींशी अनपेक्षित आली. धर्मास अवनत स्थिति आज अनेक वर्षें येत आहे. प्रथम या धर्मसंस्थेवर राजे लोकांनीं मोर्चा चढवून आपला पगडा बसविला. तोच किल्ला पुढें हुकूमशहांनीं गिरविला. त्यानीं धर्मांतील आत्मिक शुद्धता व शिस्तीचें पालन या दोन गोष्टींची भर राष्ट्रीयत्वांत घातली. कीलर म्हणतो कीं " जर्मन लोक निव्वळ वीरभोक्ते नाहींत. त्यांनीं राष्ट्रवीरांना धार्मिक उपचारांची व वैभवाची कवचकुंडलें चढविलेलीं आहेत. लोकाना गुलामगिरी मानहानी व आपत्ति याच्या पंकांतून वर काढण्याकरितां पाठविलेला तो एक प्रत्यक्ष परमेश्वरी अवतार होय अशी भावना त्यानीं प्रसृत केली. " पूर्वी ग्रीक लोकांच्या वेळेस राष्ट्रीयत्वाशिवाय अन्य धर्माची जरुरी लोकांना नव्हती तोच मामला पुन्हां आला. पण यामुळें ख्रिश्चन धर्म अवतरण्यापूर्वीची रानटी अवस्था भूतलावर येण्याचा रंग दिसूं लागला.

आजच्या पाश्चात्य देशांच्या राजकारणांतून नीतिमत्तेचें सरास उच्चाटन झालेलें उघड दिसतें. नागडा स्वार्थ हा राष्ट्रधर्म ठरल्यामुळें जागतिक नीतिमत्तेस सध्यां वारांगनेचें स्वरूप आलें आहे. कोणी म्हणतील कीं राष्ट्राचा नैतिक दर्जा

खालावण्यास व्यक्तीची नीतिमत्ता खालावली हें मुख्य कारण. राष्ट्रीयत्वाच्या उन्मादामुळें आज व्यक्तीची नैतिक जाणीवसुद्धां बुजली आहे. पूर्वी व्यक्तीस व समाजास नीतिमत्तेचें सक्तीनें पालन करावयास लावण्याकरितां धर्माचा दंडक होता. "धर्मगुरू हे निःसत्व दंडधारी" झाल्यानंतर, त्यांचा वारसा मिळालेल्या राजसत्तेनें धर्मास तिलांजली दिली. म्हणून कोणी म्हणतात कीं 'धर्म बुडाला, देश बुडाला अन् जगहि बुडालें.'

## मनाचा, जिव्हेचा आणि कृतीचा लपंडाव

तसें म्हटलें तर धर्माचा आणि नीतीचा संबंध अर्थाअर्थी नव्हता व नाहीं. विज्ञानयुगांत धर्माचा फोलपणा दिसला पण नीतीचें सोवळेंभांडें खुंटीस अटकविण्याचें काय कारण ? आज राष्ट्रांना नीतीचा चाड नसल्याचीं हजारों उदाहरणें दाखवितां येतील. आजच्या सत्ताधाऱ्यांना खऱ्याखोट्याची चाड नाहीं, इतरांच्या बऱ्यावाईटाची फिकीर नाहीं अन् जग आपल्याविषयीं काय बोलेल याची यत्किंचित् पर्वा नाहीं. प्रत्येकाचें घोडें जगाकडे न बघतां बेफाम चौखूर उधळीत चाललें आहे. त्यास कसलें भय वा अडथळा नाहीं, अपयशाशिवाय दुसरी भीती नाहीं अन् मानहानीशिवाय लाज नाहीं. मनाचा, जिव्हेचा आणि कृतीचा लपंडाव करण्यांत सारी कर्तबगारी व मुत्सद्देगिरी आहे असें प्रत्येक मानतो. यामुळें सत्य नेभळें पडलें व हिंसेला मोल चढलें. राजसत्तेवरील राजकीय व नैतिक कांटेरी लगाम सैल पडले व आतरराष्ट्रीय कायद्यांची विटंबना झाली. मूर्तिमंत दांभिकता, निर्दयता, कठोरता, असत्यता वगैरे दुर्गुणांनीं सर्व नासून गेलें, म्हणून एकादे वेळेस वाटतें कीं कदाचित् राष्ट्रांचा माज अगर त्यांची नशा उतरविण्यास महायुद्धासारख्या कठोर योजना परमेश्वरास कराव्या लागत असतील.

## खोट्या देवतेस रक्ताचें कंठस्नान

एक वेळ सर्व कांहीं सोडलें तर चालेल पण नीतिमत्ता सोडली कीं मनुष्यपणा सुटला आणि याचमुळें धरबंध नसलेल्या बेताल हुकूमशहांना नंगा नाच करण्यास फावलें. पूर्वी समाजांत अनीतिमान माणसांना वाळीत टाकीत. आज त्याला निदान हेटाळणी व तिरस्कार तरी सहन करावा लागतो पण राष्ट्रांच्या अनैतिक वर्तणुकीवर काय तोडगा काढणार ?

मनुष्यांचा उपयोग अमानुष गोष्टी करण्यापर्यंत हुकूमशहांनीं मजल मारली आहे. उदाहरणार्थ जर्मनेतर लोकांना केर अगर अडगळीप्रमाणें सर्रास झाडून टाकलें जातें. या वेळीं जर्मन रक्त व जात यासाठीं जर्मनी आहे ही घोषणा ते

करतात, यानंतर जर्मनराष्ट्रापुढें जर्मन नागरिक पदार्थ म्हणून त्याच्याहि सर्वस्वाचा होम करण्यांत येतो. जर्मन अगर जर्मनेतर या दोन्हीं लोकांना ज्यांत स्थान नाहीं असा हा ' जर्मनी ' तरी कोणता कीं ज्या खोटया देवतेस दोघांच्याहि रक्ताचें कंठस्नान हिटलरला वरचेवर घालावें लागतें ? या साहजिक उद्भवणाऱ्या प्रश्नास समर्पक उत्तर कोणी देऊं शकेल काय ?

## मानवजातीवर प्रलयकाल

यावरून व्यक्तीच्या खासगी वर्तनाइतकेंच किंबहुना थोडेंसें जास्त सत्ताधाऱ्याचें वर्तन धुतल्या तांदळाप्रमाणें निर्भेळ असणें भाग आहे असें नाहीं का आपणास वाटत ? का त्या वर्तनांत वाटेल तसली बदमाषगिरी व मुर्दाडपणा खपूं शकेल असें आपणांस वाटतें ? व्यक्तीच्या खासगी जीवनांतील सर्व सद्गुण जसेच्या तसे राष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत आणून भागणार नाहीं हें केव्हांहि मान्य केलेंच पाहिजे. पण याचा अर्थ नेसतें सोडून डोक्यास गुंडाळून मनमुराद वाटेल तसें वागण्याचा हक्क राष्ट्रांना आहे हें कदापिहि न पटणारें आहे. राजकारणी मुत्सद्दी मुत्सद्देगिरीचा धंदा म्हणून करितात. पण प्रत्येक धंद्यांत विशिष्ट प्रकारची नीती ही असतेच ना ? त्या धंद्यांत पाळायाचे शिष्टाचार, सांप्रदाय आणि रूढी यांची टाळतां येणारी नैतिक जबाबदारी प्रत्येकावर सारखी असत नाहीं काय ? दुर्दैवानें आजच्या जागतिक राजकारणांत सभ्यता, शिष्टाचार आणि सांप्रदाय या सर्वांना हरताळ फांसलेला तुम्हाला आढळेल. खुद्द मुत्सद्देगिरीच्या धंद्यास काळिमा आणणारीं कृत्यें हरहमेश करण्यांत जणूं स्पर्धा लागलेली आहे. आजच्या जागतिक जीवनांत सहानुभूति, परमतसहिष्णुता, प्रामाणिक, न्याय, स्वातंत्र्य इत्यादि सद्गुणांचा अभाव ढळढळीत दिसत आहे. या सद्गुणाची वाढ व जोपासना झाल्याखेरीज आजचे उद्वेगजनक प्रकार थांबणार नाहींत आणि उद्यांच्या सांस्कृतिक सुधारणेस प्रारंभहि पण होणार नाहीं. राष्ट्रनौकेस आज नीतिमत्तेचें सुकाणूं आणि सभ्यतेचें शीड नसल्यानें ती कोलमडूं लागली आहे. ती अशीच पुढें चालूं राहील तर तिचें भविष्य वर्तविण्यास कोणी ज्योतिषी नको. राष्ट्राचें अधिष्ठान एक वेळ नाहींसें झालें तरी चालेल पण तें नैतिक अधिष्ठानापासून च्युत झालें तर जगावर आणि मानवजातीवर प्रलयकाल ओढवेल यांत तिळमात्र संदेह नाहीं—नव्हे तसा प्रसंग आज ओढवलेला दिसत नाहीं काय ?

[ १० ]

# हुकूमशाही नाटकाचा आदि, मध्य व अंत

## नाटकाची नांदी व भरतवाक्य

झोटिंगशाही हें एक जुलमी सत्तेचें जुनाट नाटक आहे. तें नाटक पाहण्यास लोकांना आपल्या स्वातंत्र्याचें जबर मोल द्यावें लागतें. त्या नाटकाच्या नांदींत वचनांचा सुकाळ तर त्याच्या भरतवाक्यांत अस्सल दुष्काळ. सर्व नाटक जुलूम-जबरदस्तीच्या अत्याचारी प्रसंगांनीं भरलेलें. अशा मानवी जीवनांतील कठोर सत्याची वरचेवर प्रचीति आणून देणारें तें एक हृदयस्पर्शी शोकांत नाटक आहे. त्याचीं कारणें कांहीं नित्याचीं व कांहीं नैमित्तिक आहेत.

नैमित्तिक कारणांचें विवेचन यापूर्वी विस्तारानें झालेलें आहे. तीं कारणें पुन्हां थोडक्यांत एकदां पाहूं. महायुद्धानंतर युरोपची विपरीत स्थिति हें सर्वांचें मूळ कारण. महायुद्धानें राष्ट्रांच्या डोईवर कर्जाचे डोंगर रचले. महायुद्धानें झालेल्या उलथापालथींत वित्ताची व जीविताची प्रचंड हानी भरून काढण्याकरितां प्रत्येक राष्ट्र अहमहमिकेनें झटूं लागलें. अशा परिस्थितींत १९३१ च्या आर्थिक हलाखीच्या प्रचंड भोवऱ्यांत सर्वांना गटांगळ्या खाण्याची पाळी आली. मालाच्या किंमती बेसुमार घसरल्या. उधळपट्टीच्या राज्यकारभारामुळें दिवाळखोरी माजली. घातक साधनांच्या गुप्तवाढीनें पैसा वांटणीस येईना. एका ग्रंथकारानें या सर्व

घोटाळ्यांची मीमांसा निराळ्या भाषेंत वर्णिली आहे. ती अशी. " युरोपांतील राष्ट्रांना बाहेरच्या फुकट वसाहती मिळावयाच्या बंद झाल्यामुळें आर्थिक बेतालपणा युरोपांत आला. वसाहतींचा कच्चा माल लुटणें, पक्क्या मालाचें हमखास गिऱ्हाईक म्हणून त्यांना राखून ठेवणें आणि आपल्या देशांतील बेकार व वाढती प्रजा यांची त्या ठिकाणीं निर्गत लावणें या त्रयींवर युरोपियन राष्ट्रें भरमसाट उत्पादनशक्तीच्या यांत्रिक युगांत आपला जीव राखून राहिलीं होतीं. बाहेरच्या बेवारशी पोरक्या वसाहती संपल्या आणि युरोप अगतिक झाला.

१९१४ च्या महायुद्धानंतर तत्त्वतः लोकशाहीचा विजय झाल्यामुळें व राजांचा दुष्काळ पडल्यामुळें ( Famine of Kings—Coles ) नवोदित राष्ट्रांनीं पार्लमेंटरी शासनसंस्थेचा अंगिकार केला. पण त्यायोगें राजकारणांत पक्षोपक्षांची गर्दी व मारामारी उसळली. देशांतील सरकार अनिश्चित व अस्थिर झालें. सवलती, सुधारणा आणि सुखसोई यांच्या वाढीनेंहि बहुजनसमाज असंतुष्ट राहिला. बहुजनसमाजाच्या वाढत्या हक्कांच्या आकांक्षा व मागण्या यांचा हट्ट पुरा करणें भांडवलशाहीस जड जाऊं लागलें. कम्युनिझम, सोशॅलिझम, बोल्शेविझम इत्यादि नवीन वाङ्मय झपाट्यानें जगांत प्रसृत होऊं लागलें. सर्वत्र पसरलेल्या निराशा व अंदाधुंदीमुळें चोहोंकडे आत्मविश्वासाचा अभाव स्पष्टपणें दिसूं लागला. अशा संकटास तोंड देण्यास पार्लमेंटरी राज्यसंस्था कुचकामाची आहे असा लोकांचा वाढता ग्रह होऊ लागला.*

## क्रांति आणि झोटिंगशाही

अशा डळमळलेल्या आणि डबघाईस आलेल्या परिस्थितींत क्रांति होऊन अखेर झोटिंगशाहीच उदय पावावयाची ना ? फ्रान्समध्यें राज्यक्रांति झाली, नेपोलिअन आला; इंग्लडमध्यें झाली, क्रॉम्वेलशाही आली; रशियांत झाली, स्टॅलिनशाही निर्माण झाली. चक्रनेमिक्रमाप्रमाणें क्रांति आणि झोटिंगशाही आळीपाळीनें धिंगाणा घालतात असा नेहमींचा अनुभव आहे. (Revolution and Dictatorship will follow one another in vicious alteration.). एक राजवट उलथून पडली तर दुसरी कडवी शिस्त लोकांच्या बोकांडी बसते. काय वाटेल तें खाण्यास सापडावें म्हणून मुसलमान व्हावें आणि त्याचवेळीं नेमका रोजाचा

* The world is sick of parliamentarism—H. G. Wells.

( उपवासाचा ) महिना यावा अशी बहुजनसमाजाची स्थिति होते. शिवाय युद्धांप्रमाणें क्रांतीस बहुजनसमाज राजी असत नाहीं. कारण क्रांतीच्या फोफाटयांत वाळल्या बरोबर ओलेंहि जळतें. दोषी लोकांच्याप्रमाणें अनेक निर्दोषी, अज्ञानी आणि निरपराधी लोकांची हत्या तीमध्यें घडते. या क्रांतीच्या भयानेंच बहुजनसमाजानें झोटिंगशाहीचा शिराळशेट आपण होऊन पत्करलेला दिसेल.

निराशाजनक परिस्थितींत लोकांची मनधरणी करणाऱ्या शासनसंस्थेपेक्षां धाकदपटशा दाखविणारें सरकार लोकप्रियता कमवूं शकतें याचा दाखला हुकूमशहांनीं पटविला. एरवीं व्यक्ति-स्वातंत्र्य व राजकीय हक्क उपभोगीत असलेले लोक आपलें सर्वस्व आपण होऊन एखाद्या झोटिंगाच्या हवालीं करण्यास सिद्ध होतील हें मुळींच संभवनीय दिसत नाहीं. गूळ खाऊन विंचू उतरला असता तर बोट तोडण्याचा आततायीपणा कोण करील ? विद्यमान परिस्थितींत जर देशाची राजकीय, आर्थिक व सामाजिक घडी सुरळीत बसवितां आली असती तर लोक आपले हक्क गमाविण्यास तयार झाले असते काय ? विचित्र व विपरीत परिस्थितीच्या रोगावर हुकूमशाहीरूपी जालीम मात्रा लोकांनीं पत्करिली. क्रांति नको, तर तिच्या अभावीं लोकमतावर आधारलेली हुकूमशाही स्वीकारलेली काय वाईट ? असा विचारप्रवाह आज युरोपांत वाहत आहे. अखिल जनतेची इच्छा एका विशिष्ट व्यक्तीमध्यें अभिप्रेत करावयाची आणि ती व्यक्ति अखिल जनतेच्या व्याहींत समाविष्ट करावयाची असें हुकूमशहांचें हें दुहेरी स्वरूप आहे. विशाल, विस्तृत व अज्ञात लोकसमाजांतून उपटसुंभासारखे स्वयंभू सुलतान उगवले. त्यांनीं बेबंदशाहीपासून राष्ट्राचा बचाव केला. अपयशाचा आणि मानहानीचा डाग पुसून काढला. अशी अलौकिक कामगिरी करणाऱ्या लोकांच्या अंगीं कांहीं दैवी गुण असावेत आणि ते परमेश्वरी अवतार असावेत अशी दृढ भावना लोकांची कां होऊ नये ?

## हुकूमशहा आणि राजा

हुकूमशहा आणि राजा या दोहोंमध्यें सकृद्दर्शनीं बरेंच साम्य आहे. तथापि दोन्ही संस्था मूलतः भिन्न स्वरूपाच्या आहेत. राजाचें राजेपण आनुवंशिक व पिढीजात, हुकूमशहाची सत्ता स्वकष्टार्जित पण औटघटकेची. लोकमताचें अनुकूल जड बूड नाहींसें झाल्यावर हुकूमशाहारूपी बाहुली एक क्षणभर तरी उभी

राहूं शकेल काय ? या कल्पनेनें वेडावूनच एका लेखकानें असें विधान केलें आहे कीं पार्लमेंटरी राज्यसंस्थेपेक्षां हुकूमशाहीची राजवट अधिक लोकसत्ताक आहे. हल्लीचे हुकूमशहा केवळ लोकनायक नाहींत. त्यांचें आसन लोकांच्या इच्छेवर आणि विरोधकांच्या छाताडावर. त्यांच्या सत्तेच्या मुळाशीं लोकांची सक्तीची खुषी आणि खुषीची सक्ती यांचें कांहींसें संमिश्रण झालेलें आढळेल. खुषी व जबरदस्ती यांची दुधारी तलवार ते; जसे लोकरंजक तसे लोकभंजकहि. राजाचें राजेपण ही निरंतरची मिरासदारी; लोकमतानें निवडून दिलेला व मान्य केलेला सत्ताधारी हा हुकूमशहा. लोकमताची यत्किंचितहि पर्वा न करणारा राजा तर लोकमताच्या नाडीवर बोट ठेवून कसरत करणारा हुकूमशहा. म्हणूनच एका ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं हुकूमशहाचें स्वरूप जरी बाहेरून हुकूमशाही दिसलें तरी अंतर्यामीं ती खरी लोकशाहीच असते. कांहीं थोडा प्रतिकूल काल निघून जातांच लोकशाही पुनः आपल्या नांवानें राज्य करूं लागेल आणि हुकूमशहा आपल्या घरीं स्वस्थ हरीहरी म्हणत बसतील. त्या वेळीं त्याना लोकावर जुलूम कां केलांत असें विचारलें तर ते उत्तरतील कीं " बाबानों, तुम्हींच आमच्या हातीं सत्ता दिली. आमच्या प्रामाणिक बुद्धीप्रमाणें तुमच्या हिताकरितां ती आम्हीं वापरली. तुम्हांस नकोसे झालों त्याक्षणीं आम्हीं अधिकारसंन्यास घेऊन मोकळे झालों व तुमच्यासारखे सभ्य व साधे नागरिक म्हणून समाजांत वावरूं लागलों. यांत आमचें चुकलें कोठें ? "

## हुकूमशहांचा अपमृत्यू

हुकूमशहांना उत्तर आयुष्य इतकें साधें आणि निरुपद्रवी लाभणार नाहीं आणि तें त्याच्या नशिबींहि असणें शक्य नाहीं. किंबहुना हुकूमशाहीचा अंत हुकूमशहाबरोबर होतो म्हणून ती लोकांना मानवली. ( The Dictatorship dies with the Dictator. ) आपली सत्ता आपल्याबरोबर संपुष्टात येणार म्हणून काहीं हुकूमशहानीं आशा सोडलेली नाहीं. आस्ट्रियाच्या डॉल्फसचा दिवसाढवळ्या खून झाला व इतर हुकूमशहावर प्रत्यहीं प्राणघातक हल्ले होतात. अपमृत्यूंनीं वेढलेल्या त्यांच्या आत्मघातकी जीविताचा विमा उतरण्यास कोणती विमा कंपनी आपण होऊन तयार होईल ? किंवा असेंहि आपण म्हणूं कीं खलाशाचा मृत्यू जसा समुद्रांत, अगर वैमानिकाचें मरण जसें विमानोड्डाणांत, हुकूमशहांचें मरण त्यांच्या कारकीर्दीतच व्हावयाचें. समरांगणावर आलेल्या

मृत्यूहून अधिक चांगलें वीरोचित मरण योद्ध्याला मागूनहि मिळावयाचें नाहीं तसेंच हुकूमशहांना त्याच्या अव्वल कारकीर्दींत आलेल्या मरणाचें आहे.

## विभूतिपूजेचा छंद

हुकूमशहांच्या उत्पत्तीस नैमित्तिक कारणांशिवाय नित्याचीं कारणें एकदोन सागतां येतील. यांत्रिक युग अवतरण्यापूर्वी, राज्यसंस्था कोसळो अगर साम्राज्य लयाला जावो, लोकांच्या सामाजिक जीवनाचा ओघ संथपणें वहात असे. मोठी क्रांति होऊन समाजांतील लोकाची सरसहा कत्तल झाल्याविना त्या ओघांत ढवळाढवळ होत नसे. पण अशा कत्तलीशिवाय सामाजिक जीवनांत उलथापालथ होण्याचा समय यंत्रसाधनांनीं आणला. म्हणून समाजाला सर्व सत्तेचा स्वार्थत्याग करून खंबीर आणीबाणीच्या परिस्थितीस तोंड देण्यासाठीं जोरदार राज्यसंस्था निर्माण करावी लागली. याशिवाय अनादिकालापासून मनुष्य स्वभावांत विभूति-पूजेचा छंद बोकाळलेला आढळेल. राज्यसंस्था कसल्याहि प्रकारची असेना कां अलौकिक बुद्धिमत्तेची विभूति तीमध्यें चमकल्याविना रहात नाहीं. भावनेच्या व उत्साहाच्या भरात अशा विभूतीला नसतें महत्त्व प्राप्त होतें; त्यांत त्याच्या हातून प्रथमतः कांहीं अलौकिक कृत्यें घडलीं कीं कामच भागलें. हुकूमशहा नेहमीं आपल्या मागें रंगीबेरंगी पंखे लावून नाचकाम करून दाखवितो. आणि लोकांनाहि तो देशोद्धारक, महान साधुसंत असें वाटून आपल्या अलोट प्रेमांत ते त्याला वाहून नेतात. याचें एक अगदीं ताजें उदाहरण पहा. हॉलंड-बेल्जमवरील यशस्वी चढाई संपवून फ्रान्सवरील जोराची मोहीम हिटलरनें जाहीर केली. त्या वेळेस जर्मनींत गुढयापताका, तोरणें, उभारून राष्ट्रीय विजयोत्सवाचा आठवडा साजरा करण्याबद्दलचें फर्मान हिटलरनें काढलें. त्या उत्साहाच्या उन्मादांत लोक वेडावले. विजयापाठीमागून विजय सारखे मिळत गेले; आपलीं सुखस्वप्नें खरीं ठरलीं. यामुळें प्रत्यक्ष झालेली व होत असलेली मनुष्यहानि व वित्तहानि यांकडे साहजिकच त्यांचें दुर्लक्ष झालें. हुकूमशाहीबद्दलचा पहिला उमाळा व प्रेम पुढें मावळण्याचा फार संभव असतो. यासाठीं नवनवीन पराक्रम दाखविण्याकरिता निरनिराळीं सावजें व शिकारी साधून लोकांचीं मनें भारून ठेवावीं लागतात.

## रुळावरून चाललेलें एंजीन

अलौकिक पुढारीपणा आणि पाशवी शक्ति याच्यावर सरकारची मजबूत

उभारणी नेहमीं होणें शक्य नाहीं. त्या अलौकिक व्यक्तीच्या आयुष्यानंतर त्याची राज्यसंस्था ढांसळलेलीच आढळून येते. तसेंच लढाईतील पराजयानें हुकूमशाही उलथलेली दिसते. तिचें परराष्ट्रीय धोरण नेहमीं आक्रमक व आग्रही स्वरूपाचें असल्यामुळें त्यांचा बंदोबस्त इतर राष्ट्रांना केव्हां ना केव्हां तरी करणें अपरिहार्य होतें. केवळ अंतर्गत बंडाळीनें झोटिंगशाहीचा अंत आपोआप झाल्याचें उदाहरण आजवर दिसलेलें नाहीं. विशेषतः बाहेरून परक्या सत्तेचा दाब आणि नेमकी त्याच वेळेस अंतर्गत बंडाळी यांचा समन्वय झाला कीं त्या हुकूमशहाबरोबर त्या राष्ट्राचाहि चक्काचूर होण्याचा संभव फार असतो.

एकतंत्री सरकार अल्पायुषी असण्याची कारणपरंपरा ॲरिस्टॉटलच्या मतें वेगळी आहे. लोकसत्ताक सरकार पुष्कळशा घोडचुका करीत अडखळत पुढें जाऊं शकतें पण अनेक वेळां हुकूमशहांची एक लहानशी चूक परिणामीं भयंकर ठरते. थोडक्यांत हुकूमशाही म्हणजे रुळावरून चाललेलें आगगाडीचें प्रचंड एंजीन; एकाद्या लहानशा धोंड्यानेंहि त्याचा प्राणघात होऊं शकतो.

## तिहेरी शाप

खुद्द हुकूमशाहींत इतका अनन्वित छळ व जुलूमजबरदस्ती होत असतांना त्यांची लोकप्रियता कायम कां रहावी ? विरोधी पक्षाची कत्तल, त्याचा तुरुंगवास व त्याची हद्दपारी आणि वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी या दोन गोष्टी झोटिंगशहाच्या पाचवीला पुजलेल्या असतात. यांतलें एक मोठें रहस्य असें कीं ते लोकसत्तेप्रमाणें विरोधी पक्षास भिऊन कचरत राज्य करीत नाहींत. विरोधी पक्ष सबल होऊन आपली उच्चलबांगडी करील अशी भीति त्यांच्या मनास चुकूनसुद्धां शिवत नाहीं. या निर्भेळ निर्भयतेशिवाय दुसरें कोणतें सयुक्तिक कारण असणार ?

या साऱ्या विवेचनावरून इतक्या गोष्टी स्पष्ट झाल्या. हुकूमशाही कोणत्यातरी खऱ्या वा काल्पनिक अनिवार्य अडचणींच्या प्रसंगीं हटकून उत्पन्न होते. राज्यसंस्थेस हुकूमशाही हा तिहेरी शाप आहे. एकतंत्री सत्तेनें मी मी म्हणणाऱ्या चांगल्या विभूति भ्रष्ट पावतात. त्यांची सद्सद्विवेकबुद्धि सत्तामदानें पुरी बिघडते. एकतंत्री सत्तेपुढें मान तुकविणाराचा अधःपात होतो. सत्ताधाऱ्याच्या अन्यायाचा प्रतिकार करण्याची ताकद अगोदर लोकांत असत नाहीं. त्यांत त्यांची मान एकदां का सांपडली कीं ती कायमची तुटून जाते. याहि पुढें जाऊन अन्यायास न्याय

म्हणण्यापर्यंत लोकांची मजल जाते. लोकांच्या सक्रिय सहानुभूतीच्या अभावीं तें एकतंत्री सरकार दिवसेंदिवस दुबळें होतें. अखेर सरकार आणि जनता या उभयतांचा नैतिक अधःपात त्या योगींत होतो. *

## विचारस्वातंत्र्याचें महत्त्व

आपत्कालीं एकतंत्री सत्ता लोकसत्तेपेक्षां अधिक त्वरेनें परिणामकारक कार्य करण्यास योग्य असल्याचा दाखला पटवील. पण तिचे पाय एकदां का पक्के रोवले गेले कीं तिचे पुढील घोर परिणाम अटळ ठरतील. इंग्रजीमध्यें अशी एक कथा प्रचलित आहे कीं हरिणांपेक्षां अधिक चपळ आपण आहों हें दाखविण्याकरतां घोड्यानें आपल्या पाठीवर घोडेस्वारास बसूं दिलें आणि लगामहि पण त्याच्या हातीं दिला. त्या योगानें घोड्याची चपळाई सिद्ध झाली पण बिचाऱ्या घोड्याच्या पाठीवरील घोडेस्वार आणि तोंडातील लगाम हीं कायमचीं त्याच्या बोकांडीं बसलीं. तेंच नेमकें हुकूमशहा राज्यसंस्थेंत घडवून आणतात. विशेषतः लोकांचें वैचारिक स्वातंत्र्य नष्ट पावण्याइतकें महान दुर्भाग्य दुसरें कोणतेंहि नाहीं. विचारस्वातंत्र्य खुंटले कीं समाज बौद्धिकदास्यांत पडतो. लोकांची विचारशक्ति घटते, स्वातंत्र्याची लालसा मरते, न्यायबुद्धि विपरीत बनते आणि अन्यायाचा प्रतिकार करण्याची ताकद नाहींशी होते. वैचारिक स्वातंत्र्याबद्दलचे बरट्रँड रसेलचे उद्गार मोठे मननीय आहेत. तो म्हणतो, "मनुष्य या जगांत विचाराइतपत दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीस—प्रत्यक्ष सर्वनाशक मृत्यूस देखील—भीत नाहीं. विचारस्वातंत्र्य हें अत्यंत उपयुक्त, तसेंच क्रांतीला प्रसवणारें आहे. समाजांतील मिरासदारी, वर्गीय प्रस्थ आणि चैनीच्या संवयी यांच्याशीं तें अत्यंत निर्दयतेनें वागणारें आहे. त्याच्याइतपत अराजक, स्वैराचारी, सत्ताधाऱ्याची प्रतिष्ठा न बाळगणारें, फारकाय, हजारों वर्षांच्या अनुभवसिद्ध ज्ञानाची यत्किंचित्‌हि पर्वा न करणारें असें तें आहे. खुद्द नरकाच्या भयासहि तें डगमगणार नाहीं. त्याची प्रचंड वेगवान गती ही मानवी

---

* Dictatorship can live upon emergencies, real or fabricated. Dictatorship is thrice cursed. It curses him who rules, by poison of absolute power, It curses him who submits, because loss of liberty—injury to personality. It curses Govt, by depriving of contribution to common men.—Hobson.

जीवनांतील मोठें वैभव आहे. अथांग समुद्रांतील दीपगृहांप्रमाणें जगाला मार्ग दाखविण्याची महनीय कामगिरी तें नेहमीं करीत असतें." +

## भांडवलशाहीनें मागून घेतलेला नवरा

एकंदरीत इतकें कीं हुकूमशाही हें भांडवलशाहीनें आत्मसंरक्षणार्थ धारण केलेलें उग्र स्वरूप आहे आणि तो भांडवलशाहीचा स्वसंरक्षणाचा शेवटचा प्रयत्न आहे. क्रिकेटच्या खेळांत बॅटसूमन लंगडा झाला तर पळून धावा काढण्यासाठीं त्याच्या जोडीस दुसरा एक मदतनीस देतात. बॅटिंग करावयाचें मुख्य खेळाडूनें पण धांवा काढावयाच्या मात्र मदतनिसानें. याप्रमाणें भांडवलशाहीनें हुकूमशहा हा मागून घेतलेला एक गडी आहे किंवा निराळ्या खेळाच्या परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे लंगडीच्या डावांत गडी दमला कीं नवरा मागून घेण्याची चाल असते. तसेंच भांडवलशाहीनें हुकूमशहा हा एक मागून घेतलेला तात्पुरता नवरा आहे.

भांडवलवाले व इतर जनता या उभयतांना नागवून ही सारी पैशाची उधळपट्टी हुकूमशहा संहारक शस्त्रास्त्रांत करीत आहे. सर्वसाधारण जनतेस आज असेंहि वाटतें कीं भाडवलवाले नागविले जात असल्यामुळें हुकूमशहा समाजवाद अप्रत्यक्षरीत्या न कळत अंमलांत आणीत आहेत. तसें हुकूमशहा करील तर त्याला कोणीहि हजारदां धन्यवादच देईल. पण भांडवलवाल्यांचें भांडवल, फायदा आणि व्याज या गोष्टी हिसकावून घेणें सोपें नाहीं. अशी क्रांतिकारक घटना भांडवलवाले चालूं देतील काय ? हें कधींहि शक्य नाहीं. आणि असा प्रयत्न हुकूमशहा केव्हांहि करणार नाहीं, कारण त्यांत त्यांचा आत्मनाश ठेवलेला आहे. उलट हा हुकूमशहा आपली तुंबडी भरीत आहे, आपल्याभोंवतीं प्रभावळ निर्माण करून

---

+ Men fear thought as they fear nothing else on earth-more than ruin, more than death. Thought is subversive and revolutionary. Thought is merciless to privilege, established institutions and comfortable habits; thought is anarchic and lawless, indifferent to authority, careless of the well-tried wisdom of the ages. Thought looks into the pit of hell and is not afraid...... ............ Thought is great and swift and free, the light of the world and the chief glory of man.—Bertrand Russel.

तिची चंगळ उडवीत आहे. हिटलरच्या गोअरिंग, गोबेल्स आदि प्रभावळीनें आज जगांत मिळवून ठेवलेली प्रचंड मालमत्ता हेंच दर्शवीत नाहींत काय ?

हुकूमशहांना विरोध करून त्यांच्या निःपाताचें अग्निकंकण हातीं बांधणारावर फार मोठी जबाबदारी आहे. किंबहुना लोकशाहीप्रधान उदार राज्यसंस्थेचे हात त्यांच्या पाठीशीं बांधलेले आहेत. आणि अशा स्थितींत त्यांना हुकूमशहांशीं दोन हात करावयाचे आहेत.* याचें कारण लोकसत्ताक देशांना लोक देतील तेवढीच सत्ता धारण करतां येईल. लोकांचें थोडें फार स्वातंत्र्य कायम ठेवण्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे, तसें हुकूमशहांचें नाहीं. म्हणूनच लोकशाहीप्रधान राजसत्तांना हुकूमशहाशीं टक्कर देणें अधिक जिकीरीचें व जोखमाचें होऊन बसलें आहे. प्रथमतः पराभवाचे कांहीं थोडे टोले मिळाले म्हणून निराश होण्याचें कारण नाहीं. चिकाटीनें प्रयत्न केल्यास अंतीं लोकशाहीचा विजय ठेवलेला आहे.

## राष्ट्रीयत्वाचें खरें स्थान

हुकूमशाही नष्ट करणारांना केवळ शक्तीचा जोर करून भागणार नाहीं. आंतरराष्ट्रीय सहकार्य आणि संयुक्त राज्यसंस्था या कल्पनांचा फैलाव त्यांनीं करावयास हवा. लोकांच्या बुद्धीला जागृत करून लोककल्याणाची शिकवण सतत चालू ठेविली पाहिजे. फार काय या कल्पनेच्या सिद्धयर्थ प्रसंगीं आपल्या अंतिम सर्वश्रेष्ठ सत्तेचा त्याग करण्यास तयार झालें पाहिजे. अखिल मानवजातीच्या कल्याणासाठीं प्रत्येक राष्ट्रानें आपलें सार्वभौमत्व जगाच्या संयुक्त स्वरूपांत विलीन करण्यास सिद्ध झालें पाहिजे. राष्ट्रीयत्वाची कल्पना त्या त्या देशाची अगर प्रांताची सुधारणा व प्रगति घडवून आणण्यास आवश्यक आहे. पण राष्ट्रीयत्वानें आक्रमक, आसुरी सर्वभक्षक, सर्वगामी आणि हिंस्र स्वरूप धारण करणें मानवजातीच्या दुर्भाग्याचें आहे. किंबहुना अखिल जगताच्या एकच एक विश्वव्यापक राष्ट्रांत अनेक राष्ट्रें, राष्ट्रीयत्वें, राज्यें, विविध भाषा, संस्कृती आणि धर्म इत्यादि गोष्टींचा समावेश झाल्याविना जगाची नौका स्थिरावणार नाहीं, चिरस्थायी शांतता प्रस्थापित होणार नाहीं आणि मनुष्यास आपल्या जीविताची शाश्वती वाटणार नाहीं. पश्चिम गोलार्धांत राष्ट्राची जाज्वल्य कल्पना नष्ट पावली

---

* Liberal political systems have to fight Dictatorship with their hands tied behind their back—Cobban.

नाहीं तर त्या गोलार्धाची काय अवस्था होईल हें सांगणें अशक्य आहे असा इवाला एका लेखकानें दिला आहे. ×राष्ट्रीयत्वांतील दुसऱ्याच्या दोषांमुळें पेटलेल्या खाईत अखिल जगाची आहुति पडेल. राष्ट्रीयत्वाची कल्पना जन्मास येण्यापूर्वी राष्ट्रें व राज्यें होतीं आणि राष्ट्रद्वेषानें पेटविलेल्या होमकुंडाच्या शांततेनंतर राष्ट्रें व राज्यें जिवंत राहतीलच राहतील. राष्ट्र आणि राष्ट्रीयता या दोन्ही कल्पना प्रत्येक देशाला आपली संस्कृति, इतिहास व भाषा यांचा एक घटक या नात्यानें स्थानिक स्वराज्यापुरते अधिकार उपभोगण्यास योग्य आहेत म्हणून फारतर मान्य करितां येईल. यापेक्षां दोन्हीहि कल्पनांची अधिक व्याप्ति मानवास केव्हांहि विघातकच होईल.

## व्यक्तिस्वातंत्र्याचा संसर्गजन्य रोग

अर्धपोटीं व अर्धनग्न लोकांना वैभवाच्या भुलथापावर हुकूमशहा कितीवेळ झुलवीत ठेवील ? हल्लींच्या विज्ञान युगांत राष्ट्रांना एकलकोंडेवृत्तीनें वागणें शक्य नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य हा एक संसर्गजन्य रोग आहे आणि जोंवर व्यक्तिस्वातंत्र्य जगांतल्या कोठल्याहि कोनाकोपऱ्यांत शिल्लक राहील तोंवर त्या रोगाचें भय हुकूमशहाना नित्य राहील. हुकूमशहा लोकांच्या अंतःकरणांत लष्करी राष्ट्रीयत्वाचें स्फुरण दाबून व ठेंचून भरतात आणि यामुळें एकतन्त्रेची नवीन जोमदार विरोधी शक्ति ते निर्माण करतात. एक दिवस ती शक्ति मोकाट सुटली कीं मग तिच्यावर त्यांचा ताबा राहणार नाहीं. अशा वेळीं आपला स्वतःचा नाश ओढवून घेण्यापेक्षां ते आपल्या राष्टास सर्वनाशाच्या खाईत ढकलतील. विशेषतः निरुपद्रवी नागरिकांवरील बॉंबच्या हल्ल्यानें व उपासमारीनें त्रस्त होऊन लोक त्याच्याविरुद्ध क्रांति करण्याकरतां कंबरा बाधतील. आक्रमक राष्ट्रीयत्वाच्या चक्रास हुकूमशहानीं आपण होऊन बाधून घेतलेलें आहे. त्या चक्रानें एकदां गती घेतली कीं तें नेईल तिकडे त्यांना जाणें भाग पडेल. चालू महायुद्ध सुरू होण्यापूर्वी न्यूलिन् बेंडानें उद्गार काढले होते, " मानवजात कोणीकडे वहात चालली आहे कोण जाणे ! प्रत्येक राष्ट्र स्वार्थामध्यें बुडत आहे. सर्वनाशक महायुद्धाकडे जग अनिच्छया खेचलें जात आहे. मानवजातीवर आजवर पाहिला नाहीं किंवा ऐकला नाहीं एवढा भयंकर प्रसंग गुदरणार आहे. "

× If the Western world does not abolish the state, the state will abolish it.—Cobban.

## वावटळींत सांपडलेलें तारूं

इतिहासाची पुनरावृत्ति होते असें म्हणतात. चालू इतिहास घडविणाऱ्या गोष्टी सर्वस्वीं नवीन अजस्त्र, अतिसंहारक आणि अतिमानुष असल्यामुळें त्याचे न टळणारे असे परिणाम काय होतील हें कल्पनेनेंहि जाणणें अशक्य आहे. त्यांत इतिहासाची पुनरावृत्तिहि कशी होणार आहे कोण जाणें !

जगाचें तारूं जुनीं शांततामय बंदरें सोडून आतां प्रचंड तुफानांत सांपडलें आहे. पुढील मार्ग अत्यंत दुष्कर आहे. पश्चिम गोलार्ध खवळलेल्या भर समुद्रांत आज अगतिक झाला आहे. त्या तारवाला असलेलें मानवजातीच्या कल्याणाचें सुकाणूं पार तुटून गेलें आहे. कोणत्या बिकट खाडींतून, खडकांतून, भरती-ओहोटींतून, तुफानांतून वगैरे अस्मानीसुलतानी अडचणींतून त्यास जावें लागेल याचा अंदाज कोणी कसा बांधावा ? यांतून मार्ग काढावयाचाच झाला तर मानवानें आपल्या संस्कृतीच्या राजकीय व सामाजिक अधिष्ठानावर सर्व लक्ष्य केंद्रित करून परमेश्वराची करुणा भाकल्याशिवाय गत्यंतरच नाहीं.

११

# उद्यांचें जग अर्थात् लोकशाहीचें अमरत्व

## माझा आशावाद

उद्यांच्या जगाइतपत विस्मयकारक विचित्र घटना दुसरी कोणतीच असूं शकणार नाहीं. कविकल्पनेच्या उच्च भराऱ्यांना जसा तो अनुकूल विषय आहे तसेंच खव्याळ व उपद्यापी लोकांच्या बुद्धींतून निघणाऱ्या अचाट साहसी कल्पनांनाहि तो एक उत्तम विषय होऊं शकेल. चोहींकडे पसरलेल्या आजच्या घनदाट निबिड अंधःकारांत हात पाय गाळून उदासीनपणें कोणी आत्यंतिक निराशा प्रगट करील; तर कोणी दूर दृष्टीचा ध्येयनिष्ठ इसम प्रचलित आगीच्या डोंबापलीकडील बलवत्तर आशावाद सांगेल. मला तर असें स्पष्टच सांगावेंसें वाटतें कीं १९२० सालचा जबर आशावाद जितका अकाली व अस्थानीं होता तितकाच १९४० साल उजाडतांच अगर मध्याच्या सुमारास निर्माण झालेला भेसूर निराशावाद अकाली व अस्थानी ठरणार आहे. अर्थात् चालूं महायुद्धानंतर मनुष्यजीवनांत व संस्कृतींत भयंकर उलथापालथी होतील हें उघड दिसणारें आहे. तें कांहीं भविष्य होऊं शकत नाहीं.

उद्याचें जग कसें असेल हें आज हमखास सांगणें कोणाहि मनुष्यबुद्धीला अगोचर असल्यानें अशक्य आहे. त्यासंबंधीं प्रत्येकानें आपापल्या अकलेप्रमाणें

व परिस्थितीप्रमाणें हवे ते किल्ले हवेंत बांधावेत. एवढयाशा वाऱ्याच्या झुळुकीनेंहि पत्त्याच्या बंगल्याप्रमाणें ते केव्हां जमीनदोस्त होतील तें कळायचें देखील नाहीं. उद्यांचें जग कसें असेल हें जरी अगोचर असलें तथापि तें कसें असलें पाहिजे म्हणजे मनुष्याच्या सुखाला लागेल याचें उत्तर मात्र अवश्य देतां येण्याजोगें आहे. आणि त्याचेंच स्पष्टीकरण इतका वेळ केलेल्या विवेचनाच्या आधारें या प्रकरणांत सांगण्याचा मानस आहे.

## उसळतें रांधण

हजारों मैलावरच्या लहानशा भूकंपाच्या धक्क्यानेंहि हवामानखात्यांत ठेवलेल्या नाजूक यंत्रांतील सुई भरारा गिरक्या घेते. तसेंच जगाच्या एका कोपऱ्यांत घडलेली एक गोष्ट आधुनिककालीं अखिल जगावर परिणाम करूं शकते. याचें साधें उदाहरण सध्याच्या युरोपांतील रणसंग्रामाचें देतां येईल. अखिल जगताच्या मानानें युरोपखंड केवढासा ! त्या खंडास आज उसळत्या रांधणाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. पण त्यामुळें उकळत्या भांड्यावरील ताटली थडथडावी तसें आज जगाचें झालें आहे. तिथें लोकशाही सुखासमाधानानें नांदली, नाहींतर झोटिंगशाही रौद्रावतारानें नाचली तर त्याची झळ जगाला कां लागावी ? पण ती युरोपातील झोटिंगशाही–झोंडशाही–सोटेशाही–त्यास काय वाटेल त्या नांवानें संबोधा, –तिचा उपद्रव आपल्याला लागतो आहे अशी जगातील कानाकोपऱ्यांत भावना निर्माण झाली आहे.

एवढेंच नव्हेतर राष्ट्राराष्ट्रांतून या प्रश्नापायीं दोन उघड फळ्या पडल्या असून जो तो आपलें खरें म्हणून एकच गिलका करीत आहे. युरोपातील स्वजातीय रक्तावर पोसलेली लष्करी पाशवी शक्ती आज मोकाट सुटली असून झोंडपणानें अखिल मानवजातीच्या मानगुटीं बसण्याच्या प्रयत्नांत असतां मनुष्यानें थंडच राहावें काय ? नवीन युगाच्या संस्कृतीचा झेंडा आणि अभिनव विचारप्रणालीची मशाल घेऊन सर्व जगाला मार्गदर्शिकत्वाची महनीय कामगिरी करणाऱ्या युरोपांत संस्कृतीच्या झेंड्यावर रानटी अवजारें आणि जुनाट रानटी विचारांच्या झंझावातानें विझलेली मशाल घेऊन लोक सैरावैरा धांवत सुटल्यानें आज जग भांबावलें आहे. एका विद्वान् ग्रंथकारानें युरोपबद्दल असे उद्गार काढले आहेत कीं सद्यःकालीन युरोपात समाजवादी संस्कृती, नाझी आणि फॅसिस्ट

विचार यांचें थैमान चालू आहे. * देशाचे उत्कृष्ट सैनिक बनून, दुसऱ्यावर हत्यार चालविण्यांत व हत्या करण्यांत सारी मर्दुमकी गाजविणें ही मानवी जीवनांतील इतिकर्तव्यता झाली आहे. यामुळें रोमाँ रोलाँ नामक उत्कृष्ट फ्रेंच लेखक हताश होऊन दीनपणें म्हणतो कीं " युरोप म्हणजे मूर्खांचें निवासस्थान बनलें आहे. युरोपखंडानें आपल्या उच्च विचाराच्या भूमिकेनें विस्तार तरी पावले पाहिजे नाहीं तर नाश तरी झाले पाहिजे. बा युरोपखंडा, नमस्ते ! तूं स्मशानभूमींत चांचपडत आहेस, तेंच तुझें स्थान, तिथें स्वस्थ रहा आणि दुसऱ्यांना जगाचें मार्गदर्शिकत्व करूं द्या.×

## भांडवलशाहीचें स्वरूप पालटणार

उद्यांच्या जगांत भांडवलशाही आजच्या स्वरूपांत दिसूं शकणार नाहीं इतकें खात्रीलायक आज सांगतां येईल. भांडवलशाहीचे अंतर्गत स्वरूप पालटलें कीं तिचें बहिर्गत उर्फ साम्राज्यशाहीचें आवरण आपोआप गळून पडेल. बिचाऱ्या भांडवलाकडे काय दोष आहे ! त्याचा बरा वाईट उपयोग करून घेणाऱ्यावर सारें अवलंबून आहे. मनुष्यप्राण्यास पथ्यकर अशा उत्पादक गोष्टींना चालना देण्याचें कार्य भांडवल करूं लागलें तर त्याच्या इतपत उत्तम गोष्ट जगांत दुसरी कोणतीच असूं शकणार नाहीं. पण त्याचाच दुरुपयोग दुसऱ्यावर सत्ता गाजिवण्याची लालसा वाढविण्याकडे अगर केवळ पैशाच्या राशी रचण्याकडे केला गेल्यास त्याच्या इतपत अपायकारक व दुष्ट अशी दुसरी कोणतीच गोष्ट नसणार. म्हणजेच विशेषतः खासगी मालमत्तेच्या हक्काचें वैयक्तिक स्वरूप बदलून तो एक समाजाचा ठेवा बनला पाहिजे. त्यावर समाजाची मालकी चालली पाहिजे आणि तिच्या अभावीं शिक्षण, द्रव्यार्जन, सामाजिक स्थान, उन्नति, संस्कृति संवर्धन इत्यादि व्यक्तिमत्त्वाच्या सर्वांगीण वाढीस पोषक अशीं सर्व साधनें, सधना इतकींच निर्धनांना, उपलब्ध असलीं पाहिजेत. आजच्या समाजात संपत्ति ( मग ती

---

* There is only communist Calture, Nazi Truth and Fascist Thought—C. E. M. Joad.

× Europe as a whole is a madhouse. Europe, Broaden yourself or perish............ Adieu Europe.........you are groping in cemetary. Your place is there. Lie down and let others lead the world.—Romain Rolland.

भांडवल, खासगी मालमत्ता, इत्यादि कोणत्याहि स्वरूपांत असो, ) उद्योगाची, श्रमाची, साहसाची खरीखुरी निदर्शक असतेच असें म्हणतां येत नाहीं ' बडे बापके बेटे ' हातांत सोन्याचें रिंगणे आणि पायांत मोत्यांचा घुंगूर घेऊन जन्माला येतात आणि फुलांच्या नाजूक गाद्यागिरद्यांवर लोळत सर्व जगाला हीन लेखून लाथा मारण्यास प्रवृत्त होतात. यामुळेंच असें वाटूं लागलें आहे कीं आजच्या समाजांतील आर्थिक व्यवस्थेस नैतिक पार्श्वभूमीची फार आवश्यकता आहे.

## व्यक्तिवादांतून आंतरराष्ट्रीयवादाकडे

प्रत्येकानें आपल्या पायापुरतें हित पाहिलें कीं त्यांतच राष्ट्रहित साधतें ही व्यक्तिवादाची प्रधानभूत कल्पना आज फोल ठरली. त्यामुळें लोक परमकोटीचे सुखासीन व स्वार्थपरायण बनतात हें त्या व्यक्तिवादाचा पुरस्कार करणाऱ्या भांडवलशाहीनें निदर्शनास आणलें. आत्यंतिक सुखासक्ति, स्वार्थ आणि अनिर्बंधित स्पर्धा हे तीन दुर्गुण भांडवलशाहींत परमोच्चकोटीस पोंचले. फ्रेंच लोकांतील त्याग-बुद्धी कां नष्ट पावली याची कारणमीमांसा अशाच प्रकारें मार्शल पेतॉनें नुकतीच केलेली सर्वांना विदीत आहे. व्यक्तिवादांतून डोकें वर काढून राष्ट्रवादाच्या मागें लागून मनुष्यानें काय मिळविलें तें सर्वांना आज उघड दिसत आहे. पण याहि दिव्यांतून मनुष्य पार पडून समाजवादाच्या आश्रयानें आंतरराष्ट्रीयत्वाकडे मजल मारील असा बलवत्तर आशावाद आज प्रगट करणें केव्हाहि अस्थानीं ठरणार नाहीं. किंबहुना उद्यांच्या जगांतील हेंच एकमेव नैतिक साध्य असून तें साध्य साधणारी लोकशाही ही एकच एक मानवी संस्कृतीची आदर्शभूत कल्पना आहे. त्या नैतिक साध्याची जाणीव झाल्याविना जगाची खरी खुरी राजकीय व आर्थिक प्रगति होणें शक्य नाहीं. लोकशाहीचें भवितव्य अशा जाणीवेवर व श्रद्धेवर अवलंबून आहे.

## सांस्कृतिक पायावर जगाचें ऐक्य

जगाच्या निरनिराळ्या राष्ट्रीय कप्प्यांतून सर्वस्वी स्वतंत्र व भिन्न अशा मानव संस्कृती येथून पुढें टिकूंच शकणार नाहींत. मानवसंस्कृतीचा खरा पाया स्वार्थ व स्पर्धा नसून, सेवा व सहकार्य हा आहे. म्हणूनच मी म्हणतों कीं आज युरोप नुसता राजकीयदृष्ट्या मागासलेला नसून सांस्कृतिकदृष्ट्यासुद्धां मागासलेला आहे. युरोप सांस्कृतिकदृष्ट्या पुढारण्यासाठीं त्याची नैतिक प्रगति प्रथम झाली

पाहिजे. सर्व जगाचें ऐक्य व संघटना कधीं काळीं झालीच तर ती फक्त सांस्कृतिक पायावरच होईल असें मोठमोठे विचारवंत विद्वान लेखक आजवर प्रतिपादन करीत आले आहेत. हा सांस्कृतिक पाया घालण्यासाठीं युरोपनें फार मोठ्या स्वार्थत्यागास सुसज्ज झाल्याविना गत्यंतर नाहीं. किंबहुना आंतरराष्ट्रीय सहकार्याशिवाय जगाला पुनरपि उन्नतीचे दिवस दिसण्याची मुळींच आशा नाहीं. सांस्कृतिक पाया घालण्यास्तव त्यानीं भांडवलशाहीचें अंतर्बाह्य स्वरूप पालटण्यास आपणहून सिद्ध झालें पाहिजे आणि साम्राज्यशाहीचा त्याग केला पाहिजे. एरवीं साम्राज्यशाही सोडली असें हजारदां मोठमोठ्यांदा सांगून भागणार नाहीं. किंवा लोकशाहीच्या फुटक्या टिमक्या बडवूनहि हा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. लोकशाहीचे पुरस्कर्ते म्हणविणाऱ्यांची ही खरी परीक्षेची वेळ आहे.

## राष्ट्रांचें श्रेष्ठत्व राष्ट्रीय ध्येयावर

राष्ट्रांची उभारणी कांहीं विशिष्ट उच्च तत्त्वांवर व नैतिक मूल्यांवर झालेली असते हें केव्हाहि विसरतां कामा नये. विटा, चुना आणि दगड यापासून बनविलेले ते कांहीं उंच मनोरे नाहींत. देवळांचीं उंच शिखरें त्या धर्माचें श्रेष्ठत्व ठरवूं शकलीं असतीं तर हिंदुस्थानांतील उंचचउंच गोपुरें व देवळांचीं शिखरें यामुळेंच केवळ हिंदुधर्म श्रेष्ठ ठरला असता. धर्माचें श्रेष्ठत्व ठरण्यास त्या त्या लोकांच्या धार्मिक व नैतिक कल्पनांचीं उंच शिखरें असावीं लागतात. तीं तशीं हिंदुधर्मात आहेत म्हणून त्या धर्मीय लोकांचे पाय दास्यत्वाच्या पंकात रुतले असतांनाहि त्या धर्माचें श्रेष्ठत्व सर्वमान्य केलें जातें. तसेंच राष्ट्रांचेंहि आहे. राष्ट्राचा भौगोलिक आकार, विस्तृत साम्राज्य, अलोट संपत्ती, वयोमान, इभ्रत, वर्चस्व इत्यादि खोटया गोष्टीमुळें त्यांचें श्रेष्ठत्व या जगांत प्रस्थापित होऊं शकत नाहीं. राष्ट्रांची खरी उभारणी राष्ट्रीय ध्येयावर असते आणि त्या ध्येयाला मूर्त स्वरूप लोकांचे राजकीय विचार, हेतु, आकांक्षा, हक्क, परमतसहिष्णुता इत्यादि गोष्टीमुळें प्राप्त होतें. लोकांच्या उत्तम विचारांचे, उच्च हेतूंचे आणि उदात्त आकांक्षांचे उंचचउंच मनोरे त्या त्या राष्ट्रांचें श्रेष्ठत्व सर्व जगाला पटवूं शकतात. याचें साधें उदाहरण आजच्या कालांतहि स्वित्झर्लंड या चिमुकल्या राष्ट्राचें देतां येईल. असे उंचचउंच मनोरे एकटया लोकशाहींतच उभारणें शक्य असल्यानें उद्यांच्या जगांत लोकशाहीच नांदली पाहिजे असा आग्रह मनुष्यानें धरावयास हवा.

## लोकराज्याचे फायदे

लोकशाही प्रत्यक्ष कां अप्रत्यक्ष ( प्रतिनिधि द्वारा ) व्यवहारात आणावी हा विचार बराचसा सोईचा आहे. त्यासाठीं त्या देशाचा आकार, लोकसंख्या भौगोलिक स्थान इत्यादि गोष्टी विचारांत घ्याव्या लागतील. आज लोकशाहीचा चोहोंकडे पाडाव दिसतो याचें कारण तिचा प्रयोग करणारे बहुतांशीं लोक अभिनव राज्यशासनशास्त्रांतील अनुनभवी, उतावळे व नवखे उमेदवार होते. त्यांच्या पाडावानें आपण निराश होण्याचें कारण नाहीं. राजे लोक छांदिष्ट, लहरी, अहंमन्य आणि परप्रत्ययनेय बुद्धीचे असतात म्हणून लोकांनीं त्यांच्या हातांतील आनियंत्रित सत्ता हिसकावून घेतली. लोकराज्यांतहि प्रधानांना केव्हां केव्हां बदसल्लागार गांठ पडून राज्यकारभारांत गोंधळ माजतो. तरी पण अशी शक्यता नेहमीं फारच अल्प असते. शिवाय लोकराज्यांत लोकांना आपल्या जीविताची शाश्वती वाटते, द्रव्यार्जनास, शिक्षणास व संस्कृतिसंवर्धनास योग्य ती संधी मिळते. बहुजनसमाजाच्या आकांक्षांना प्रगट होण्यास पुरा वाव मिळतो. आणि आंतरराष्ट्रीय चिरकाल शांतता प्रस्थापित होते.

मानवी जीवनांत क्रिया प्रतिक्रिया यांचें द्वंद्व नेहमीं चालू असतें. आज जरी हुकूमशहांच्या अरेरावी व आक्रमक वर्तनाचा जोर व पगडा दिसला तथापि उद्यां त्याची प्रतिक्रिया झाल्याविना खास राहणार नाहीं.

## व्यक्ति, राष्ट्र आणि जग

लोकाचें सुख व समाधान हें कोणत्याहि राज्यकारभाराचें नजीकचें ध्येय व साध्य असतें. पण लोकांची सर्वांगीण प्रगति करणें हें तिचें दूरचें ध्येय व साध्य आहे हें विसरून भागणार नाहीं. हें ध्येय आणि साध्य लोकशाहीइतपत अन्यत्र साधणें शक्य नाहीं. व्यक्ती, राष्ट्र आणि जग यांचे अन्योन्य संबंध कसे असले पाहिजेत हें एका विश्वव्यापक उपमेनें चांगलें सांगतां येईल. व्यक्तीनें पृथ्वीप्रमाणें आपल्या भोंवतीं फिरून ते फिरून सूर्याभोंवतीं म्हणजे राष्ट्राभोंवती प्रदक्षिणा घातल्या पाहिजेत. पण राष्ट्रानेंहि केवळ स्वार्थांत निमग्न राहणें उपयोगी नाहीं. विश्वांतील सर्व नभोमंडळ बरोबर घेऊन सूर्य स्थिर न राहतां दुसऱ्या सूर्याभोंवतीं पर्यटन करतो अशी एक खगोलशास्त्रांत कल्पना आहे. तसेंच राष्ट्रानें इतर राष्ट्राभोंवतीं उर्फ सूर्याभोंवतीं फिरण्यास सुरवात केली कीं ही समस्या पुरी झाली.

व्यक्तीनें आपल्या सर्व उपजत व मिळविलेल्या शक्तींचा विकास करून त्यांचा विनियोग समाजकार्यार्थ व राष्ट्रकार्यार्थ करावयाचा. समाजानें आणि राष्ट्रानें व्यक्तीच्या विकारास भरपूर व मुबलक साधनें आणि योग्य परिस्थिती ही पुरवावयाची. एवढेंच नव्हे तर अखिल जगताच्या व मानवजातीच्या कल्याणार्थ थोडीबहुत स्वार्थास मुरड घालूनहि प्रत्येक राष्ट्रानें जें जें करणें योग्य व अवश्य आहे तें कर्तव्य म्हणून करण्यास सिद्ध झालें पाहिजे. विश्वव्यापक लोकशाहीची कल्पना या एकाच मार्गानें फलद्रूप पावूं शकेल.

## लोकशाही अमर आहे

म्हणूनच मी म्हणतों कीं लोकशाहीचे दृष्टांत वा साक्षात्कार हिटलर मुसोलिनींच्या दृष्टांतापेक्षां अगर साक्षात्कारांपेक्षां हजारपटीनें अधिक भाग्याचे व मोलाचे आहेत. कारण लोकशाहींत वैयक्तिक आत्म्याचें स्थान अढळ आहे व त्याचें आत्यंतिक मोल जपलें जात आहे. राज्य, मालमत्ता, राष्ट्र याच्याहि पेक्षां मानवतेस लोकशाहींत अधिक किंमत व मान आहे. बंधुवर्गाची भावना हेंच खरें जीवन आणि बंधुवर्गाचा अभाव हाच खरा मृत्यू असें तिथें मानलें जातें.* व्यक्तीच्या हितसंवर्धनार्थ कोणतेंहि राज्य असतें आणि व्यक्तीचें संरक्षण, सेवा, संघटना, विकास व संवर्धन यासाठींच राज्याचा अवतार असतो अशी लोकशाहींतील मूलभूत कल्पना आहे. म्हणून एका ग्रंथकारानें असें स्पष्टपणें म्हटलें आहे कीं लोकशाहीस मारेकरी घालणें हें मनुष्याच्या आत्म्याचा खून करण्यास प्रवृत्त होण्यासारखें आहे.*

सरहद्दीचे दगड उखडून राज्याचा भौगोलिक विस्तार करणें हे लोकशाहीकृत राज्याचें अंतिम साध्य नसून व्यक्तीची सर्वांगीण प्रगती व विकास करणें हें आहे. पण सध्यां राज्ययंत्राच्या प्रचंड अवजरांत व्यक्तीला अत्यंत क्षुल्लक स्थान प्राप्त झालें आहे. एकूण लोकशाही जरी बाहेरून करुणास्पद शासनसंस्था दिसली तथापि ती शासनसंस्थेची अत्यंत परिणत व प्रभावशाली अवस्था आहे असें म्हणणें भाग पडतें. एवढेंच नव्हे तर लोकशाहीचें स्थान मनुष्याच्या आत्मिक सामर्थ्यावर असल्यानें ती अमर आहे असेंच अखेर दिसून येईल.

* * *

---

* Fellowship is life and lack of fellowship is death...Political democracy can no longer be crushed than the moral order it secures. Finally to slay democracy, is to slay human spirit.—

असो. एकंदरींत क्रांतीची निशा थोडा काळ बेभान करील. झोटिंगशाहीची कल्पना आपली मति क्षणभर गुंग करील. पण दोन्हीहि गोष्टी नित्याच्या झाल्यावर त्यांचे गुणदोष कळून देतील. सांप्रत आलेलें कालचक्र लोकशाहीवर मुळींच नाहीं. त्याचा खरा रोख भांडवलशाहीवर आहे. लोकशाही जगांत अवतरली ती कायमची नांदण्यासाठीं. अशा तुटपुंज्या अनेक गंडांतरांतून लोकशाही अधिक प्रभावशाली व प्रखर होऊनच बाहेर पडेल. जेम्स ब्राईसच्या भाषेंत बोलावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं प्रातिनिधिक राज्यव्यवस्थेंत कितीहि मोठे दुर्गुण असले आणि खऱ्या लोकराज्यांत कितीहि मोठे ढोबळ दोष असले तरी याहून जोंपर्यंत दुसरी उत्तम शासनसंस्था मनुष्यास सापडली नाहीं तोंपर्यंत तिचा स्वीकार केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. ( What better alternative do you offer ? ) असा त्यांनीं प्रश्न विचारला आहे.

## लोकसत्तेवरील मनुष्याचा अढळ विश्वास

ग्रीक भाषेंतील म्हणीप्रमाणें घशांत गुदमरलें असतां पाण्याचा घोंट घ्यावा हा पथ्यकर इलाज खरा, पण जर का पाण्यानेंच प्राण घुटमळला तर त्या गुदमरण्यावर काय उपाय ? त्याचप्रमाणें लोकशाहीला झिडकारिलें तर मग मुळांत राहिलें तें काय ? असा मोठा दृष्टांतपूर्ण मर्मभेदक प्रश्न त्यांनीं वाचकांना टाकला आहे.*

त्यांच्या मतें दुसरें सर्व राज्यकारभाराचे प्रकार मनुष्यानें अनुभवून लोकराज्याचा प्रकार शोधून काढला. ती कल्पना अनेक अग्निदिव्यांतून मनुष्यानें तावून सुलाखून पाहिली. म्हणूनच लोकसत्तेवर मानवजातीचा संपूर्ण विश्वास आहे आणि तिच्या भवितव्याविषयीं उज्ज्वल आशा व आकांक्षा त्यानें मनांत बाळगिली आहे. जोंवर हा विश्वास आणि आकांक्षा मनुष्यहृदयात कायम आहेत; तोंवर लोकशाही जगातून नष्ट होण्याची आशा करणें अत्यंत चुकीचें व वेडेपणाचें होणार आहे. × असा त्यानीं लोकशाहीबद्दल दिलेला निर्वाळा शंभर टक्के खरा असल्याचा अनुभव मनुष्यास आल्याविना कदापि राहणार नाहीं.

---

* If Democracy is flouted, what remains ? There was a Greek proverb, "If water chokes, what can one drink to stop choking ?"—Bryce.

× So it may be said that Democracy will never perish till after Hope has expired.—Bryce.

[ १२ ]

# हिंदुस्थानांत लोकशाहीचा प्रयोग

माझ्या मतें उद्यांच्या जगांत पूर्व गोलार्धास प्रचंड महत्त्व प्राप्त होणार आहे. आणि त्यांत सांस्कृतिकदृष्ट्या श्रेष्ठतम गणल्या गेलेल्या हिंदुस्थानाचें स्थान अत्यंत महत्त्वाचें व नाक्याचें आहे.

१९१९ च्या तदनंतर १९३५ च्या सुधारणा कायद्यांनीं जें पै पैसाभर स्वराज्य हिंदी लोकांच्या पदरांत पडलें तें उत्तम रीतीनें राबवून त्याहीपेक्षां वाढती जबाबदारी शिरावर घेण्यास लायक असल्याचा दाखला त्यांनीं पटविला. हिंदुस्थानांतील लोकशाहीचा हा प्राथमिक प्रयोग अपेक्षेहूनहि अधिक यशस्वी झाला.

## हिंदु संस्कृतींतील आत्म्याचें स्थान

हिंदुस्थानसारख्या एकाद्या खंडाएवढ्या विस्तृत प्रदेशांत लोकशाहीप्रधान राज्यसंस्थाच अधिक हितकारक असल्याचें आपणांस विचारांतीं दिसून येणार आहे. किंबहुना छोट्या छोट्या आणि परचक्रापासून निवारण करण्यास कमकुवत अशा राज्यांतून लोकशाहीची कल्पना स्वित्झर्लंडप्रमाणें परिणत अवस्थेस नेणें एकवेळ शक्य झालें तथापि तें टिकविणें त्यांच्या कुवतीबाहेरचें आहे हें निश्चित ठरलें. त्यासाठीं अशा छोट्या छोट्या राष्ट्रांनीं सांघिक आयुष्य

घालविण्याविना अन्य गत्यंतर नाहीं हें आतां सांगण्याची निराळी जरुरी राहिली नाहीं. सुदैवानें तशी परिस्थिती हिंदुस्थानची नाहीं. हा प्रदेश क्षेत्रफळाच्या दृष्टीनें अति विस्तीर्ण आणि भौगोलिक व नैसर्गीक संरक्षणांनीं युक्त आहे. आत्मसंरक्षणार्थ पुरेशी व भरपूर अशी लोकसंख्याहि पण आहे. प्रदेश अत्यंत सुपीक व खनिज पदार्थांनीं युक्त असा असल्यानें आमच्या गरजा आमच्या आम्हीं भागवूं शकूं. फक्त आधुनिक उत्पादनाच्या साधनांची वाढ झाली कीं काम भागलें. ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया तर आम्हीं सर्व जगाचे म्होरके आहोंत असा योग्य अभिमान बाळगण्यास आम्हांस कोणताच प्रत्यवाय नाहीं. व्यक्तीच्या आत्म्याचें श्रेष्ठत्व आमच्या धर्मानेंच मान्य केलें असल्यानें पाश्चात्याप्रमाणें बुद्धिवादानें त्याचें श्रेष्ठत्व पटविण्याची आम्हांस आवश्यकता नाहीं. अर्थात् व्यक्तीच्या आत्म्याच्या सर्वांगीण वाढीस व उन्नतीस लोकशाहीसारखी दुसरी उत्कृष्ट राज्यसंस्था नाहीं हें एकदा मान्य केल्यावर त्याचा अंगिकार खरोखरी पाहतां सर्वांच्या अगोदर करावयास हवा. हिंदूसंस्कृतीस योग्य व उचित अशीच लोकशाहीची कल्पना असल्यानें तिच्या अंगीकारांत जगाच्या मागें आपणांस राहण्याचें यत्किंचितहि कारण नाहीं. उलट आपण त्या बाबतींत पुढारीपणच पत्करावयाला हवें.

## देशांतील अज्ञानांधःकार

आमच्या देशाचा मोठेपणा इतका वर्णन केल्यानंतर, दुर्दैवानें ज्या गोष्टी लोकशाहीच्या प्रत्यक्ष अंमलबजाणीस या देशांत आड येतात त्यांचाहि नामनिर्देश करणें जरुरीचें आहे. त्यांचा विस्तारपूर्वक उहापोह एवढयाशा प्रकरणांत शक्य नाहीं. लोकशाहीचीं बीजें पाश्चात्यांकडून या देशांत आलीं. त्यास थोडे फार अंकुरहि फुटले. लोकशाही राज्यपद्धतींतील जबाबदारी व कर्तव्यें शिरावर घेऊन पार पाडण्यास, योग्य अशा शिक्षणाचा अभाव, ही लोकशाहीच्या मार्गांतील भली मोठी धोंड आहे. त्यासाठीं अगोदर आपल्या देशबांधवांचें अज्ञान नाहींसें करण्यासाठीं साक्षरतेची चळवळ हातीं घेणें भाग आहे. पण निव्वळ साक्षरतेनें काम भागेल व लोकशाही निर्बंध नांदेल अशी कोणाची कल्पना असेल तर ती साफ चुकीची आहे. पाश्चात्य देशांत हेंच अनुभवास आलें. लोकशाहीचीं तत्त्वें नीट उमजून अंगीं मुरलीं नाहींत म्हणून तर सध्यांचा घोंटाळा निर्माण झाला आहे. लोकशाहीच्या तत्त्वांची शिकवण व आचरण यांची सांगड मनुष्यस्वभावाशीं

अनेक शतकांची झाल्याविना मनुष्यस्वभावांतील नैसर्गिक उद्दाम भावना व विकारवशता यांना आळा बसणार नाहीं. उच्च शिक्षणानें सुसंस्कृत बनलेलीं मनेंच लोकशाही उत्तम तऱ्हेनें राबवूं शकतात.

## हिंदी संस्थानें

यानंतर लोकशाहीच्या प्रचारांतील दुसरी अडचण हिंदी संस्थानांची आहे. ज्या कारभारांत कसलीच दाद असूं शकत नाहीं व कोणाचा पायपोस कोणच्या पायांत असत नाहीं त्यास आपण " संस्थानी कारभार " असें उपमेनें म्हणतों. यांतच त्यांचें सारें वर्णन आलें. हिंदी संस्थानाइतपत अजब शासनसंस्था दुसरी सांपडणार नाहीं. अंतर्गत बंडापासून आणि परचक्रापासून कसलेंच भय गेलीं शेंदीडशें वर्षें नसल्यानें संस्थानिकांना कसल्याच महत्त्वाकांक्षा राहिल्या नाहींत. राष्ट्र म्हणजे काय याची त्यांना कल्पना नाहीं. यामुळें आधुनिक जगांत सर्व दृष्टींनीं संस्थानिक मागासलेले ठरले. एका ग्रंथकारानें अशा बेलगामी राज्यसंस्थांना " कर उकळणाऱ्या संस्था " (Tax collecting Institutes) म्हणून संबोधिलें आहे. तेथील राज्यकारभार एका माणसाच्या केवळ लहरीवर व सुखासाठीं चालतो. एकट्याच्या केवळ लहरीवर लाखों लोकांचें जीवित, मालमत्ता व सुख अवलंबून असणें ही त्रेतायुगांतील शासनपद्धति सुधारलेल्या विसाव्या शतकांत जशीच्या तशी चालू शकेल काय ? या संस्थानांचा ब्रिटिश हिंदुस्थानशीं मिलाफ, त्यांना जसेंच्या तसें ठेऊन करणें म्हणजे वाळूपासून एकादा सुंदर पुतळा करण्याइतकेंच वेडेपणाचें आहे. लोकशाहीच्या तत्त्वानुसार संस्थानांची आमूलाग्र सुधारणा होणें अगत्याचें आहे. तरच त्यांचा व ब्रिटिश हिंदुस्थान यांचा एकजिनसी देश निर्माण होऊं शकेल. देशकालपरत्वें, हिंदी संस्थानिकांनीं अखिल हिंदुस्थानच्या संयुक्त स्वरूपांत आपलें स्वामित्व व सार्वभौमत्व विरण्यास तयार झाल्याविना आतां गत्यंतरच नाहीं. कालाचा वेगवान ओघ ध्यानांत घेऊन संस्थानिकांनीं हा स्वार्थत्याग आपणहून करण्यांतच शहाणपणा आहे.

## अल्पसंख्यांकांची धोंड.

या नंतर लोकशाहीच्या प्रचारांतील तिसरी धोंड अल्पसंख्यांकांची आहे. खरें म्हटलें तर पाश्चात्याइतपत आमच्यांत हा प्रश्न इतका तीव्र नाहीं व निकरासहि पोंचलेला नाहीं. अल्पसंख्यांकांनीं आपली जात, भाषा, संस्कृती, इतिहास इत्यादि टिकविण्यासाठीं जरूर त्या सर्व सवलतींची अवश्यमेव मागणी करावी आणि ती

अलबत पुरी केली पाहिजे. पण यापुढें जाऊन सवता सुभा उभारून हिंदुस्थानची फाळणी करणें व शकलें पाडणें हें आत्मघातकी धोरण केव्हांहि श्रेयस्कर होणार नाहीं. अशा, हट्टी व आग्रही अल्पसंख्यांकांना पार्शी समाजाकडे थोडेसें पहा असें सांगतां येण्यासारखें आहे. आज हजारों वर्षें ते येथें वास्तव्य करून राहिले आणि आपली अलोट संपत्ती हिंदी बांधवाच्या कल्याणार्थ त्यांनीं खर्च केली. पण त्यांनीं कधीं आपणास तुटक प्रांतिक विभाग पाहिजे म्हणून आकांक्षा बाळगली नाहीं. अखिल हिंदुस्थान हा संयुक्त, संघटित व बलवान राहण्यासाठीं अल्पसंख्यांकांनीं दूरदर्शीपणाचे पण परिणामी हितकर असें धोरण स्वीकारणें इष्ट नाहीं का? भांडवलवाल्यांचा विचार यापूर्वी साग्रपणें केला असल्यानें त्याची द्विरुक्ति करीत नाहीं.

## कॉंग्रेस फॅसिस्ट आहे काय?

यानंतर फक्त एकाच प्रश्नाचा विचार करणें बाकी राहिलें. लोकशाहीवर प्रवचनें झोडतांना कित्येकजण कॉंग्रेसवर फॅसिस्ट वृत्तीचा आरोप करतात त्यांत कितपत तथ्यांश आहे हें आपण पाहूं. लोकशाहीचीं महान् तत्त्वें गुंडाळून ठेवून एखाद्या झोटिंगशाहीप्रमाणें कॉंग्रेस वर्तन करते आणि त्यांतील कांहीं पुढाऱ्यांना झोटिंगशाहाप्रमाणें वागण्याची लहर येते असें आक्षेपकांचें मुख्य म्हणणें आहे. विशेषतः गेल्या वीस वर्षांत कॉंग्रेसचें राजकारण, तिचे सूत्रधार महात्मा गांधी यांच्यावर अवलंबून असल्यानें हिंसाहिंसेची चिवडाचिवड करीत अहिंसारूपी महात्मा व्यक्तिमत्त्वांची हिंसा करतात असा त्यांच्यावर आक्षेपकांचा ठपका आहे.

या आक्षेपाचा विचार करतांना महात्मा गांधी व राष्ट्रीय कॉंग्रेस या दोघांमधील भेद आपण केव्हांहि विसरतां कामा नये. कसली का राजवट असेना, अलौकिक प्रतिभेची व्यक्ती त्यांत चमकल्याविना राहात नाहीं. महात्मा गांधीसारख्या अलौकिक व्यक्तीला पुढारीपणाचा मान देऊन अनिर्बंधित सत्ता सुपूर्द केली आणि प्रसंग विशेषीं त्यांच्या हातून तिचा दुरुपयोग झाला तर तो मनुष्य स्वभावास धरूनच झालें असें समजणें भाग आहे. महात्मा गांधी आणि हिंदुस्थान यांच्याबद्दल हेन्री ब्रेल्सफोर्ड यानीं काढलेले उद्गार मननीय आहेत. ते म्हणतात कीं "हिंदुस्थानांत लोकशाहीविषयीं कितीहि प्रेम आणि श्रद्धा असली तथापि प्रगतीसाठीं अखेर हिंदुस्थान झोटिंगशाहीलाच कवटाळण्याचा अधिक संभव आहे. कॉंग्रेससारखा जबरदस्त एकच मुख्य पक्ष, एकमेव पुढारी, त्याच्या सर्वाधिकाराला लवून मान्यता, प्रत्यक्ष परमेश्वराकडून स्फूर्ती उर्फ 'आंतला आवाज' यावर

निष्ठा ही सारीं लक्षणें हुकूमशाहीचीं आहेत. राष्ट्रीय ऐक्याच्या दृष्टीनें मतांतराच्या गलबल्यापेक्षां एकच राष्ट्रीय पक्षाचें अधिष्ठान श्रेयस्कर असें निसंदिग्धपणें प्रतिपादणारे अनेक लोक आज काँग्रेसमध्यें आणि काँग्रेसबाहेर आहेत. कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळींच केवळ नव्हे तर इतर वेळीं सुद्धां काँग्रेसनें डिक्टेटर्स नेमल्याचे दाखले आहेत. " सत्याग्रहाचें तंत्र मला एकट्यालाच काय तें कळतें " हें महात्मा गांधींचे उद्गार फॅसिस्ट वृत्तिनिदर्शक नाहींत काय असा ब्रेल्सफोर्डनीं शेवटीं सवाल टाकला आहे ?

## काँग्रेसचें सामर्थ्य कसें वाढेल ?

हें झालें महात्मा गांधी विषयीं. पण काँग्रेसवर फॅसिस्ट वृत्तीचा जो आरोप केला जातो तो मात्र बहुतांशीं वृथा आहे. काँग्रेसच्या हातून कांहीं थोडीं फॅसिस्टवृत्ति निदर्शक कृत्यें झालीं असतील तर त्यांचा कर्ता करविता कोण हें आपणा सर्वांना विदित आहे. खुद्द काँग्रेसनें पक्षाची शिस्त व संघटना शाबूत राखण्यासाठीं मोठ्या व्यक्तींची यत्किंचितही कदर न बाळगतां कांहीं कडक उपाय योजना केल्या म्हणून तेवढ्यानें काँग्रेसवर फॅसिस्ट वृत्तीचा आक्षेप टिकूं शकणार नाहीं. किंबहुना प्रत्येक पक्षास, संस्थेस व समाजास आपल्यांतील एकजूट व शिस्त टिकवण्यासाठीं केव्हां केव्हा सबुरीचें धोरण सोडून कडकपणा धारण करावा लागतो. पण त्यामध्यें त्यानीं आपल्यांतील न्यायबुद्धि दुसऱ्याकडे गहाण ठेवलेली असतां उपयोगी नाहीं किंवा सूडबुद्धीनें व्यक्तींचा छळ करणें योग्य ठरणार नाहीं. न्यायान्यायाचा तराजू समतोल राखणाऱ्या पक्षाचें, संस्थेचें व समाजाचें नैतिक अधिष्ठान भरभक्कम असतें. तो समतोलपणा नष्ट झाला कीं महान् व्यक्तीप्रमाणें तो पक्ष, संस्था व समाज भ्रष्ट पावतात व त्यांच्या ऱ्हासास प्रारंभ होतो. विशेषतः राष्ट्रीय काँग्रेससारख्या मोठ्या संस्थेवर प्रचंड जबाबदारी आहे. त्यानीं आपल्या पक्षात भिन्नभिन्न मतांना वाव ठेवून योग्य तो मान दिला पाहिजे. पाश्चात्य देशांतील हुकूमशाहीप्रमाणें एकच विचारांच्या व मतांच्या होयबा लोकांचा संग्रह करणें परिणामीं इष्ट व पथ्यकर ठरणार नाहीं. त्यामुळेंच हुकूमशहासारखे बेताल नाचण्याची सहज प्रवृत्ती निर्माण होते. भिन्नभिन्न जातींच्या व मतांच्या व्यक्तीसमुदायामुळें असा तोल सुटूं शकत नाहीं व देशांतील जास्तींत जास्त लोकांचा संग्रह, संघटना व ऐक्य साधतां येतें. याच नेमक्या गोष्टीची आज हिंदुस्थानला अत्यंत जरुरी आहे. व्यक्तिमत्त्वाला चिरडून त्यांच्या आत्म्यांचा शाप

घेणारा कोणता महाभाग जगांत अखेर यशस्वी झाला आहे ? वरील धोरण काळजीपूर्वक चालविलें गेलें तर काँग्रेसचें धोरण केव्हांहि लोकशाहीच्या तत्त्वांशीं विसंगत होणार नाहीं, यामुळें आज काँग्रेसशीं सहमत नसलेले अनेक लोक फटकून वागतात ते तिच्याशीं सहकार्य करून काँग्रेसचे नैतिक व कायिक सामर्थ्य खात्रीनें वाढवतील. विचारी मनुष्य सहसा देशद्रोही असूं शकत नाहीं. फक्त देशभक्तीची आंच व्यक्तीगणिक कमीजास्त असूं शकेल. आज मवाळांतल्या मवाळालासुद्धां तुम्हीं विचारलें कीं "बाबानों, तुमचें अंतिम उद्दिष्ट काय ?" तर तो सुद्धां स्वातंत्र्यच म्हणेल. पण त्याचा त्या उद्दिष्टाप्रत पोचण्याचा मार्ग धिम्मा, सावकाश व सबुरी वृत्तीचा असेल. दुसऱ्या एकाद्या तडफदार मनुष्याचा मार्ग झटपट, त्वरित व क्रांतिकारक असूं शकेल. विरोधी पक्षाचीं मतें झालीं म्हणजे तीं सर्वस्वीं चुकीचीं व अयोग्य नेहमींच असत नाहींत. त्यांच्यांतहि थोडा-फार प्रामाणिकपणा असतोच असतो. त्याचें ग्रहण करून जास्तींतजास्त लोक सहमत होतील असें धोरण आंखणें हीच आजच्या काँग्रेसवर मोठी जबाबदारी आहे. झोटिंगशाहीची राज्यसंस्था लहरी असल्यानें किती दगलबाज असते याचा पुरावा अहिनकुलवत नातें असलेल्या रूसो-जर्मन करारानें सर्व जगाच्या पुनः एकवार प्रत्ययास आणलें.

× × × ×

## लोकशाहीचा सूर्योदय

उद्यांच्या जगाच्या क्षितिजावर लोकशाहीचा सूर्योदय होऊं लागला आहे. त्याच्याकडे पाठ फिरवून आपल्याच छायांशीं खेळण्यांत दंग होणें हिंदुस्थानास इष्ट नाहीं. सकाळच्या कोंवळ्या उन्हानें बरी पाठ शेकून अंगांत ऊब येते आहे असें म्हणून तिकडे दुर्लक्ष्य करण्यांत हिंदुस्थानची फार मोठी चूक होणार आहे. उगवत्या सूर्यनारायणाच्या स्वागतार्थ सज्ज राहून अर्घ्यें अर्पण केलीं पाहिजे—नव्हे त्या सूर्यनारायणाच्या तेजःपुंज सहस्ररश्मींत आपण सूर्यस्नान घेऊन आपल्या अंगांत निरोगीपणा व निकोपपणा आणावयास हवा. फार काय, अंगीं सामर्थ्य वाढावें म्हणून नेमानें सूर्यनमस्कार घालण्याचें व्रतसुद्धां सुरू करा-वयास पाहिजे. लोकशाहीप्रधान स्वराज्य टिकविणें किती महत्प्रयासांचें व कष्टांचें आहे हें उघड दिसत असतां डोळ्यांसमोर कातडें ओढून स्वस्थ बसणें शहाण-पणाचें होईल काय ?